# ब्रिटिश लोकांचा जीवनक्रम
व
# चारित्र्य.

भाषान्तरकार- माधवराव व्यंकटेश लेले

श्रीमंत नारायणराव बाबासाहेब.



सम्राट् पांचवे जार्ज आणि महाराज्ञी.

# ब्रिटिश लोकांचा जीवनक्रम व चारित्र्य.

( एतद्विषयक सन १९१३ सालच्या यूरोपच्या प्रवासांत
मनावर घडलेले संस्कार. )



**श्रीमंत नारायणराव बाबासाहेब,**

चीफ् ऑफ् इचलकरंजी–कृत.

**नेक नामदार लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन,** जी. सी. एस्. आय्.
यांच्या प्रस्तावनेसहित.

भाषांतरकार,

**माधवराव व्यंकटेश लेले.**
बी. ए., एल्. सी. ई.

१९१५

किंमत १॥ रुपया.

# समर्पण.

**माझे ब्रिटिश व हिंदी प्रजाबांधव**

यांना

युरोपांत प्रवास करीत असतांना माझ्या मनावर
झालेल्या संस्कारांचें हें वर्णन, माझी प्रिय
मातृभूमी व ग्रेट ब्रिटन यांच्यामधील
अन्योन्य सहकारिता व सहानु-
भूति यांचे प्रेमपाश पूर्वींपेक्षांही
अधिक दृढ होण्यास
साधनीभूत होवो
या हेतूनें, मी
अर्पण करीत
आहें.

**नारायणराव बाबासाहेब.**

# अनुक्रमणिका.

# भाषांतरकर्त्याची प्रस्तावना.

हें पुस्तक मूळ इंग्रजींत विलायतेंतच छापून प्रसिद्ध झालें. त्याचें समालोचन तिकडील व हिंदुस्थानांतील बऱ्याचशा दैनिक पत्रांत आलें होतें, त्यावरून त्यांतील लेख व विचार पुष्कळ अंशीं मान्य व विचारणीय असल्याचें दिसून आल्यावरून, अशा लेखांचा इकडील महाराष्ट्र वाचकवर्गाला परिचय झाला तर चांगलाच, कारण त्याच्यावरून अशा श्रीमान्, सुबुद्ध, सुशिक्षित, अनुभविक व प्रगमनशील लेखकाची खरी योग्यता व प्रौढी त्यांच्या देशबांधवांच्या चांगली लक्षांत येईल, असें समजून, श्रीमंत बाबासाहेब यांच्याजवळ त्याचें भाषांतर करून तें प्रसिद्ध करण्याची परवानगी मागितली. ती त्यांनीं आपल्या नेहमींच्या थोर स्वभावास अनुसरून मेहेरबानगी करून तेव्हांच दिली. याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडे आहेत.

मूळ लेख फारच सुरेख व मार्मिक इंग्रजी भाषेंत लिहिलेले असल्याबद्दल व विचारही फारच योग्य व प्रौढ असल्याबद्दल तज्ज्ञ लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनीं आपल्या प्रास्ताविक लेखांत उल्लेख केलेला आहे. त्या मानानें हें भाषांतर शक्य तितकें चांगलें उतरण्याचा प्रयत्न केला आहे. या कामीं आमचे स्नेही रा. रा. गणेश दत्तात्रय कुलकर्णी, बी. ए., एल्‌. एल्‌. बी., मुनसफ, इचलकरंजी, यांनीं फार काळजीपूर्वक व प्रेमानें मदत करून भाषा व विचारसौष्टव आणण्याच्या कामीं मदत केली, याबद्दल त्यांचा मी अत्यंत ऋणी व आभारी आहें.

तसेंच माझे जुने मित्र रावसाहेब रामकृष्णपंत मोरमकर यांनीं पुस्तक जलद छापवून देण्याच्या कामीं परिश्रम घेतले, याबद्दल त्यांचेही आभार मानावे तितके थोडेच आहेत.

आपल्या दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिक व इतरही मंडळींपैकीं बरेचजण विलायतेचा प्रवास करून आलेले आहेत, व त्यांतील कित्येकांनीं आपल्या प्रवासाचीं वर्णनें लिहून छापून प्रसिद्धही केलेलीं आहेत. त्या सर्वांमध्यें, माझ्या मतें स्वतंत्र विचार, सूक्ष्म निरीक्षण इत्यादि अनेक बाबतींत बहुतेक पहिल्या प्रतीचें अशा या प्रवासवृत्ताचा महाराष्ट्रीय वाचकांना परिचय करून देण्यासाठीं केलेला हा प्रयत्न, यत्किंचितही सिद्धीस गेला तरी केलेल्या परिश्रमाचें सार्थक झालें, असें मी समजेन.

मुंबई,
४।८।१९१५. }

मा. त्र्यं. लेले.

## लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनीं लिहिलेला

# उपोद्घात.

हिंदुस्थानांतील एक सुशिक्षित व सुप्रसिद्ध संस्थानिक नारायणराव बाबासाहेब घोरपडे, चीफ् ऑफ् इचलकरंजी, यांनीं लिहिलेल्या या लहानशा वर्णनपर लेखांना उपोद्घातादाखल चार शब्द लिहिण्याचें मीं आनंदानें कबूल केलें.

बाबासाहेबांचा जन्म इ. स. १८७० सालीं झाला.स० १८७६सालीं ते दत्तक होऊन गादीवर आले. कोल्हापूर येथील राजाराम कॉलेज, आणि मुंबईचें एल्फिन्स्टन कॉलेज, यांच्यामध्यें त्यांचा विद्याभ्यास झाला. अधिकारारूढ झाल्यापासून आजवर त्यांनीं आपल्या संस्थानाच्या व्यवस्थेमध्यें चांगलें मन घालून यश संपादन केलें आहे. तत्संबंधीं अनुभव आणि उपजत ग्राहकता यांच्यामुळें हिंदुस्थानांतील राज्यकारभारासंबंधीं बऱ्याच बाबतींत अधिकारानें बोलण्याची त्यांच्या अंगीं योग्यता आलेली आहे. आपल्या संस्थानचें कर्ज वारून त्यांनीं तें चांगल्या संपन्न स्थितीला आणिलें आहे, व खजीन्यांत बरीच शिल्लक टाकली आहे. संस्थानांतील विद्याखातें आणि आरोग्यखातें यांच्याकडे त्यांनीं चांगलें लक्ष पुरविलें आहे. इ.स. १९१० सालीं मुंबई येथें भरलेल्या शेतकी-परिषदेमध्यें योग्य रीतीनें अध्यक्षाचें काम करतां येण्या इतकें त्यांनीं शेतकी खात्याविषयीं ज्ञान संपादन केलें आहे. सहकारी पतपेढ्या स्थापन करण्याच्या कामींही त्यांनीं

पुढाकार घेऊन यश मिळविलें आहे. तशा तऱ्हेच्या बऱ्याच पतपेढ्या त्यांनीं आपल्या संस्थानांत स्थापन करविल्या आहेत. दक्षिणेंतील सरदारांच्या वतीनें, ते गेलीं चौदा वर्षें मुंबईसरकारच्या कायदे-कौन्सिलामध्यें प्रतिनिधी होते.

युरोपांतील हा त्यांचा पहिलाच प्रवास असून, हे लेख तद्विषयकच आहेत. त्यांनीं हिंदुस्थान व मलाया द्वीपकल्प यांमध्यें पुष्कळसा प्रवास केलेला आहे. ते जेथें जात तेथें नजरेस पडलेल्या गोष्टी व अनुभविलेले प्रसंग यांच्या सूक्ष्म निरीक्षणाच्या कामीं ते आपल्या नेत्रांचा व बुद्धीचा चौकसपणें उपयोग करीत. इंग्रजी भाषण व लेखन यांच्यामध्यें त्यांची पारंगतता वर्णनीय आहे. मुंबई इलाख्यांतील डायरेक्टर ऑफ् अग्रिकल्चर, मेहेरबान जी. एफ्. कीटिंग, सी. आय्. ई., यांनीं लिहिलेल्या "रूरल इकॉनमी इन् दि डेकन" आणि लॉर्ड सिडेनह्याम, मुंबईचे गव्हर्नर, यांची मरहूम कन्या, मिस् व्हायोलेट क्लार्क, यांच्या 'लीव्हस्' नांवाच्या स्फुट कविता व गोष्टी, या पुस्तकांचीं भाषांतरें करून त्यांनीं तीं महाराष्ट्रांतील लोकांसाठीं प्रसिद्ध केलीं आहेत. ईस्ट इंडिया असोशियेशन पुढें त्यांनीं ता० २३ जून स० १९१३ रोजीं, 'ब्रिटननें हिंदुस्थानासाठीं काय केलें आहे ?' या विषयावर एक वर्णनीय निबंध वाचला. एशियाटिक रिव्ह्यूच्या जानेवारी स० १९१४ च्या अंकामध्यें त्यांनीं 'ए प्ली फॉर दि मराठा ब्राह्मण,' हा लेख उभयपक्षीं असलेला गैरसमज व दुजाभाव नाहींसा—निदान कमी—करण्याच्या उद्देशानें प्रसिद्ध केला आहे. ते उच्च वर्णाचे महाराष्ट्र ब्राह्मण असल्यानें त्यांचीं मतें महत्त्वाचीं व विचारणीय आहेत. कारण ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं ज्या तद्देशीय व महान् राजांची राजसत्ता हिरावून घेतली अशांपैकीं शेवटचे राजे लोक त्यांच्या जातीचे होते. अशा उच्च कुळांत त्यांचा जन्म झालेला व परस्थिति वर वर्णन केल्याप्रमाणें असल्यानें त्यांच्या मताला विशेष जोर येणें योग्यच आहे. हिंदुस्थानांत आजकाल स्थापित असलेल्या ब्रिटिश राज्यसत्तेविरुद्ध पुष्कळ प्रांतांमध्यें बरीच प्रतिकूलता व

नाराजी आहे, हें खरें; तरी पण ती सत्ता बलवत्तर व कायम राहाण्या-वरच हिंदुस्थानाचें भावी स्वास्थ्य आणि कल्याण निःसंशय व पूर्णपणें अवलंबून आहे, असेंच त्यांचें मत आहे.

डील क्यासल् येथें रहात असतांना त्यांचा मला प्रत्यक्ष सहवास घडला. त्यांनीं जवळच एक घर भाड्यानें घेतलें होतें. आंग्लोइंडि-यन मंडळीचें लक्ष यावेळीं पूर्णपणें वेधून टाकणाऱ्या अनेक विषयां-वर त्यांचीं माझीं पुष्कळ वेळ मनोहर संभाषणें झालीं. त्यांत त्यांचा बहुश्रुतपणा, त्यांचा निःपक्षपात, व हिंदुस्थानाला इंग्रजी अमलापासून प्राप्त होणाऱ्या फायद्याचें पुरें महत्त्व ओळखून तें व्यक्त करून दाखविण्याची उघड इच्छा, इत्यादिकांचा मजवर पुष्कळच परिणाम घडला. तसेंच हिंदुस्थानाचा राज्यकारभार हल्लींपेक्षां अधिक प्रमाणानें हिंदी लोकांच्या हातीं असणें इष्ट आहे, व त्यांच्यावरील देखरेख व त्यांना योग्य सल्ला देण्याचें काम अल्पसंख्याक युरोपियन लोकांकडून व्हावें, असें आपलें मतही त्यांनीं मोकळेपणीं सांगितलें.

'ब्रिटिश लोकांचा जीवनक्रम व चारित्र्य' या पुस्तकाच्या पर्या-लोचनानें एक तर त्यांची अत्युत्तम व अर्थपूर्ण इंग्लिश भाषासरणी, व दुसरें, त्यांतील वर्णनामध्यें व्यक्त होणारा विलक्षण चाणाक्षपणा व ग्राहकता, यांचा वाचकांच्या मनावर चांगला ग्रह झाल्यावांचून राह-णार नाहीं. या लेखांमध्यें ज्या नानाविध विषयांचा समावेश झाला आहे त्यांचा परस्पर विशेषसा संबंध आहे, असें नाहीं. तरी युरोपाशीं किंवा तेथील सुधारणेशीं प्रत्यक्ष पूर्वपरिचय मुळींच नसलेल्या गृह-स्थाच्या मनावर झालेल्या परिणामाचें निदर्शन, या नात्यानें ते विचा-रणीय व मनोहर आहेत. ज्या दृष्टीनें हीं नानाविध वर्णनें लिहिलीं आहेत, ती सामान्य युरोपियन लोकांच्या दृष्टीहून भिन्न आहे, तरी त्यांनीं काढलेले निष्कर्ष बहुतेक सुशिक्षित युरोपियन लोकांना पूर्वींच पूर्णपणें संमत झालेले असे आहेत. युरोपखंडांतील जीवनक्रम एकाच तऱ्हेचा व एकमेकांसारखा आहे असा ग्रह युरोपमध्यें प्रवास केले-

त्या नामांकित हिंदी गृहस्थांपैकीं बहुतेकांचा झालेला आहे. युरोपामध्यें येथून तेथून धर्म, वेश, पेहराव, चाली, रीती, वगैरे बाबतींत बरेंचसें साम्य आहे. या संबंधांत साऱ्या युरोपांत मिळून जितके भिन्न प्रकार आढळतील त्यांहून अधिक भिन्नता हिंदुस्थानांतील मोठ्याशा कोणत्याही शहरामध्यें नजरेस येईल असें त्यांचें ह्मणणें पडतें. मला वाटतें हें ह्मणणें अगदीं खरें आहे. धर्म, जाती, राष्ट्रीयपणा, चालीरीती, व परंपरा, इत्यादिकांमधील ही विलक्षण भिन्नता हेंच त्या देशांत वास करणाऱ्या ग्रेट ब्रिटनच्या साम्राज्यसत्तेचें अवश्य कारण व तिच्या सामर्थ्याचें मूळ होय.

बाबासाहेबांच्या मतांसंबंधानें विचार करतां, इंग्रज सरकाराला मान्य असलेली धर्मपद्धति आणि प्रेस्बिटेरियन् व वेस्लियन् पंथ यांच्यामधील धर्मविषयक निरनिराळ्या पंथांचें बाबासाहेबांनीं जें वर्णन केलें आहे, त्याच्याहून थोडक्यांत पण पुरें विशद असें वर्णन क्वचितच करतां येईल. लंडन शहरांतलि पोलिसाविषयीं त्यांना फार कौतुक व आदर वाटतो. हौस आफ् कॉमन्स सभेचें वर्णन करितांना त्यांनीं 'तेथील वादविवाद ऐकून, लोकमतप्रवर्तनाचें काम जणों पार्लमेंट सभेंतील भाषणांच्या द्वारेंच केलें जातें, अशी माझी समजूत झाली,' असें लिहिलें आहे, तें किती तरी समर्पक आहे !

इकडील चालीरीती, व पेहरावाच्या तऱ्हा, यांविषयीं त्यांनीं निःपक्षपाती वृत्ति धरिली आहे. इकडील तरुण बांड मंडळीनें असले ताठ, उंच, सफेत 'कॉलर'–गळबंद–आणि आंवळ व चिंचोळे बूट वापरीत–व त्यांच्यापासून होणारा त्रास सोशीत–राहावें, याविषयीं त्यांनीं आश्चर्य प्रगट केलें आहे. एतद्विषयक अशीच टीका इतर पुष्कळ ठिकाणांहून–त्यांतही विशेषतः, हा त्रास सोसावा लागणाऱ्या मंडळीच्या तोंडून सुद्धां–ऐकूं येत नाहीं, असें नाहीं. तसेंच अलीकडील स्त्रियांच्या पेहरावाच्या नाना तऱ्हांविषयींही त्यांचें मत

विशेष अनुकूल आहे असें नाहीं. 'मान उघडी, चालण्यास अवघड पडतें इतक्या कमी झोळाचा झगा, उभा चिरलेला व बाजू खुल्या असल्यामुळें अंगाबरोबरच्या आंतील कपड्याची तऱ्हा स्पष्ट दाखविणारा पोषाख '–याविषयीं त्यांनीं ' या गोष्टी खरोखरच अप्रशस्तपणा व वैलक्षण्य यांच्या कळस होत, ' अशी टीका केली आहे. स्त्रियांच्या पोषाखांमध्यें दिसून येणारा पोरकटपणा व असभ्यपणा नापसंत असणाऱ्या सर्व लोकांना ही टीका मान्य होईल. समाजांत वरिष्ठ दर्जास जाण्याची हांव धरणाऱ्या लोकांची महत्त्वाकांक्षा, तसेंच आपणापेक्षां वरिष्ठ दर्जाच्या लोकांचें अनुकरण करणाऱ्या, आणि नसता डौल आणून व मोठ्या लोकांचें दासवत् अनुकरण करून, आपल्या खऱ्या स्थितीबद्दल लोकांवर खोटा ग्रह उत्पन्न करणाऱ्या कित्येक लब्धप्रतिष्ठित लोकांचा वेडगळपणा या गोष्टीही त्यांच्या टीकेस पात्र झाल्या आहेत.

आंग्लोइंडियन कामगार इंग्लंडांतल्यापेक्षां हिंदुस्थानामध्यें अधिक डामडौलानें राहतात, असें हिंदी लोक आग्रहानें व नेहमीं ह्मणतात तें अयथार्थ आहे, असें त्यांचें ह्मणणें आहे. उलट पक्षीं हिंदुस्थानांत नोकरी पतकरून राहण्यांत, या लोकांना तिकडे मिळणाऱ्या सुखापेक्षां बऱ्याच सुखासमाधानाच्या गोष्टींचा त्याग करावा लागतो, असेंही त्यांनीं स्पष्ट ह्मटलें आहे.

एका गोष्टीविषयीं त्यांनीं जी तक्रार अथवा जो खेद प्रदर्शित केला आहे, त्याविषयीं सर्वांना सहानुभूतीच वाटेल, असें मला वाटतें. मोठमोठ्या हुद्द्यावर असलेले आंग्लोइंडियन कामगार हिंदुस्थानांत कामावर असतांना त्यांनीं मिळविलेल्या बिनमोल अनुभवाचा साऱ्या देशाला अत्युत्कृष्ट लाभ होतो, हें त्यांनीं स्पष्टपणें कबूल केलें आहे. पण त्याबरोबरच त्या लोकांची नोकरी पुरी होतांच बहुतेक सर्व अधिकारी आपल्या साऱ्या अनुभवासह विलायतेस परत जातात. यामुळें

या सुप्रसिद्ध राज्यकार्यकुशल मंडळीच्या अनुभवाच्या फायद्याला हिंदुस्थान देश मुकतो. ते नोकरी सोडल्यावर सुद्धां, हुकुमत चालविलेल्या व अनुभव मिळविलेल्या देशांतच कायम राहात गेले तर त्या देशाला त्यांच्या अनुभवाचा लाभ खचित मिळेल. ही एक उणीव–आणि मला वाटतें अपरिहार्य उणीव–आहे. जेथील राज्यव्यवस्थेमध्यें वरिष्ट अधिकारी मंडळी जगाच्या एका भागांतून दुसऱ्या दूर जागीं न्यावी लागते, तेथें ही उणीव दूर होणें शक्य नाहीं. हिंदुस्थानांत मोठमोठीं हुद्द्याचीं कामें केलेल्या बड्या युरोपियन अंमलदारांपैकीं बहुतेकांना राहिलेलें आयुष्य त्यांच्या जन्मभुमीमध्यें न घालवितां येण्याची सुसाध्य अशी एखादी युक्ति मला तरी आढळत नाहीं.

धार्मिक शिक्षणापासून अगदीं फारकत झालेल्या अशा राष्ट्रीय शिक्षणपद्धतीच्या संबंधानें बाबासाहेबांचीं मतें, या देशांतील शिक्षणविषयावर ठाम मत देण्याला समर्थ, अशा बहुतेक गृहस्थांच्या विचाराहून भिन्न नाहींत.ते ह्मणतात, "आमच्या मुलांना दिलें जाणाऱ्या शिक्षणानें त्यांच्या अंतःकरणांत धर्माविषयीं व आपल्या परंपरेविषयीं आदर राहात नाहीं. हा जो अनिष्ट परिणाम होत आहे त्याकडे आमचें लक्ष अधिकाधिक तिरस्कारबुद्धीनें वेधलें जात आहे. अलीकडे हिंदुस्थानांत घडून आलेले अत्याचार बऱ्याच अंशीं शिक्षण व धर्म यांच्यामधील फारकतीचेच प्रत्यक्ष परिणाम होत. मुलांना परमेश्वराचें भय बाळगण्याचें शिक्षणच मिळत नाहीं. त्यामुळें त्यांच्या मनांतून धार्मिक, राजकीय अथवा सामाजिक सत्तेविषयीं आदर व पूज्यभाव अगदींच नष्ट झालेले असतात ! धार्मिक शिक्षणाविषयीं हिंदुस्थान सरकारचें धोरण उघड उघड सतत तटस्थ वृत्तीचें असल्यानें शिक्षणक्रमामध्यें धार्मिक तत्त्वांचा अभाव प्रादुर्भूत झालेला आहे. सर्व देशभर हिंदी मुलांना दिल्या जाणाऱ्या शिक्षणक्रमामध्यें धार्मिक शिक्षणाचा थोडाबहुत तरी अवश्यमेव अंतर्भाव सरकाराकडून झाल्याशिवाय, या बाबतींत खासगी प्रयत्नापासून ह्मणण्यासारखी फलनिष्पत्ति होईल असें मला वाटत नाहीं."

'लोकमत' आणि 'ब्रिटन व इंडिया,' हे शेवटचे दोन भाग लहानसेच पण फार सुरेख लिहिलेले आहेत. पहिल्यांत ग्रेट ब्रिटनमध्यें लोकमत कसें तयार केलें जातें व त्याच्यावर आळा कसा ठेविला जातो, आणि दुसऱ्यांत आपल्या प्रचंड हिंदी साम्राज्याच्या भावी उत्कर्षासाठीं ग्रेटाब्रिटन व हिंदुस्थान, दोघांचें मिळून राजकीय धोरण कसें असावें, या विषयींची माहिती व चिकित्सा इतकी संकलित पण मार्मिक आहे कीं, त्यांच्यांतून थोडे बहुत विलग उतारे दिले तर, त्यांच्या पुर्त्या वाचनानें होणारा आनंद कमी होईल, सबब तसें करणें ठीक वाटत नाहीं परस्परांचा विचारविनिमय, समाईक वर्तन आणि एकरूपतेचें राजकीय धोरण, या बाबतींत प्राच्य व पाश्चिमात्य या दोघांच्याही समोर सकृद्दर्शनीं एक मुख्य अडचण उभी राहते. ती ही कीं, या संबंधांतील शब्द व क्रिया, त्यांच्या परिस्थितींतून वेगळ्या काढल्या तर, त्या क्वचितच समानार्थद्योतक होतात. ही मुख्य व तत्वाची गोष्ट ग्रेट ब्रिटनचा हिंदुस्थानाशीं असलेल्या संबंधाचा व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या नानाविध राजकारणांचा विचार करीतांना नेहमीं लक्षांत बाळगणें अवश्य आहे. इकडील लोक व चालीरीती यांविषयीं या पुस्तकांत केलेल्या सर्वोत्कृष्ट टीकेमध्यें हा प्रमुख विचार सर्वतोपरी जागरूक आहे. थोर कुळ व योग्यता अंगीं असून जे आपल्या संस्थानाचे यशस्वी अधिपती आहेत, अशा उत्तम शिक्षण मिळालेल्या व उच्च कुळामध्यें जन्म झालेल्या एका हिंदुस्थानवासी ब्राम्हणानें हें पुस्तक लिहिलें असल्यानें त्यांच्या शब्दाला असाधारण अर्थपूर्णता व महत्त्व प्राप्त झालेलें आहे.

दि क्यासल, डील.<br>ता. ४ मार्च स. १९१४. } जॉर्ज हॅमिल्टन्.

# प्रास्ताविक अग्रलेख.

मला मुख्त्यारी मिळून संस्थानचा पूर्ण अधिकार माझ्या हातीं सोंपला जाण्यापूर्वी स० १८९१ सालीं मी उत्तर हिंदुस्थानांतील निरनिराळीं स्थळें पहात पुष्कळसा प्रवास केला. त्या वेळीं आपल्या इष्टमित्रांच्या उपयोगासाठीं मीं रोजनिशी ठेविली होती. स० १८८३च्या डिसेंबर महिन्यांत कलकत्ता येथें सकलराष्ट्रीय प्रदर्शन झालें. तें पाहण्याकरितां माझी लहानपणची प्रथमची सफर झाली. ती मला आठवते. आमच्या कॉलेजच्या प्रिन्सिपाल साहेबांनीं मला त्या प्रदर्शनाचा वर्णनात्मक निबंध लिहिण्याला सांगितलें. हिंदुस्थानांत अशीं प्रदर्शनें अपूर्व, त्यांतून हें सकलराष्ट्रीय प्रदर्शन. यामुळें माझा तो छोटा लेख विद्यार्थ्यांनींच नव्हे पण शिक्षक व प्रोफेसर यांनींही उत्सुकतेनें वाचल्याचें मला चांगलें स्मरण आहे.

दिल्ली येथील राज्यारोहणप्रसंगींचे दोन प्रचंड दरबार अशासारखे समारंभ, तसेंच हिंदुस्थानांतील प्रेक्षणीय स्थळें पाहणें, यासाठीं प्रवास करण्याचे मला प्रसंग आले. पण स. १९१२ च्या उन्हाळयामध्यें मीं मलाया द्वीपकल्प व जावा बेट इकडे जी सफर केली ती फारच फायद्याची झाली. समुद्रपर्यटणानें स्वतःच्या प्रकृतीवर काय परिणाम होतो हें पाहण्याच्या हेतूनेंच ही सफर मीं मुख्यत्वेंकरून केली होती. तरी तिच्यापासून मला अन्यतऱ्हेनें पुष्कळ उपयोग झाला. त्याच्या-

मुळें, या पुढील लेखांमध्यें वर्णन केलेल्या बऱ्याच दीर्घकालिक अशा युरोपांतील प्रवासाचा मार्ग सुलभ झाला.

स्वतःच्या प्रवासासंबंधाचीं टांचणें करून ठेवून परत आल्यावर त्यांच्यावरून आपल्या मंडळीला त्यासंबंधीं माहिती देण्याची माझी पूर्वींपासून वहिवाट आहे. माझ्या सर्व सफरींमध्यें ही सफर अधिक विस्ताराची व मनोवेधक होय. तिच्यांत मिळालेली माहिती व अनुभव, पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्याला, युरोपामध्यें पुष्कळच साधनें आहेत. हें जाणून माझ्या अनेक मित्रांनीं हें काम करण्याविषयीं मला आग्रह केला. तेव्हां स्वतःविषयीं साशंक असूनही मी तें करण्याला कबूल झालों. गडबडीनें पृथ्वीपर्यटन करणारे लोक हिंदुस्थानांत येऊन या देशाविषयीं आपले अनुभव प्रसिद्ध करणारीं पुस्तकें लिहितात, त्यांत यथार्थ वर्णन नेहमींच पाहण्यास सांपडतें असें नाहीं; इतकेंच नव्हे, तर अशा पुस्तकांतील चुकांमुळें गैरसमज उत्पन्न होण्यासारखा नसता तर त्या निव्वळ हास्यास्पद सुद्धां वाटल्या असत्या. असलीं विचित्र उदाहरणें समोर असूनही, अवघ्या सात महिन्यांच्या विलायतच्या प्रवासांत मनावर झालेल्या संस्कारांचें वर्णन पुस्तकरूपानें जनतेपुढें ठेवणें, हें तरी साहसच. वस्तुस्थितीचें यथार्थ वर्णन करण्यांत मजकडून झालेले प्रमाद व दोष आढळून येतील, त्यांविषयीं वाचकांनीं गय करावी असें माझें मागणें आहे. यांत दिलेलीं मतें केवळ माझीं स्वतःचीं आहेत. तीं प्रतिनिधिपणानें पुढें केलेलीं नव्हेत हेंही लक्षांत ठेवावें, अशी माझी विनंती आहे.

मी वर्णन केलेल्यांपैकीं पुष्कळशा बाबती सामान्य सिद्धांताच्या आहेत, असें कांहीं वाचकांना वाटेल. विषयाची निवड करणें मला बरेंच कठिण गेलें. कारण, माझी वाचकमंडळी ब्रिटिश, तशीच हिंदीही असणार, हें मी जाणून होतों. माझा प्रयत्न विशेषतः हिंदी लोकांसाठीं लिहिण्याचा, इंग्रजांकरितां नव्हे. त्यांत कितपत यश आलें आहे, तें ठरविण्याचें काम मी वाचकांवर सोंपवितों. ब्रिटिश

जीवन व चारित्र्य, याविषयींच मीं मुख्यतः चर्चा केली आहे. तरी हिंदुस्थानांतून मी थोडे दिवस इंग्लंड सोडून इटाली व स्विट्झरलंड देशांत जाईपर्यंतचें वृत्त पूर्ण करण्यासाठीं, व हे लेख साग्र व्हावे ह्मणून, विलायतच्या सफरीमध्यें व लंडनला जातांना वाटेंत फ्रान्स देशांत मिळालेला अनुभव व संस्कार, यांच्या विषयींही प्रथम भागामध्यें वर्णन केलें आहे

या पुस्तकाला लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन् यांनीं कृपा करून उपोद्घात लिहून देण्याची तसदी घेतली, याबद्दल त्यांचे येथें मी आभार मानीत आहें. त्यांनीं पुष्कळ दिवसपर्यंत हिंदुस्थानच्या सेक्रेटरी ऑफ स्टेटचें काम उत्तम तऱ्हेनें केलेलें-अशा या लॉर्ड साहेबांचा सहवास घडला व त्यांच्याशीं हिंदुस्थानाविषयीं चर्चा व संभाषण करण्याचा प्रसंग मिळाला हा एक अलभ्य लाभच होय. विलायतेंतील बहुजन-समाजापैकीं बहुतेकांना या त्यांच्या प्राच्य साम्राज्यविषयक प्रश्ना-संबंधाची माहिती वस्तुतः असत नाहीं, ही गोष्ट खरी. तरी सरकारी नात्यानें, हल्लीं किंवा पूर्वीं हिंदुस्थानाशीं संबंध असलेल्या इंग्रज लोकांना या प्रश्नासंबंधानें माहिती तंतोतंत असते, हें पाहून आपलें मन आश्चर्यचकित झाल्यावांचून रहात नाहीं.

आणखी एका सद्गृहस्थांचे-सर जॉर्ज बर्डवुड यांचे-मनापासून आभार मानणें अवश्य आहे. त्यांच्याशीं निकट परिचय होण्याचा प्रसंग आला याचा मला मोठा आनंद वाटला. कारण, माझ्या पूर्व-वयांत त्यांचे बंधु न्यायमूर्ती एच्. एम्. बर्डवुड साहेब कांहीं वर्षें मुंबई सरकारचे एक कौन्सिलर होते. त्यांचा व माझा निकट संबंध घडण्याचा बहुमान मला मिळाला होता. सर जॉर्ज यांनीं हिंदुस्थान सोडल्याला पुष्कळ वर्षें झालीं. तरी त्यांच्या या जन्मभूमीसंबंधीं (हिंदु-स्थान ही त्यांची जन्मभूमि आहे.) त्यांचें प्रेम व सहानुभुति हीं पूर्ववत् जागृत आहेत. हिंदुस्थानांत अलीकडे इतकी चळवळ व मूर्खपणाचे प्रकार घडून आले तरी, आपल्या वृद्धापकाळीं आमच्या ब्राह्मणजाती,

त्यांचे विविध आचार व धर्मकर्म, यांना ते पूर्ववत् भक्कम पाठिंबा देतच आहेत. अशा त्यांच्यासारख्या विख्यात, सर्वमान्य, व सर्वत्र वजन असलेल्या सद्गृहस्थांची भेट झाल्यानें मनाला फारच आनंद व उत्साह वाटला. हिंदुस्थानविषयक ग्रंथ प्रसिद्ध करणारे नामांकित प्रकाशक, मि० एफ्. एच्. ब्राउन, यांनीं कृपा करून, मी परत येण्यास निघाल्यानंतर, हें पुस्तक नीटपणें छापलें जाण्याची जबाबदारी पतकरिली, याबद्दल मी त्यांचा मोठा ऋणी आहें.

मुंबई इलाख्याच्या पोलिटिकल खात्यांतील मे० क्याप्टन ल्यांग आणि मिसेस ल्यांग, यांनीं सौ० राणीसाहेबांचा व माझा प्रवास सोईस्कर व सुखदायक करण्याच्या कामीं अत्यंत श्रम घेतले. क्याप्टन ल्यांग यांचा मला या पुस्तकाच्या संबंधानेंच नव्हे, तर युरोपांतील लांबलचक सफरींतील प्रत्येक प्रसंगीं मोठाच उपयोग झाला. त्यांनींच या सफरीचा कार्यक्रम तयार केला, त्यासंबंधीं सर्व व्यवस्था लाविली, आणि त्या व्यवस्थेनुरूप सर्व गोष्टी जुळवून आणिल्या. याबद्दल मी त्यांचे अत्यंत व मनापासून आभार मानितों. इंग्लंडांत असतांना ज्या अनेक कृपाळू मित्रांनीं मला पुष्कळशा गोष्टी पाहतां येण्याची तजवीज केली, आणि जणों मी त्यांच्यांतलाच एक आहें असें वाटण्यासारखें माझ्याशीं वर्तन ठेविलें, त्यांचाही मी फार ऋणी आहें.

हा लेख पुरा करण्यापूर्वीं मला, माझे प्रिय पुतणे रावसाहेब जोशी आणि लघुलेखक मि. एच्. व्ही. आश्टन, यांचेही आभार मानणें अवश्य आहे. त्यांनीं तत्परतेनें व एकनिष्ठपणें साहाय्य केलें नसतें तर मला हे लेख इतक्या जलदीनें व सहजपणें संपवितां येणें शक्य झालें नसतें.

लंडन, नोव्हेंबर १९१४. } नारायणराव बाबासाहेब,
चीफ् ऑफ् इचलकरंजी.

# भाग पहिला.

## समुद्रांतील सफर.

"'या भूपृष्ठाच्या प्रत्येक भागांतील कोनेकोपरे देखील प्रतिवर्षी जणों जवळ जवळ आणिले जात आहेत. आगगाडी व तारायंत्र यांनीं आपला विस्तार व आपला अंमल हळू हळू पण अधिकाधिक फैलावून मानवजातीच्या उन्नतीसाठीं शांततेच्या युगाचा उदय त्वरित होय, असें करण्याला प्रारंभ केला आहे. महासागराच्या विस्तीर्ण पृष्ठभागावर हांकारलें जाणारें प्रत्येक गलबत, व अज्ञात प्रदेशामध्यें बनविला जाणारा प्रत्येक नवा रस्ता, यांच्या द्वारें, त्या परमेश्वराचें अधिष्ठान तयार करणाऱ्या मंडळीच्या पवित्र परिश्रमाला जणों नवा हुरूप येतो. त्या अधिष्ठानाच्या पायाचा एकही दगड आपल्या हातून बसविला गेला तर सुद्धां ही थोर मंडळी धन्यता मानून शांतीच्या पदाला पोहोंचते."

आपलें घरदार, इष्टमित्र, आप्त, स्नेही, इत्यादिकांना सोडून फार दूरदेशच्या प्रवासाला निघणें हा एक मोठा कठीण प्रसंग होय; व अशा वेळीं मनुष्याच्या अगदीं अंतस्थ वृत्तींना भरतें आल्यावांचून राहतच नाहीं. विलायतेला जाण्याची मला भारी प्रबल इच्छा. तरी स० १९१३च्या वसंताच्या प्रारंभीं मीं आपल्या जन्मभूमीचा निरोप घेतला तो खेदावेगानेंच! मला

पोहोंचविण्यासाठीं मुंबईस धक्क्यावर किती तरी मंडळी आली होती. त्यांच्या शुभेच्छेचे प्रत्यक्ष द्योतक असे खरेच गाडीभर पुष्पगुच्छ व पुष्पहार मला अर्पण करण्यांत आले होते. स्नेहाची खरी किंमत व मनुष्यस्वभावांतील किती तरी चांगुलपणा यांची परीक्षा अशा वेळींच होते.

सर्वच नवें नवें, अतएव रमणीय, या नात्यानें 'यारा' आगबोटीवरील पहिले बरेच दिवस सुखासमाधानांत गेले. हा काल निवळ मोकळेपणाचा व स्वतंत्रतेचा. भोजनाच्या मधील वेळ मंडळीच्या मुलाखती, संभाषणें, आणि आगबोटीच्या डेकवरील मोकळ्या जागेवर मजेनें फिरणें, सवरणें यांत आनंदांत निघून जात असे. मधून मधून खेळ व इतर करमणुकीचे प्रकार यांची तरतूद होत असे. जातिविषयक फरक विसरून जाऊन बऱ्याच नव्या ओळखी झाल्या. जुन्या, फार दिवस अंगीं खिळून दाढर्य पावलेल्या, प्राच्य चाली सुटून, युरोपियन तऱ्हांची संवय लागण्याला अर्थांतच कांहीं दिवस लागले. ही सफर एक प्रत्यक्ष शिक्षणच.

आजकालच्या इंग्रजी आगबोटीवर कांहीं दिवस काढल्यानंतर या नवखंड भूमंडलावरील सर्वांत प्रमुख दर्यावर्दी राष्ट्राच्या सामर्थ्याची खरी कल्पना पूर्णपणें लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. फारच प्राचीनकाळचें हिंदुस्थान आणि हल्लींचें ग्रेट ब्रिटन यांच्यामधील फरक मुख्यत्वें दिसतो, तो यांतच.

प्राचीनकाळीं एशियाखंडामध्यें खरें उद्भूत झालेलें पहिल्या प्रतीचें साम्राज्य हिंदी आर्य लोकांचें. त्यांनीं प्राच्य दिग्भागामध्यें वसाहती स्थापन केल्या. ही गोष्ट माझ्या सं. १९१२ सालीं केलेल्या मलाया द्वीपकल्पाच्या सफरीमध्यें निदर्शनास आली होती. त्या आर्य लोकांच्या बुद्धिसामर्थ्याची एक कला मात्र जर या सागरापलीकडे वसाहती करणें कायम ठेवून, त्यांचा विस्तार करण्याच्या कामीं खर्चीं पडली असती, तर आपल्या त्या हिंदी साम्राज्याचा किती तरी विस्तार झाला असता !

पण हें विषयांतर झालें. या सफरीनें ग्रेट ब्रिटनचें वैभव व सामर्थ्य यांची मला फार चांगली कल्पना आली, एवढेंच सांगण्याचा माझा हेतु होता. आजकालची मोठीशी आगबोट म्हणजे एक लहानसें तरतें शहरच. तिच्यामध्यें सर्व गोष्टी अगदीं संकुचित प्रमाणावर असतात इतकेंच. आगबोट सर्व तऱ्हेनें सज्ज ठेवण्याला अगदीं नवे नवे शोध व तजविजी, आणि उतारूंना सर्व तऱ्हेची सोय, सौख्य व चैन सहज प्राप्त होण्याचीं सर्व साधनें तेथें जशीं केंद्रगत दृष्टीस पडतात. तींच शहरामध्यें निरनिराळ्या स्थळीं पसरलेलीं असतांना प्रेक्षकांच्या मनावर जो परिणाम होतो, त्यापेक्षां तो येथें पुष्कळच मनावर ठसतो. म्हणूनच नवख्या उतारूला अशी सफर एक तऱ्हेचें प्रत्यक्ष शिक्षणच होय, असें मीं म्हटलें आहे.

माझ्याशीं जें प्रेमळ वर्तन ठेविलें गेलें व सभ्यपणा दाखविण्यांत आला, आणि मला समाधान व आराम वाटण्यासाठीं

ज्या पुष्कळशा किरकोळ गोष्टी केल्या जात, त्या सर्वांमुळें मला फार संतोष वाटला. या ब्रिटिश लोकांच्या अगदीं प्राचीन-काळच्या स्थितीच्या उपलब्ध वर्णनाच्या मानानें, त्यांच्या या विसाव्या शतकामध्यें त्यांनीं बहुतेक प्राच्य राष्ट्रांतील लोकां-इतपत सभ्यपणा व सफाई संपादन केली आहे, असें दिसून येतें. पण प्रकाशाप्रमाणें खरी सुधारणा सुद्धां पूर्वेकडूनच पैदा होते, हें खरें नव्हे का ? या सफरीमध्यें आणि पुढेंही लोकांशीं झालेल्या संभाषणावरून मला असें आढळून आलें कीं, ब्रिटिश लोकांना हिंदुस्थानांतील महाभारताविषयीं यत्किंचितही माहिती नसते या गोष्टीचें मला बरेंच आश्चर्य वाटलें. कित्येक युगां-पूर्वीं, हिमालयाखालीं ज्वराचें मायघर अशा तराईमध्यें, किंवा नर्मदेच्या खोऱ्यामध्यें राहणारे, मूळचे जंगली लोक, यांच्याशीं समान स्थितींत सारें युरोप असल्या वेळीं, आम्ही लोक सुधारणेच्या बाबतींत किती पुढें गेलों होतों याची साक्ष त्या सुप्रसिद्ध महाकाव्यावरून पटते. महाभारताचा साऱ्या हिंदुस्थानांत प्रसार झाला होता, अशा काळीं युरोपांतील सारे रहिवासी जंगली लोकांहून क्वचितच अधिक सुधारलेले होते. त्यांना विद्या व कला अवगत नव्हत्याच. तत्त्वज्ञानाचें नांव सुद्धां ठाऊक नव्हतें.

युरोपांतील कांहीं प्राचीन शहरांचीं वर्णनें माझ्या वाचण्यांत आलीं आहेत. त्यांवरून, माझ्या मतें, तीं शहरें किंवा त्यांच्या जागीं आलेलीं आधुनिक नवीं शहरें, यांची आपल्या कडील

प्राचीन शहरांशीं मुळींच तुलना नाहीं. श्रीकृष्णाची द्वारावती नगरी–तिच्यांतील बागबगीचे, उपवनें, कालवे, आश्चर्यकारक राजमार्ग, घरांतील सुरेखसे सोपान, श्रीकृष्णाच्या महालांतील सहस्रमणिमय स्तंभ!–अशा या भव्य महालाच्या मानानें 'सायडेनह्याम' येथील 'क्रिस्टल् प्यालेस' कसा काय असेल याबद्दलची मला जिज्ञासा होती. युरोपांतील सुधारणा बहुतेक हिंदुस्थानांतूनच तिकडे गेलेली. धर्म बराचसा तिकडलाच, तत्त्वज्ञान तर निःसंशय तिकडलेंच नेलेलें होय. फक्त आम्ही भयप्रद अशा काळ्यापाण्याच्या बागुलबोवाचा पाडाव केला असतां, आणि स्पेन देशांत घुसून राज्यस्थापना करणाऱ्या त्या साहसी अरब लोकांप्रमाणें जर कां आपण झालों असतों तर,– आम्हीही केवढें तरी प्रचंड साम्राज्य करितों! पण हें व्हावयाचेंच नव्हतें! यावेळीं हें विस्तीर्ण ब्रिटिश साम्राज्य म्हणजे एक सर्वव्यापी, समर्थ, कनवाळू राष्ट्रमाता आहे व ती आम्हांला बरोबरीनें पूर्व आणि पश्चिम, दोन्ही दिग्भागांमध्यें साम्राज्यशक्तीचा उपभोग करूं देण्याला तयार आहे, असें मी समजतों, व मनःपूर्वक तिचें स्वागत करितों.

आमच्या सफरीमध्यें आगबोट जागजागीं थांबे. त्या स्थळांसंबंधानें कांहीं लिहिण्यालायक नवी माहिती मिळावी, अशी माझी मनापासून इच्छा होती. कारण, तीं स्थळें पाहून मला तसाच विलक्षण आनंद व आश्चर्य वाटलें. पण मजबरोबर

आगबोटींत असलेल्या युरोपियन सोबत्यांच्या दृष्टीनें तीं सर्व नेहमींच्या सरावांतलीं व अवश्यमेव लागणारीं, अतएव विशेष महत्त्वाचीं नव्हेत, अशीं ते समजत हें उघड दिसत होतें. उदाहरणार्थ एडनच घ्या. माझ्या बरोबरच्या मित्रमंडळीपैकीं बहुतेकांची एडन म्हणजे उष्ण ठिकाणांपैकीं एक होय, यापेक्षां अधिक कांहीं कल्पना असेल असें मला वाटत नाहीं. एकोणीस शतकांमागें रोमन राष्ट्राचा तेथें अंमल होता, हें त्यांच्यांतील किती कांना माहित असेल कोण जाणें! केप आफ् गुड होप ओलांडून, हिंदुस्थानाला सरळ गलबतांतून येण्याचा मार्ग पोर्तुगीज लोकांनीं शोधून काढला तोंवर, एशियाखंडांतील व्यापाराचे जिन्नस पश्चिमेस युरोपखंडभर फैलावण्याची मुख्य उतारपेठ, या नात्यानें हें मोठें बंदर होतें, या गोष्टीची कदाचित् लोकांना जास्त माहिती असावी. तेथें आगबोट कांहीं घंटे थांबावयाची होती. त्या अवकाशांत किनाऱ्यावर जाऊन, पोलिटिकल रेसिडेंट ( मेजर जनरल सर जेम्स् ए. बेल्ल ) व इतर कांहीं बड्या अधिकाऱ्यांच्या आम्हीं मुलाखती घेतल्या आणि शहरांतूनही फिरून आलों, व पाणी सांठवून ठेवण्याचीं प्राचीन चिरेबंदी टांकीं—सुप्रसिद्ध व शहाण्या सालोमन राजानें बांधलेलीं म्हणतात तींही—पाहून आलों.

हें शहर एका बंद पडलेल्या ज्वालामुखीच्या मुखावर वसलेलें आहे व तें दिसण्यांत फार रूक्ष आहे. तेथें निरनिराळ्या

जातींच्या लोकांचे पुष्कळसे लहान लहान बाजार आहेत. ते पाहून मला मौज वाटली. तेथें कांहीं हिंदी वस्ती आहे; अरबस्थानचा किनारा व आफ्रिका खंडांत वसाहत करणाऱ्या जातींचे लोक व बरेचसे युरोपियन लोकही आहेत. हें मुंबई सरकारचें अखेरचें दूरचें ठाणें आहे. त्यामुळें तेथें आम्हांला कांहीं अगदींच परक्यासारखें वाटलें नाहीं. तेथील लोकांना हिंदुस्थानी भाषा समजते. थोडेसे मराठी बोलणारे नोकर लोकही आम्हांला आढळले. मे. रेसिडेंट साहेबांनीं कृपा करून आपली मोटार वापरण्यास दिल्यानें आह्मांला मिळालेल्या फुरसतींतही मुख्य मुख्य स्थळें पाहून व थोडेसे जिन्नस खरेदी करूनही परत येण्याला सवड झाली. माझे जुने स्नेही मुंबईच्या पोलिटिकल खात्यांतील क्याप्टन रेली यांची माझी येथें भेट झाली. मला नेण्यासाठीं ते सामोरे आले व त्यांनीं मला पुढील युरोपांतील सफरीसंबंधीं बरीच उपयोगी व महत्त्वाची माहिती व सल्ला दिली.

एडनला मजबूत तटबंदी आहे. पण पूर्वेकडे जाण्याचें द्वार या नात्यानें त्याचें जें लष्करी महत्त्व आहे, त्या दृष्टीनें पाहिलें असतांना ही तटबंदी जितकी मजबूत असणें इष्ट आहे तितकी ती नाहीं, असें म्हणतात. किल्ले, तटबंदी व त्यांवरील तोफा पलीकडील टेकड्यांमध्यें गुप्तशा आहेत. त्या पाहून येण्याला वेळ नव्हता. टेकडीच्या माथ्यावरून किनाऱ्याचा व दरीमध्यें

वसलेल्या शहराचा देखावा फार सुरेख दिसतो. येथील वरिष्ठ वर्गांतील लोकांची वस्ती शहराच्या इतर भागापासून अगदीं पृथक् आहे. तिकडे जाण्याचा रस्ता एका बोगद्यांतून आहे. रस्त्यांमध्यें उंट विशेष. शिवाय, नेहमीं आढळणारीं गाढवें व बकरीं हीं दिसत होतीं.

पोर्ट–सैद येथेंही कांहीं घंटे फुरसत मिळाली. तेवढ्यांत आह्मी शहर पाहून आलों. येथें प्रत्यक्षतः नाहीं तरी मनुष्य-वस्तीच्या मानानें या भूमंडळावरील जुन्या तीन्ही खंडांचा संगम होतो. मुख्य भरणा अरबांचा; तरी सर्व राष्ट्रें व जाति यांचे प्रतिनिधि येथें आढळतात. प्रत्येक जातीचे गोट पृथक् आहेत. वस्ती अगदीं अलीकडील दिसते. तिच्यांत प्रेक्षणीय किंवा महत्त्वाचें कांहीं नाहीं. फार तर त्याच्यावरून युरोपियन शहराच्या रचनेची ढोबळ कल्पना येण्याजोगी आहे. रस्ते रुंद आहेत. परंतु त्यांची व्यवस्था व सफाई चांगली नाहीं. ब्रिटिश सत्ता स्पष्ट दृष्टीस पडते. शहर वसविणें व म्युनिसिपल व्यवस्था, यांच्या संबंधानें प्राच्य रहिवाशांना युरोपियन पद्धत व धर्ती शिकविण्याची जणों पहिली तालीम दिली जात असलेली येथें दिसून येते.

पण सुवेझच्या कालव्याचा उल्लेख करण्याचें वगळणें बरोबर होणार नाहीं. मिसर देशच्या फिरओन बादशहाच्या वेळीं इजिप्शियन लोकांनीं हा कालवा काढला असता—ज्यांनीं

पिऱ्यामिड्स बांधल्या त्यांना हेंही शक्य होतें—तर हिंदुस्थानाचा, सारें युरोप व विशेषतः ग्रेट ब्रिटन यांच्याशीं, संबंध निराळ्या तऱ्हेचा झाला नसता असें कोणी म्हणावें ! मी एवढें जाणतों कीं, प्राचीनकाळीं पाश्चिमात्य राष्ट्रांना पूर्वेकडील देशांशीं निकट संबंध असावा अशी नेहमीं भारी उत्कट इच्छा होती. त्या राष्ट्रांतील सर्वांत शहाणे लोकांना आमच्याकडून किती तरी गोष्टी शिकण्यासारख्या आहेत, याची चांगली जाणीव होती.

भूमध्यसमुद्र मला फार आवडला. त्यांतही त्यांतील गरम हवेचे भाग. तो समुद्र किती तरी विलक्षण व चमत्कारयुक्त आहे ! त्यांत शिरल्यावर माझ्या मनामध्यें पुढील कल्पनातरंग आल्यावांचून राहिले नाहींत. या समुद्राला भरती ओहोटी बहुतेक नाहींच ह्मणावयाची. या इतिहासप्रसिद्ध जलमार्गानें युगाचीं युगें सारखीं, इजिप्शियन सालोमन बादशहाच्या वेळचे यहूदी आणि अथीनियन या लोकांचीं तारवें, रोमन लोकांचीं गलबतें, विजयी व प्रतापी मुसलमान लोकांचीं तुर्की जहाजें, व्हिनीशियन लोकांचे गंडोले आणि शेवटीं ‘ नाईल ’ च्या लढाईंत विजय मिळविण्यासाठीं गेलेलीं ग्रेट ब्रिटनचीं लढाऊ मनवारें, किती तरी आलीं गेलीं ! त्याच्या दोन्ही तीरांवर रोमन लोकांचा अंमल गाजत होता. त्या काळासंबंधाचे विचार तर माझ्या मनांत आल्याखेरीज राहिले नाहींत. प्राचीन रोमन लोक म्हणजे तत्कालीन ज्ञात भूमंडळाचे ( व्यवहारी ) व्यापारी, असें कोणींसें

म्हटलें आहे. आणि ग्रेट ब्रिटनमध्यें हल्लीं असलेले लोक हे त्यांचेच कायदेशीर व खरे वारस आहेत हें खास !

परंतु व्यापाराच्या कामीं त्या वेळीं फक्त रोमन लोकच तेवढे पुढारी होते काय? मला वाटतें नाहीं ! आमच्यांतील एक वर्ण—वैश्य—वणिक्—वर्गच घ्याना, त्यांनीं सर्व तऱ्हेच्या व्यापार-धंद्याकडे लक्ष द्यावें, अशी त्यांना शास्त्राज्ञा आहे. त्यांनीं व्यवहारामध्यें पुर्ते प्रावीण्य संपादन केलें पाहिजे. रोमन लोक प्राचीन भूभागावरील बोहोरे बनले, त्यांच्या किती तरी पूर्वींच आमच्या वैश्यांना ही शास्त्राज्ञा मिळालेली होती. रोमन लोकांनीं राजकारण व व्यापार यांची सांगड घातली. हिंदुस्थानांत या दोहोंची फाटाफूट झाली, व त्यामुळें शेवटीं दोहोंचीही दुर्दशा झाली. आर्य लोकांच्या हातून घडलेल्या कित्येक चुकांपैकीं ही एक होय. तीच बहुधा त्यांच्या ऱ्हासाला कारण झाली असावी. आम्हां अलीकडच्या लोकांची परिस्थिति निस्संशय अधिक अनुकूल व फायद्याची आहे. आजवर सांठत आलेल्या शहाण-पणाची ठेव हल्लींच्या पिढीस परंपरेनें मिळालेली आहे. आणि कोणतीही गोष्ट पूर्वींपेक्षां किती तरी उत्तम रीतीनें करण्याचे निरनिराळे मार्ग आम्हांला लाभले आहेत. पण राष्ट्राला मोठेपणा येण्याला साधनभूत साहस, धैर्य, मानसिक बल, सार्वजनिक जोम, सत्यप्रेम, सद्वर्तन, व चोख व्यवहार इत्यादि सद्गुण अंगीं असतील त्यांनाच वरील फायद्यांची खरी किंमत आहे.

या मजेदार सफरीमध्यें मनावर झालेल्या या संस्कारामुळेंच, आजकालच्या एखाद्या ब्रिटिश लायनरनें—वास्तविक तरत्या महालानें—सफर करणें ह्मणजे एक प्रत्यक्षतः शिक्षण होय, असें मला निश्चयानें वाटलें. असल्या आगबोटी आतां बहुतेक प्रत्येक समुद्रावर फिरतांना आढळतात. त्या साऱ्या भूगोलाला अक्षरशः प्रदक्षिणा घालीत येरझारा करीत असतात. अशाच तऱ्हेचा हा विचार मनांत येऊन प्रत्येक हिंदी गृहस्थाला, आपणही, प्राचीन रोमन साम्राज्यापेक्षां पुष्कळच प्रचंड व विस्तृत, बहुतेक सर्वव्यापी, अशा साम्राज्याचे एक अंशतः घटकावयव आहों, याबद्दल अभिमान बाळगतां येण्याजोगा आहे.

मेसेनाच्या सामुद्रधुनींतून जातांना सिसिली बेटाच्या किनाऱ्यावर बार्सिलोना व इटालीच्या बाजूला रेज्जियो हीं शहरें आहेत. व युरोपांतील भूमीचें प्रत्यक्ष असें दर्शन येथेंच घडलें. पहाटेस आह्मी मेसेनाला पोहोंचलों, व लगेच आगबोटीच्या डेकवर गेलों. त्यावेळीं फक्त किनाऱ्यावरील कंदिलांच्या रांगांखेरीज कांहीं दिसलें नाहीं. इतके दिवे पाहून मला आश्चर्य वाटलें. आम्ही जणों मुंबईसारख्या एखाद्या मोठ्या शहराजवळच जात आहों असा भास झाला. उजाडलें तसें आम्हांला दोन्ही बाजूला इटालीचे आणि सिसिलीचे हिरवे गर्द किनारे व त्यांवरील आगगाडीच्या सडका, व मधूनमधून घरें असलेलीं शेतें आणि तेथील जागृति व हालचाली इत्यादि सर्व प्रकारचीं चिन्हें दिसूं

लागलीं. टेकड्यांच्या उताराावर भरदार, दाट व हिरव्याचार झाडींचें सौंदर्य पाहून मला चमत्कार वाटला. मोठमोठे खडकांचे सुळके खेरीज करून सारी जमीन लागण केलेली दिसली. अशा या सुंदर व हरितवर्ण वनश्रीचें दर्शन मनाला स्फुर्तिदायक होतें.

आमच्या प्राच्य दिग्भागांतून मी इकडे अनुपम सृष्टिसौंदर्य दृष्टीस पडेल या उमेदीनें आलों होतों. माझ्या पाहण्यांत आलेला सर्वच भाग या कल्पनेपेक्षां किती तरी अधिक सुंदर व प्रेक्षणीय होता. सार्डिनिया, कॉर्सिका व एल्बा—नेपोलियनच्या हद्दपारीची जागा—हीं सुप्रसिद्ध बेटें ओलांडल्यावर 'स्ट्रांबोली' ज्वालामुखी पर्वत दृष्टीस पडला. तो जोरांत असून त्याच्यांतून चोहींकडून धूर निघत होता. तरी पहाडाच्या उतारावर लागवड झालेली होती, ती व लगतच घरेंही दिसत होतीं. जरी तीं आम्हांला बरींच धोक्यांत आहेत असें वाटलें, तरी त्यावरून तेथील शेतकरी लोकांना तरी भय म्हणजे काय याची क्षिती नव्हती, हें अगदीं स्पष्ट दिसण्यासारखें आहे. तेथून निघाल्यावर आम्ही सुखांत आणि त्रास न होतां 'मार्सेलिस'ला जाऊन पोहोंचलों.

# भाग दुसरा.

## फ्रान्सचा दक्षिण भाग.

'हा आकाशाचा **अंडकटाह-घुमट**-किती तरी सुंदर दिसतो. आणि तसेंच हे उच्चनीच पर्वतभाग व सूर्यप्रकाशानें प्रदीप्त झालेला हा सागर!'

वर्ड्स्वर्थ.

'तटबंदी व बुरूज असलेलीं शहरें आणि जनसमूहाचा संकीर्ण नाद यांची आम्हांला मजा वाटते.'

मिल्टन.

मार्सेलिस बंदरांत उतरतांच तेथील रस्त्यांतील गर्दी व रहदारी, या गोष्टी आमच्या विशेष निदर्शनास आल्या. रहदारीच्या रस्त्यावर किती तरी गर्दी होती. सर्वांचे पोषाक एकजात काळसर रंगाचे होते. पूर्वेकडील शहरांमध्यें दृष्टीस पडणाऱ्या रंगी बेरंगी व चटकदार पोषाखांशीं तुलना केली असतांना हे जरा विलक्षण वाटले. रस्ते फरसबंदी आहेत. त्यांच्यावर बुटांचा टपटप आवाज होत असलेला चमत्कारिक वाटला. हिंदुस्थानांत लष्कर रस्त्यावरून जातांना असा आवाज ऐकूं

येतो. त्याचा आह्मांला प्रसंगविशेषीं परिचय आहे, नाहीं असें नाहीं. तरी पण आमच्याकडे बुटांची चाल नसल्यानें, ही निरंतरची टपटप चमत्कारिक वाटते. दुसरा एक नवीन प्रकार पाहण्यांत आला. शहरांतील मुख्य रस्त्यांतून घोडे जोडलेले मोठमोठे गाडे व त्यांच्यावर लादलेलीं पर्वतप्राय ओझीं ! कांहीं गाड्यांना तीन, चार, सहा घोडे हारीनें जोडलेले होते. प्राच्य देशांत घोड्यांऐवजीं बैल जोडतात. कारण, तिकडील जमीन व हवापाणी यांना तेच सोईवार आहेत.

साऱ्या फ्रान्स देशांत लोकसंख्येच्या मानानें मार्सेलिस शहर तिसरें, व बंदर या नात्यानें पहिलें आहे. तें मूळ फिनिशियन लोकांनीं वसविलें. सुएझचा कालवा चालू झाल्यापासून त्याचें महत्त्व पुष्कळच वाढलें आहे. पहिल्या दिवशीं आम्ही हैड्रॉलिक लिफ्टस्—पाण्याच्या दाबानें वर चढविले जाणारे मोठे पाळणे—मध्यें बसून '**नाट्र डाम डिला गार्ड**'च्या मंदिराला गेलों. हें मंदिर लहानच असून उंच पहाडीवर उत्कृष्ट स्थळीं बांधलेलें आहे. तेथून शहर, बंदर व आसपासच्या पहाड्या, यांचा देखावा फारच सुरेख दिसतो. या देवळांच्यावर व्हर्जिन् मेरी—मरियम्मा—ची मूर्ती आहे. ती ९० फूट उंच आहे. तिला सोन्याचा मुलामा केलेला आहे. त्यामुळें हें मंदिर आसपासच्या साऱ्या प्रदेशांत एक मुख्य व नाक्याचें स्थळ दिसतें. आंत कांहीं जागीं चित्रविचित्र व सुरेख जडावाचें काम ( मोझेइक् )

केलेलें आहे. स्थंडिलावर तऱ्हेतऱ्हेचे पक्षी व दुसरी सुंदर नक्षी केलेली आहे. येथें दोन तांबडे दिवे सारखे जळत असतात. त्यांवरून मला आपल्याकडील देवालयांतल्या नंदादीपांचें स्मरण झालें. हें पवित्र स्थळ पाहून खालीं आल्यावर, समुद्राच्या कांठावरील प्रशस्त राजमार्गावर फेरा मारून आलों. या रस्त्यावर, समुद्रकांठीं सुरेख बंगले बांधलेले आहेत. या रस्त्यावर फिरणें फार बहारीचें वाटतें. येथील संपन्न गृहस्थांनीं उन्हाळ्यांत येऊन राहण्याला, हे बंगले उपवनवाटिकांसारखे बांधलेले आहेत. दुसऱ्या दिवशीं आह्मी **'रोकफरे'** नांवाच्या सुप्रसिद्ध पुलाजवळून गेलों. तो दोन पहाड्यांमध्यें एका कालव्यावर बांधलेला आहे. हें प्रचंड काम तिमजली आहे. प्रत्येक मजल्यांत सोळा सोळा कमानी आहेत. त्यांची लांबी ४५० फूट आणि एकंदर उंची २५० फूट आहे. शिल्पकलेचें हें एक अत्युत्तम व अप्रतिम विजयतोरणच होय. मला सृष्टिसौंदर्याची भारी आवड. त्यामुळें या शहराबाहेरील आसपासचा देखावा मला मोठा मनोहर वाटला. युरोपाच्या पश्चिम भागांत हिरवींगार शेतें आणि त्यांच्या सभोंवार असणारीं कुंपणें यांची आमच्या नेत्रांना अद्यापि पुर्ती संवय झालेली नव्हती. किंचित् उंच सखल असलेलीं सपाट मैदानें यांचा तो चित्रविचित्र देखावा भारी आल्हादकारक होता. मार्सेलिसपासून तों थेट पारिसपर्यंतचा फ्रान्स देशाचा भाग आह्मांला खरोखर फार मोहक वाटला.

जागजागीं वळणावळणावर सृष्टिसौंदर्याचे नवे नवे प्रकार दिसून येत होते. हिंदुस्थानांत रूक्ष भाग फार. त्याच्या उलट इकडे जमिनीचा तुकडान् तुकडा लागवड केलेला, पहाडयांचे उतार व बाजू टुमदार घरांनीं अंकित झालेल्या, व प्रतिस्थळीं हालचाल आणि सुखसमाधान निदर्शनास येत होतें. त्यावरून पाश्चिमात्यांच्या सुधारणाविषयक कल्पनेचें पूर्ण स्वरूप जणों स्पष्ट दिसत होतें. हिंदुस्थानांत नदीकांठीं नेहमीं दृष्टीस पडणारा देखावा मात्र इकडे पाहण्यांत येत नाहीं. पाण्याच्या घागरी घेऊन जाणाऱ्या बायका, पात्रांत गुरें धुतलीं जात असलेलीं, नदींत स्नानें उरकून संध्यावंदन व प्रार्थना करणारे आणि कांठावर पूजापाठ करीत असलेले लोक, यांपैकीं कांहींच आढळत नाहीं. नदीकिनाऱ्यावर सर्वत्र सामसूम होतें. हिंदुस्थानांतील नद्यांच्या कांठीं नजरेस पडणारी हालचाल व गडबड यांच्या अगदीं उलट वरील प्रकार होय.

तरी फ्रान्स व इंग्लंडमध्यें मीं निरनिराळ्या ठिकाणीं प्रवास केले, त्यांतील प्रत्येक वेळचा प्रवास विलक्षण मनोहर होता. हिरव्यागार व दाट तृणांकुरांनीं आच्छादित भूभाग, चकचकीत नीलवर्ण समुद्र, घनदाट वृक्षवल्लींनीं झांकून गेलेले पर्वत व पहाड, मरकत मण्यांनीं गच्च भरल्यासारखींच जणों शोभणारीं खोरीं व दऱ्या, शांत खेडीं आणि गजबजलेलीं शहरें, व तेथील मनाला मोहून टाकणारे नवे नवे देखावे आणि निरनिराळे

नाद, हे एका मागून एक दृष्टीस पडत व ऐकूं येत गेल्यानें, त्या सर्वांचा माझ्या मनावर फारच नामी व कायमचा परिणाम झाला.

'ए. लि. प्राव्हेन्स' हें साऱ्या युरोपांत अति प्राचीन शहरांपैकीं एक शहर आहे. त्यांतून जातांना मला ग्रीक, रोमन व गाल, या लोकांचें स्मरण झालें. फ्रान्स देशांत तीन निरनिराळीं राज्यें होतीं, त्यावेळीं हें एक राजधानीचें ठिकाण होतें. पुष्कळशा प्रेक्षणीय स्थळांवरून त्याच्या गतवैभवाची अद्यापि साक्ष पटते. तेथील टौन हाल चौदाव्या शतकांत बांधलेला आहे. त्याच्यावरून आम्ही एका प्राचीन देवालयाच्या द्वाराशीं पोहोंचलों. यांतील कांहीं भागांत मूळच्या एका जुन्या मूर्तिपूजकाचें मंदिर होतें. त्यानंतरचे, यांतील कांहीं भाग अगदीं अलीकडील ह्मणजे अकराव्या शतकांतील व कांहीं चौदाव्या शतकांतील आहेत. दरवाजे ओक लांकडाचे आहेत. त्यांच्यावर नक्षीदार कोरींव काम फारच सुरेख केलेलें आहे. तें कालगतीनें बिघडूं नये म्हणून विवक्षित प्रसंगांशिवाय ते नेहमीं आच्छादिलेले असतात. हें मंदिर लहानसेंच आहे. पण त्याच्यांत बरींच सुरेख चित्रें आहेत. आंतील छतावरही फारच सुंदर नक्षीदार चित्रकलेचें प्रदर्शन झालेलें आहे. पूर्वींच्या मूर्तिपूजकांच्या वेळच्या भागांत हल्लीं 'बाप्टिस्ट्री' आहे. तिच्यामध्यें रोमन क्याथलिक धर्मांतील सात 'साक्रेमेंट्स्'चीं प्रेक्षणीय चित्रें काढलेलीं आहेत. या मंदिरांतील

कांहीं पडदे लंडन येथील जुन्या सेंट पॉलच्या देवळांतून येथें आणलेले आहेत. हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. रस्त्यावरील एका कारंज्यांत एक ऊन्ह पाण्याचा झरा आणून सोडलेला पाहून मला नवल वाटलें.

दुसऱ्या दिवशीं आह्मी मार्सेलिस सोडून 'लीयॉन्स'ला जाण्यास निघालों. गाडीमध्यें गर्दी फार होती. तिच्यामुळें त्रास वाटला. पण आसपासचा सुंदर देखावा पाहण्यास सांपडल्यानें तो पार भरून आला. मार्ग बहुतेक ऱ्होन नदीच्या कांठाकांठानेंच असल्यानें तो फारच रमणीय दिसत होता. पहाड, दऱ्या, खोरीं, अतिशय सुरेख व हिरवींगार दिसत होतीं. पोपांचीं आपसांत भांडणें चालू होतीं, आणि फ्रान्स देशांत अराजक स्थिति सुरू झाली असतांना दरम्यानच्या काळांत पोपची राजधानी म्हणून सुप्रसिद्ध असलेलें 'अव्हिग्नान' शहर मागें टाकल्यानंतर आम्हांला उत्तमोत्तम द्राक्षांच्या बागा लागल्या. या बागा जरी रम्य होत्या तथापि त्या पाहून, असली ही सुपीक जमीन, असे ऐषआरामाचे पदार्थ पैदा करण्याऐवजीं, मनुष्यमात्राच्या जीवनाला अवश्य असे पदार्थ, उत्पन्न करण्याकडे लागती तर किती चांगलें होतें, असा माझ्या मनांत विचार आला.

लीयॉन्स येथें आह्मी दोनच दिवस राहिलों. तेथें तयार होणाऱ्या रेशमाच्या मालाविषयीं हें शहर प्रसिद्ध आहे. तेथील लोकसंख्या व व्यापार पारिसच्या खालोखाल आहे. या शहरा-

जवळून वळणानें वहात जाणाऱ्या ऱ्होन व सोन या नद्यांचा या शहराजवळच संगम झाला असल्यानें शहराचा देखावा फार रमणीय दिसतो. लीयॉन्स येथें आह्मीं जीं प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं त्या सर्वांत 'नाट्र डेम' व 'फूरव्हायर' टेकडीवरील मिनारा, हीं आह्मांस फारच मजेचीं वाटलीं, त्याच्यावर आह्मी लिफ्ट रेलवेनें चढलों. हें मंदिर फारच मोठें व भव्य आहे. सारें काम इटाली देशांतील संगमरवराचें आहे. तें बाहेरून विशाळ व भव्य दिसतें. आंतील काम त्याहूनही उत्तम व सुरेख आहे. त्याच्यांत मुख्य मूर्ती व्हर्जिन मेरीची आहे. तिच्या डोळ्यांत बसविलेल्या हिऱ्यांची किंमत साडेबावीस लाख रुपयांवर आहे, म्हणे. बैठ्या खांबांवर उभे केलेले सफेत संगमरवराचे पुतळे, रंगी बेरंगी नक्षीदार काम केलेल्या तावदानाच्या खिडक्या, आणि अप्रतिम चित्रकारी केलेल्या भिंती व छत, यांच्यामुळें ही पवित्र इमारत धार्मिकरीत्या भारी मोहक, भव्य व शोभिवंत झालेली आहे. त्याच्या जवळच एक लहानशी साधी इमारत आहे ती बाराव्या शतकांतली आहे म्हणतात. पण ती त्याहूनही पुष्कळ जुनी वाटते. तेथून सुमारें २०० पावलांवर टॉवर किंवा मिनारा आहे. ही इमारत लोखंडी असून चौकोनी पायावर उभारलेली आहे. तो मिनारा २९० फूट उंच आहे. त्याच्यावर जाण्याला पायऱ्या व लिफ्ट, दोन्ही आहेत. या मिनाऱ्यावरून लीयान्स व आसपासचा प्रदेश, यांचा देखावा फार मनोहर

दिसतो. निरभ्र हवेंत, येथून सुमारें ९० मैलांवरचे मॉंट ब्लांक आणि आल्प्स पर्वत, यांचीं हिमाच्छादित शिखरें दिसतात, असें सांगतात.

येथील स्टॉक एक्स्चेंज—सराफकट्टा—ही इमारत सुरेख व प्रेक्षणीय आहे. तेथें विणकामाचें 'म्यूझियम्' (पदार्थसंग्रहालय) आहे. त्यांत तऱ्हेतऱ्हेचे व प्राचीन कपडे व कापड यांचा संग्रह आहे. त्यांतच उत्तमोत्तम भरजरी, व जरतारी कापडांचे व साध्या, किनारी व गोटे यांचे नमुने, मध्ययुगांतील 'पोपां'चे पोषाख, तेरावा, चौदावा व पंधरावा ल्यूई, या राजांनीं वापरलेले कांहीं कपडे, सुरेखसे गालींचे, आणि ग्रीसमधील व इतर प्राचीन कबरींमध्यें सांपडलेल्या अवशिष्ट वस्तु, उत्तम व शाबूत स्थितींत असलेल्या, ठेविल्या आहेत. आधुनिक मागामध्यें कसकशी प्रगति व सुधारणा होऊन तो हल्लींच्या पूर्णावस्थेला पोहोंचला, तें स्पष्ट दाखविणारे मागांचे साठ नमुने येथें ठेविलेले आहेत, तेही आह्मीं पाहिले. येथें एक धर्मार्थ विणकामाची शाळा आहे. ती व तेथील कामाचे नमूने मी गडबडीनें पाहून आलों. तें काम पाहून मला फार समाधान वाटलें. येथील एखादा रेशमाचा कारखाना पाहावा असें मनांत फार होतें. पण तें जुळण्या-सारखें नाहीं, असें कळलें. खुद्द ब्रिटिश कान्सलकडूनही कांहीं तजवीज करवितां आली नाहीं. याचें मला भारी नवल वाटलें.

कारण, हिंदुस्थानांत हवें त्याला देशी कारखान्यांत जाऊन पाहतां येतें. आलेल्या मंडळीला सर्व कारखाना दाखवून आणण्याची मालकाला हौस वाटते, व तो कारखान्यासंबंधीं गौप्याचा मुळीं परिस्फोट होऊं न देतां कारखाना दाखवून आणितो.

'बूलेंट् मोटार वर्क्स' या कारखान्यांत, तेथील सभ्य व संभावित म्यानेजराबरोबर फिरून पहात मीं बराच वेळ काढला. तो मला मोठ्या फायद्याचा वाटला. हा महत्त्वाचा धंदा किती लौकर वाढत आहे याची कल्पना पुढील गोष्टींवरून होईल. हा कारखाना सुरू होऊन सुमारें १३ वर्षें झालीं. प्रारंभीं दहाजण काम करीत होते. हल्लीं ३००० लोक कामावर आहेत. तेथें प्रतिवर्षीं ४००० मोटार गाड्या नव्या बनवितात. साऱ्या फ्रान्स देशांत त्याचा नंबर दुसरा आहे. त्यांतील काम अगदीं आतांपर्यंतच्या सर्व सुधारणांनीं युक्त अशा रीतीनें चालतें. कामकरी लोकांचें आरोग्य कायम राहून त्यांना सुखानें काम करितां यावें, ह्मणून अनेक योजना केल्या आहेत. त्यांतच एक धुरळा झाडण्याचें खुबीदार यंत्रही कामीं आणिलें आहे. मोटारगाडी तयार करण्याचें काम, निरनिराळ्या स्थितींत चाललेलें, मीं लक्षपूर्वक पाहिलें. नंतर अगदीं तयार झालेल्या कांहीं उत्तमोत्तम गाड्याही मीं पाहिल्या. त्या सर्व पुर्त्या तपासून नंतरच गिऱ्हाइकाकडे पाठविण्यासाठीं तयार ठेविल्या होत्या. तेथें त्यांची इतकी मागणी आहे कीं,

एक सुद्धां मोटार, मागणी येतांच विकत देण्याची कारखानदाराला सवड नसते. दोन दोन महिने आगाऊ सांगितलेला माल मिळण्यासाठीं गिऱ्हाइकाला तिष्ठावें लागतें! हें ऐकून मला मोठा अचंबा वाटला.

दुसरे दिवशीं आह्मी पारिसला जाण्याला निघालों. सीन नदीच्या कांठानें जातांना सृष्टिसौंदर्याचे अप्रतिम मनोहर देखावे दृष्टीस पडत होते. कांहीं अंतरावर 'फांटेनब्लो'चे रमणीय भूभाग व जंगल आह्मांला दृष्टिगोचर झालें. आणि चारी बाजूस दिसून येणारें हरित तृण आह्मांला मनोहर व आल्हादजनक वाटलें. त्याच दिवशीं सायंकाळीं आह्मी पारिसला पोहोंचलों व थेट जाऊन आपलें हॉटेल गांठलें.

# भाग तिसरा.

## ' फान्टेनब्लो ' आणि ' व्हर्सेलिस '

दुसरे दिवशीं आमची हिंदी वर्षप्रतिपदा होती. घर व जन्मभूमी यांपासून दूर होतों तरी, आमच्या तऱ्हेचीं पक्वान्नें तयार करवून, तो वर्षप्रतिपदेचा सणाचा दिवस साजरा करण्याला आह्मांला अडचण पडली नाहीं. आह्मी मोटारमधून फान्टेनब्लोला गेलों. वाटेंत फारच मजा वाटली. कारण, आह्मी ज्या प्रदेशांतून गेलों तो भाग फ्रेंच इतिहासांतील अतिशय उत्साहजनक व अंतःकरण खळबळवून सोडणाऱ्या अनेक गोष्टींची आठवण ताजी करणारा असा होता. सफाईदार व सरळ राजमार्ग व त्यांच्या दुतर्फा असलेल्या वृक्षराजी पाहून आह्मांला सानंदाश्चर्य वाटलें. तो थेट 'टूलोन' बंदरापर्यंत असाच उत्तम राखलेला आहे, असें आह्मांस सांगण्यांत आलें. इकडील रस्ते कोसोंगणती तीराप्रमाणें सरळ असतात. त्यांना सामान्यतः यत्किंचित्सुद्धां वळण नसतें, हें माझ्या येथें लक्षांत आलें. नेपोलियनचा लीपाझिक् येथें पराभव झाल्यानंतर राज्य सोड-

ण्याचे पूर्वी तो 'फांटेनब्लो' येथें माघार घेऊन दाखल झाला. त्याचे पूर्वरात्रीं तो ज्या घरांत वस्तीला राहिला होता, तें घर आह्मांला दाखविण्यांत आलें. तें हल्लीं एका सुप्रसिद्ध फ्रेंच ज्योतिर्विद् गृहस्थाच्या कबजांत आहे. अगदीं पहिल्या प्रथमच्या ठिकाणीं नवीन तऱ्हेच्या विमानानें एक मैलाचा प्रवास आरंभींच केला गेला, ती जागा आह्मांला दाखविण्यांत आली.

नांगराला घोडयाऐवजीं बैल जुंपलेले इकडून जातांनाच दृष्टीस पडले. हिंदुस्थानांत ही पद्धत आमच्या अतिशय पाठांतील आहे. परंतु यूरोपच्या पश्चिम भागांतून इंग्लंडकडे या पद्धतीचा अद्याप फैलाव झालेला नाहीं.

हिंदुस्थानांत नांगराचें जूं बैलांच्या मानेवर ठेवतात. पण फान्टेनब्लो येथें तें त्यांच्या पुठ्ठयाला बांधलेलें होतें,हा एक त्याच्यांत विशेष फरक दिसून आला. आमचा वाटाड्या फारच बुद्धिवान्–केंब्रिज युनिव्हर्सिटीचा ग्राज्युएट–त्याला दुर्दैवामुळें हें काम करावें लागत होतें–त्यानें सांगितलें कीं, शेतकामाला बैलच अधिक उपयोगीं पडतात. ही गोष्ट फ्रान्समध्यें आतां लोकांना पक्की अनुभवाला येऊं लागली आहे. फार वर्षांपूर्वी इकडे बैल पुष्कळ उपयोगांत आणीत. तेच पुनरपि आतां कामाला आणूं लागले आहेत.

फांटेनब्लो येथील अरण्याच्या सीमेवर आह्मी एका लहानशा इतिहासप्रसिद्ध खेड्यामधून गेलों. पूर्वी तेथें

पुष्कळ विद्वान् ग्रंथकार, कवि, तत्त्ववेत्ते, आणि कारागीर, अशा लोकांचें वास्तव्य असे. त्या खेड्यापासूनच आम्ही या विस्तीर्ण भूभागांत शिरलों. त्याचा विस्तार ४१९० एकर, व परिघ ५६ मैलांचा आहे. फ्रान्स देशांत पहिल्या प्रतीचें व अति उत्तम राखलेलें जंगल असें हेंच आहे, असें ह्मणतात तें यथार्थ वाटलें. या अरण्यांत अजस्त्र शिला व खडक आढळतात. ते मूळचे येथील नसून, ज्वालामुखीच्या सपाट्यानें, किंवा अतिप्राचीन काळीं बर्फाचे 'ग्लेसियर्स' किंवा प्रचंड लोट यांच्या बरोबर, वाहून येऊन पडलेले आहेत, हें ऐकून आह्मांला मोठेंच आश्चर्य वाटलें. येथें लहान झुडुपांचा अगदींच अभाव आहे, हा दुसरा एक चमत्कार पाहण्यांत आला. हिंदुस्थानांत रस्त्यापासून ३०।३५ कदमांवरील पदार्थ दिसण्याची मारामार असल्यामुळें, तसेंच खोल दऱ्या व उंच आणि पहातांच भोंवळ आणणारे, डोंगर आणि झुडुपें यांच्या योगानें घोड्यावरून शिकार करणें अशक्य असतें. परंतु फॉंटेनब्लो येथील अरण्यांत याच्या अगदीं उलट स्थिति आहे. येथें घोड्यावरून लांब पल्ल्याच्या शिकारी करण्यास कसलाही अडथळा येत नाहीं. (यासारखीच वुइंडसर व इंग्लंडांतील इतर शिकारीकरितां राखून ठेवलेल्या इतर जंगलांत स्थिति आढळते.) फांटेन्ब्लोचें अरण्य हें खरोखरीं अरण्य नसून विशेष लक्ष न पुरविलेलें उपवनच ह्मटलें तरी चालेल. उपवनांत व यांत फरक काय तो इतकाच

कीं, येथील वृक्ष फार मोठे असून येथील जनावरें पाळीव नाहींत. प्राचीनकाळीं या अरण्यांत घोड्यांवर बसून सावजांच्या पाठीमागें लागून राजे लोक कशी मृगया करीत असत याची कल्पना आह्मांला या ठिकाणीं बरोबर करतां आली. या अरण्याच्या मध्यभागीं एक प्रसिद्ध व मोठा ओक वृक्ष आहे. तो पहात आह्मी थोडा वेळ थांबलों. तो आज हजारा-पेक्षां अधिक वर्षें पंचमहाभूतांशीं नेटानें टक्कर देत उभा आहे. पूर्वीपैकीं त्याचा हा थोडासाच भाग उरलेला आहे. समोरच एक दुकान आहे. तेथून या वृक्षाच्या लांकडापासून तयार केलेल्या कांहीं चिजा स्मारक ह्मणून विकत घेऊन आह्मी पुढें रवाना झालों.

फान्टेनब्लो शहर साऱ्या फ्रान्स देशांतील हवापाण्याच्या मानानें उत्कृष्ट गणलेल्या शहरांपैकीं एक आहे. देशभर प्लेगचा सपाटा उडाला होता तेव्हां जीं थोडींशीं स्थळें त्याच्या सपा-ट्यांतून सुटलीं होतीं, त्यांपैकींच हें एक होतें. उन्हाळ्यांत राहण्याला तें फार चांगलें, असें सारे लोक समजतात. याची साक्ष त्या दिवसांत तेथील नेहमींची १४००० ची लोकवस्ती दुपटीहून जास्त होते, यावरून पटते. येथील राजवाडा पाहून किती तरी गोष्टींचें स्मरण झालें. फार वर्षांपूर्वी येथें राजे लोक रहात असत. यावरून फ्रान्स देशांत राजसत्ता नांदत होती आणि तेथील राजे लोक व त्यांचें मंत्रिमंडळ यांचें राजवैभव

फार भव्य व प्रचंड होतें, त्या काळाची आठवण झाली. फ्रेंच राष्ट्राचा 'प्रेसिडेंट' ( प्रजासत्ताक राज्याचा अध्यक्ष ) ही वारंवार येथें येऊन राहातो. यामुळें हल्लींच्या राज्यपद्धतीचा पूर्वीच्या राज्यपद्धतीशीं संबंध जोडलेला पाहून कौतुक वाटतें. शिवाय, 'रिपब्लिक' किंवा लोकसत्तात्मक राज्यपद्धतीसुद्धां, डामडौल, राजकीय वैभव व थाटमाट, यांच्या दीप्तीला भाळतात, या गोष्टीची सत्यता सिद्ध होते.

या राजवाड्याचा पुढील भाग ( मोहोरा ) फारसा भव्य नाहीं. पण आंतील काम मात्र तत्कालीन सुधारणा व संपत्ती यांच्या द्वारें जितकें सुरेख व सुखसाधक करितां येण्याजोगें होतें, तितकें केलेंले आहे. सर्व वस्तु व व्यवस्था उत्तम रीतीनें जपून जशाच्या तशा ठेविलेल्या आहेत. येथें पाहण्याकरितां ठेवलेल्या स्मारक वस्तूंवरून या राष्ट्राच्या प्राचीन इतिहासक्रमाचें साग्र दिग्दर्शन सहज होऊं शकेल. तेथें असलेल्या घड्याळांपैकीं प्रत्येक घड्याळ, आज इतकीं वर्षें झालीं तरी, बहुतेक फरक न पडतां बरोबर चालतें आहे, हें पाहून मला मोठें कौतुक वाटलें. 'मेरी, कीन आफ दि स्कॉट्स' इचें 'डॉफिन'शीं [ फ्रान्स देशाच्या युवराजाशीं ] ज्या लहानशा देवालयांत लग्न लागलें, तें मला दाखविण्यांत आलें. तसेंच नेपोलियननें बादशाहतीच्या राजीनाम्यावर सही केल्यानंतर मेणबत्तीचें शामदान रागानें आपटल्यामुळें

एका मेजाला खोंच पडली, तें मेज व ती खोंचही आह्मीं पाहिली. हतभागी जोसेफाईनइनें आपल्या घटस्फोटासंबंधीं वचनें ज्या कोठडींत उच्चारिलीं, ती खोली व नेपोलियनच्या वहिवाटीच्या इतर खोल्याही पाहण्यांत आल्या. त्याचा लहान मुलगा 'किंग ऑफ रोम' ( रोमचा बालराजा ) याचा पाळणा त्याच्या निजण्याच्या खोलींत होता. पांचव्या चार्लस राजाचा पुस्तकालयाचा मोठा दिवाणखाना पाहून मी सुप्रसन्न झालों. त्याची व्यवस्था फारच काळजीपूर्वक ठेवली जात आहे. नंतर आम्हीं नववा ल्यूई, दुसरा हेन्री, तेरावा ल्यूई, पहिला फ्रान्सिस, आणि चौदावा ल्यूई, या फ्रान्स देशच्या पूर्वींच्या राजांच्या खोल्या पाहिल्या. दुसऱ्या हेन्रीनें 'बॉलरूम' (नाचाची जागा) बांधविली तेथून राजवाडा, बाग आणि अरण्य यांचा देखावा उत्तम दिसतो. तत्कालीन कलाकौशल्य व शिल्पकला, यांच्या प्रगतीची ही इमारत एक अति उत्तम व मनोहर उदाहरण आहे. याच दालनामध्यें दुसऱ्या हेन्री राजाच्या राखेच्या निरनिराळीं आसनें व पोषाख यांत काढलेल्या किती तरी तसबिरी होत्या, ह्मणे. चौदाव्या ल्यूई राजाचीं दालनें तऱ्हेदार व सुरेख अशा चित्रांनीं चांगलीं सुशोभित केलीं आहेत. याशिवाय येथील उत्तमोत्तम चीनीचें काम, व भिंतीवर टांगलेले अप्रतिम नक्षीदार कापडी पडदे, पाहून आह्मांला फार आनंद झाला. या कामांत कारागिरांच्या कल्पकतेची कमाल झालेली दिसून येते.

व तें करणाऱ्यांची शाबास होय, असें वाटतें. हे कापडी पडदे तयार करण्याचें काम भारी किचाट व थकविणारें आहे. तें दीड तासावर कोणीही सारखें करूं शकत नाहीं, असें ह्मणतात. एखादा सुंदर देखावा हुबेहूब रेखाटतांना रंगांत रंग बेमालूम मिळवून देण्याचे कामीं दृष्टोत्पत्तीस येणारें कौशल्य अलौकिक आहे. हें पडद्याचें काम इतकें सूक्ष्म, सुरेख व बेमालूम केलेलें आहे कीं, कोठें कोठें तर तें रंगीत चित्रच आहे, असा भास होतो. आपला मुलगा रोमचा राजा याच्या नांवें पोपानें सारी राजकीय सत्ता सोंपवून देऊन स्वतः त्या सत्तेच्या राजीनाम्यावर सही करण्याकरितां पोपाचें मन चांगलें वळवितां यावें ह्मणून नेपोलियननें पोपाला जवळ जवळ सहा महिनेपर्यंत ज्या दालनांत बहुतेक अंशीं अटकेंतच ठेवलेलें होतें, तीं पाहून नेपोलियन त्या काळाच्या पुष्कळच पुढें होता असें मला वाटलें. त्यानें मनांत आणलेली गोष्ट तितक्यांतच घडावयाची नव्हती. पुढें पाउणशें वर्षांनीं, इटाली देश एकवटला व त्याला राष्ट्रीयपणा आला तेव्हां, 'होली सी' ची किंवा पोपांची राजकीय सत्ता नष्ट केली गेली. शेवटीं आह्मी एका ग्यालरींतून गेलों. ती पुष्कळ ऐतिहासिक देखावे दाखविणाऱ्या प्रकाशित चित्रफलकांनीं सुशोभित केली होती. आह्मी जिन्यानें त्या राजवाड्यांतून बाहेर पडलों. तेव्हां नेपोलियन एल्बाला जाण्याला निघण्याचे वेळीं त्यानें आपल्या मर्जींतल्या गार्ड लोकांना जेथून निरोप दिला, तें स्थळ आम्हांला दाखविलें गेलें.

या राजवाड्यांतील उत्तमोत्तम सामान, सुंदर चित्रें व अप्रतिम पडदे, यांच्याशिवाय येथें दुसरें कांहीं माझ्या मनांत भरलें नाहीं. युरोपांत प्रत्येक ठिकाणीं पूर्वकालीन दंतकथा, ऐतिहासिक परंपरा, वस्तु व गोष्टी, यांविषयीं जो विलक्षण आदर दिसून येतो, त्याचा माझ्या मनावर चांगलाच ठसा उमटल्याशिवाय राहिला नाहीं. आह्मां प्राच्य लोकांनाही या सर्व गोष्टी प्रेक्षणीय व मनोरम वाटतात; पण आमचा या प्रसंगाशीं अधिक निकट संबंध असता तर आपल्या अंतःकरणांत जे मनोविकार उद्भवले असते, तितक्या उत्कटपणानें ते या ठिकाणीं उत्पन्न झाले नाहींत.

प्रेक्षणीय व सुरेख असें व्हर्सेलिस शहर समुद्राच्या सपाटीपासून ४५० फूट उंचीवर आहे. हवा स्वच्छ व निरभ्र असेल तेव्हां तेथून बारा मैलांवर असेलल्या पारिस शहरांतील कांहीं इमारती व चकाकणारीं शिखरें दृष्टीस पडतात. येथील राजवाडा बादशाही थाटाचा असून त्याचे सभोंवार रमणीय बागा व पांच मैल प्राकाराचें उपवन आहे. जागजागीं सुंदर व नामी पुतळे उभे केलेले आहेत. त्यांच्या योगानें तेथें भारी शोभा आलेली आहे. तेथील वृक्षराजींची व वनश्रींची शोभा व संपदा अवर्णनीय आहे. कांहीं झाडांना विलक्षण व तऱ्हेतऱ्हेचे आकार आणलेले आहेत. कारंजांसंबंधानें व्हर्सेलिसची प्रख्याति आहे. ते सुरू ठेवण्याला पुष्कळच खर्च

लागतो. सबब ते वर्षांतून एक दोन वेळच उडविले जातात. त्यांचा अद्वितीय मजेदार देखावा पाहण्याला लोकांचे थवेच्या थवे जमतात. सर्वांत मोठ्या कारंजाभोंवतीं फ्रान्स देशांतील प्रमुख नद्यांचे द्योतक ब्रांझ—पंचरसी—धातूचे पुतळे बसविलेले आहेत.

या राजवाड्याच्या जागीं प्रारंभीं तेराव्या ल्यूई राजाची शिकार करण्याची लहानशी बंगली होती. त्याच्यामागून गादी-वर बसलेल्या राजानें हा महाल बांधला. त्याचा दर्शनी भाग साऱ्या पृथ्वीमध्यें अद्वितीय भव्य व भपकेदार आहे. आंतील भाग उत्तम प्रकारें शृंगारलेला असून येथें ठेवलेलें सामानसु-मानही अप्रतिम व मुबलक आहे. यामुळें तो कोणाही थोर राजाला राहण्याला योग्य असा आहे. सुप्रसिद्ध राज्यक्रांतीच्या वेळीं सोळाव्या ल्यूई राजाला--बहुतेक जबरदस्तीनेंच—पारि-सला नेलें तें येथूनच. या सुखनिवासाला त्याचे पाय परतून लागले नाहींत. त्याच्यांतील ज्या ज्या दालनांत जे जे थोर राजपुरुष पूर्वीं राहात होते, तीं तीं दालनें व तेथील सामानसुमान व सजावट, जशीच्या तशी ठेवलेली आहे. हा राजवाडा नेपोलियनचा फारच आवडता होता. त्यानेंच तेथील कांहीं भाग शृंगारित केले, व तेथें उत्तमोत्तम सामान आणवून ठेवविलें. त्याच्या खास दालनामध्यें तसबिरी ठेवलेल्या आहेत. त्या साऱ्या फ्रान्स देशामध्यें अप्रतिम आहेत. हा चित्रसंग्रह सर्व दुनियेंतील अव्वल दर्जाच्या संग्रहांत मोडतो. तेथें एक

पोर्सिलेनचा ( चीनीच्या कामाचा ) स्तंभ आहे. त्याच्या-वर नेपोलियनच्या पराक्रमाचीं निदर्शक चित्रें काढलेलीं आहेत. तो पाहून फारच आनंद व कौतुक वाटतें. तो त्याला त्याच्या द्वितीय विवाहाच्या प्रसंगीं नजर मिळाला होता. तेथें नेपोलियनच्या सुप्रसिद्ध सेनाधिपतींच्याही तसबिरी आहेत. प्रत्येक दालनांतील छतावर तत्कालीन अप्रतिम चित्रकलानिपुणांच्या हातची सुंदर चित्रकारी केलेली आहे.

लढायांचें चित्रमंदिर ( ग्यालरी ) हें एक या राजवाड्याचा प्रेक्षणीय भाग आहे. पूर्वी तेथें, दरबारांत हजर असणाऱ्या राजपुरुषांसाठीं बांधलेल्या सत्रा खोल्या होत्या. त्यांचा हल्लीं हा एकच लांबसा दिवाणखाना बनविला आहे. फ्रान्सच्या इतिहासांतील अगदीं प्राचीन काळापासून तों बऱ्याच अलीकडील काळापर्यंतच्या लढाया—नेपोलियनचे विजय सुद्धां—यांचीं उत्तमोत्तम चित्रें येथें काढलेलीं आहेत. त्याच्या जवळच फ्रान्सच्या राण्यांचीं मौल्यवान् दालनें आहेत. त्यांतीलच एकामध्यें एकोणीस राजपुत्रांचे जन्म झाले. या दालनांना अत्युत्तम कारागिरीच्या द्वारें उत्तम शोभा आणलेली आहे. त्यांच्या छतावर बिनमोल चित्रें काढलेलीं आहेत. बेफाम झालेल्या पारिसच्या लोकांनीं बास्टील किल्ल्याचा व तुरुंगाचा पाडाव केला, आणि नंतर त्यांच्या झुंडीच्या झुंडी अतिशय चिथून येथें आल्या. त्यांचें शांतवन होण्यापूर्वी दुर्दैवी मेरी आंटायनेट राणी वावऱ्यां

चाबऱ्यां आपल्या पतीकडे ( सोळाव्या ल्यूई राजाकडे ) ज्या दरवाजांतून पळून गेली तो दरवाजा निळ्या व लाल रंगाच्या पुस्तकालयांत गेल्यावर आम्हीं पाहिला. नंतर आम्हीं मनोरम नाचाची खोली व आयने महाल पाहिले. सन १८७० सालीं प्रशियाचा राजा विल्यम जर्मनीचा पहिला विल्यम बादशहा झाल्याची द्वाही फिरली, ती या आयनेमहालांतूनच.

चौदावा ल्यूई हा साऱ्या युरोपांत तत्कालीन अतिप्रबल व थोर राजा होता. त्याचीं दालनें फारच सुंदर आहेत. त्यांच्या छतावर क्लासिकल ( प्राचीन ग्रीक व रोमन ) देवतांचीं भव्य व प्रेक्षणीय चित्रें काढलेलीं आहेत. त्यांच्यावरून त्या त्या दालनाला अपालो, मर्क्यूरी, डायाना, व्हीनस, मार्स, हर्क्यूलीस अशीं नांवें दिलेलीं आहेत. त्यांच्यांतील सजावट व आरास आणि सामानसुमान भव्य व मौल्यवान् आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचें स्वातंत्र्य कबूल करण्याच्या तहावर ज्या दालनामध्यें सह्या झाल्या, तेथें पाय ठेवतांच त्या चिरस्मरणीय युद्धाचें व त्यांत फ्रेंच शिपायांनीं दिलेल्या साहाय्याचें स्मरण झालें. तो तह ठरतांना अमेरिकेचा प्रतिनिधि फ्रांक्लिन बसत असे ती खुर्ची, हा राजवाडा पाहण्यास येणाऱ्यांना दाखवितात. दुसऱ्या एका दालनांतून, वॉर ऑफ् स्पानिश् सक्सेशन ( स्पेनच्या गादीच्या वारशासंबंधीं लढाई ) जाहीर करण्यांत आली. थ्रोन् रूम ( सिंहासनाचा दिवाण-

खाना ) एक अत्युत्कृष्ट व सुशोभित स्थळ आहे. तेथें पूर्वी चौदाव्या ल्यूई राजाचें सोन्याचें भरीव सिंहासन असल्यानें तो त्या वेळीं फार सुशोभित दिसत होता. ज्या राजशय्येवर त्या राजाचें प्राणोत्क्रमण झालें, ती शय्याही आह्मीं पाहिली. या दालनांतील पडदे सर्व जगांतील अत्युत्तम व सुंदर अशा पडद्यांपैकीं आहेत.

शेवटीं आम्हीं येथील मंदिर पाहिलें. त्याच्या छतावर, अतिशयच उत्तम व भव्य असें, धि ग्लोरी आफ् गॉड् ( ईश-महिमा ) नांवाचें चित्र काढलेलें आहे. तें पुरें करण्याला कारागिराला अडीच वर्षें, उंच पराचीवर उताणें पडून, काम करावें लागलें. अशा अवघड रीतीनें काम करण्याच्या शिणामुळें अखेर त्याला वेड लागलें, ह्मणतात. या मंदिराचे दरवाजे ओक लांकडाचे असून, त्यांच्यावर अतिशय बारीक व चमत्कारिक नक्षी कोरलेली आहे. प्रेसिडेंटाची निवड होते त्या प्रसंगीं येथें तन्निमित्त प्रार्थना होते. तिला हजर राहणें, हें अधिकारी या नात्यानें त्याचें पहिलें काम असतें.

# भाग चवथा.

## सुप्रसिद्ध, थोर व प्रतापशाली नेपोलियन याची मातृभूमि.

आम्ही पारीसहून माल्मेझाँला जाण्याला निघालों. त्या दिवशीं पारिसपासून सात मैलांवर ऐतिहासिकदृष्ट्या चिरसंस्मरणीय, सुंदर आणि रमणीय भागांतून जात असतांना रूएल नांवाच्या लहानशा खेड्यांतून गेलों. तेथें सुप्रसिद्ध कार्डिनल रिशेलोनें बांधविलेलें मंदिर आहे. त्याच्यांत एम्प्रेस जोसेफाईन व तिची कन्या हार्टेन्स यांच्या कबरी आहेत, त्या आम्हीं पाहिल्या. पुढें दोन मैल गेल्यावर माल्मेझाँ या इमारतीमध्यें जोसेफाईन घटस्फोटानंतर राहात असे. ॲबट्कृत नेपोलियनचें चरित्र वाचीत असतांना जोसेफाईन म्हणजे सुपत्नीत्वाची प्रत्यक्ष प्रतिमा अशी कल्पना माझ्या मनांत भरलेली होती. पुढें तिचें नेपोलियनशीं लग्न लागण्यापूर्वीच्या व घटस्फोटानंतरच्या अशा खऱ्या व ऐतिहासिक हकीकतीचा परिचय झाला. तेव्हां तिच्याविषयींच्या या उदात्त कल्पना दुर्दैवानें नाहींशा झाल्या.

माल्मेझाँ येथील इमारत मूळ एक इस्पितळ होतें. नेपोलियन हा फर्स्ट कान्सल नेमला गेल्यानंतर तेथें राहूं लागला. तेव्हां त्यानें ती विकत घेऊन सामानसुमान मागवून सजविली. या छोटेखानी घरांत राहात असतांना गेलेला काळ, आपल्या साऱ्या आयुष्यांत अत्यंत आनंदाचा व सुखाचा होता असें त्यानें कबूल केल्याचें प्रसिद्ध आहे. नेपोलियन व जोसेफाईन या दोघांमध्येंही सौंदर्यपरिज्ञान व त्याविषयीं अतिशय आवड उपजतच होती. ती पुढें पूर्णावस्थेला गेली होती. या इमारतीची व्यवस्था व शृंगार यांवरून याची उत्तम साक्ष पटते. जोसेफाईनचा अंत झाला तो येथेंच. ज्या बिछान्यावर तिचें प्राणोत्क्रमण झालें तो एका खोलींत ठेवलेला आहे. तोही आह्मीं पाहिला. ड्रॉइंग रूम (बैठकीची खोली) मध्यें पारिसच्या नागरिकांनीं नेपोलियनला नजर केलेला सुवर्णपात्रांचा सुंदर संच ठेवलेला आहे. त्याचा पुस्तकसंग्रहही जपून ठेवलेला आहे. तो पाहून मला भारी समाधान वाटलें. येथील बिल्यर्ड रूम व इतर ड्रॉइंग रूमही आम्हीं घाईघाईनें पाहिल्या. त्या दुसऱ्या लहानच पण उत्तम शृंगारलेल्या दालनांना शोभेशाच आहेत. जोसेफाईनच्या दालनांत नक्षीदार पडदे लावून फार सुरेख आरास केलेली आहे. तेथील म्यूझिक रूम (गायन—वादन—शाळा) त्या दुर्दैवी मालकिणीच्या वेळीं होती, तशीच सजविलेली कायम आहे. एका कोठडीमध्यें तिचें व

तिच्या कन्येचे कांहीं कपडे ठेवलेले आहेत. तिच्या निजण्याच्या खोलीमध्यें खुद्द तिच्या हातचें कांहीं सुरेखसें काम ठेवलेलें आहे. तेथें एक लहानसें पदार्थसंग्रहालय आहे. त्यांत मुख्यत्वें त्या शूरवीर शिपाईबहाद्दरासंबंधाच्याच वस्तु व स्मारकें आहेत. तींही पाहण्यांत आलीं.

खास नेपोलियनच्या खोल्या अगदीं लहान, पण सोईवार व आरामाच्या आहेत. त्यांच्यांत त्याच्या प्रवासी पलंगाचा हुबेहूब नमुना व इतर सामान, त्यांतच प्रत्येक स्वारींत त्याच्या नेहमीं बरोबर राहणारें त्याचें दिवाबत्तीचें यंत्रही आहे. त्याच्या बैठकीच्या खोलींत जोसेफाईनची शिवणकामाची पेटी आम्हीं पाहिली. ती तिला राज्यारोहणाच्या प्रसंगीं नजर मिळालेली असून, त्यांत इतर किरकोळ वस्तूंमध्येंच तिच्या पतीची एक अगदीं लहान व फारच सुरेख प्रतिमा होती. नेपोलियन एल्बा येथें असतांना त्याच्याजवळ असलेल्यापैकीं कांहीं सामान दुसऱ्या एका खोलींत ठेवलेलें आहे. त्याची कन्या हार्टेन्सी राहात असलेली खोलीही पाहून आम्ही जिन्यावरून उतरून बाहेर पडलों. नेपोलियन गडबडीनें पळाला व शेवटीं इंग्रजांच्या स्वाधीन झाला, तो येथूनच असें आह्मांला सांगण्यांत आलें. तो निघून गेल्यावर ब्लूचरच्या फौजेनें येथें लुटालूट केली. पण पुढें पुष्कळ वर्षांनीं बादशाहीण यूजेनी जी अद्यापि लंडनमध्यें एकांतवासांत राहात आहे, तिनें त्या घरांतून नाहींशा झालेल्या

वस्तूंचा शोध लावण्यांत व त्या खरेदी करून त्या थोर बोना-पार्टाच्या वेळच्याप्रमाणें लावून सजवून ठेवण्यांत सुमारें पाऊण कोट रुपये खर्च केले.

फ्रान्सच्या जमिनीवर नेपोलियनचा पाय अगदीं शेवटचा असा लागला, त्या ठिकाणीं, त्याच वेळीं, त्याच्या कन्येनें एक गुलाबाचें फूल ठेवून, निशाणी कायम केली होती. तें स्थळ पाहून तेथें कांहीं वेळ थांबल्यावांचून मला राहवेना. त्या समयीं त्या थोर वीर पुरुषाची अप्रतिम उज्ज्वल कारकीर्द व अखेर त्यानें फार दिवसांपासून मनांत बाळगलेल्या साऱ्या आशा व उमेदी एकदम पार ढासळून गेल्या, यांविषयीं माझ्या मनांत विचार आले. तो सर्व मुखीं थोर ह्मणून नांवाजलेला असूनही मानवजातीच्या निसर्गसिद्ध मर्यादा व दैवाचा अस्थिरपणा त्याच्या लक्षांत आला नाहीं. या त्याच्या वृथाभिमानाबद्दल मला त्याची फार कींव वाटली. साऱ्या युरोपखंडास एकसमयावच्छेदेंकरून लढण्यासाठीं आव्हान करण्याचें त्यानें मनांत आणलें, त्यावेळीं महत्त्वाकांक्षा व आत्मविश्वास यामुळें तो किती तरी अंध झाला असला पाहिजे ! अखेर त्यांतच त्याला अपेश आलें. निरनिराळ्या राष्ट्रांचें स्वातंत्र्य हरण करण्याचा युगपत् प्रयत्न शेवटीं फसलाच पाहिजे. तदनंतर सामर्थ्य, दृढनिश्चय आणि अलौकिक कर्तृत्वशक्ति यांनीं युक्त अशा या महात्म्याच्या अंतःकरणांत अधिकाराविषयींची जी अनावर हांव वसत होती त्याज-

बद्दलचे विचार माझ्या मनांत आले. युरोपांतील सर्व देशांत फ्रान्स हें पहिल्या प्रतीचें राष्ट्र बनवून कान्सल म्हणून अशा राष्ट्राचें धुरीणत्व आमरण स्वतःच्या हातांत राहावें हें त्याला पुरेंसें न वाटतां, त्या राष्ट्राचा आपण बादशहा झालों पाहिजे अशी त्याला महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली होती. तीही पुरी होऊन त्याचें समाधान झालें नाहीं. स्वतःचा राजवंश कायम करावा ही त्याची इच्छा. तिच्या पायीं आस्ट्रियाच्या बादशाही घराण्याला नाक घांसावयाला लावून त्याची एक राजकन्या, आपली द्वितीय पत्नी होण्यासाठीं अर्पण करण्याला त्यानें भाग पाडलें. सारें यूरोप तृणप्राय समजल्यामुळें अर्थातच सर्व युरोपानें एकत्र होऊन त्याच्यावर हल्ला करण्याला जणों त्यानें भाग पाडलें. आपल्या अप्रतिहत व अबाढ्य सत्तेनेंच तो तृप्त झाला नाहीं. त्यानें आपल्या भावांना राजे व सेनापति केलें. परंतु या सर्वांचा मूलाधार जो नेपोलियन त्याच्या पदच्युती-बरोबर त्यांचे अधिकार लयाला जाणें निर्विवाद होतें.

त्याच्या विचित्र व अलौकिक कर्तृत्वशक्तीला सारें यूरोप-देखील पुरें झालें नाहीं. प्राच्य देशांतही एक प्रचंड व वैभव-शाली साम्राज्य स्थापन करण्याचा त्याचा बेत होता. त्याच्या-साठीं त्यानें जीवापाड झटून यत्न केला. म्हैसूरचा सुलतान टिपू याच्याशीं कारस्थान चालवून, ब्रिटिश लोकांचें पाऊल पुढें वाढूं नये असा त्यानें प्रयत्न केला. त्या जुलमी सुलतानानें

स्वतःचें नांव एका रिपब्लिकन क्लबाच्या पटांत सिटिझन टिपू म्हणून सुद्धां दाखल केलें होतें; पण त्याचे हाडवैरी जे इंग्रज लोक, त्यांनीं त्याच्या पूर्वीच डाव साधला. टिपूचा नाश आणि खुद्द नेपोलियनला एकर येथें बसलेली जबर ठोकर, यांमुळें त्याच्या तिकडील महत्त्वाकांक्षा व उमेदी यांच्या एकाएकीं चिंधड्या उडाल्या. नेपोलियनचा पराभव झाल्यानंतर इंग्रज पुनः सारा हिंदुस्थान देश आक्रमण करण्याच्या हक्कशीर व विधिनिर्मित क्रमाला लागण्याला मोकळे झाले.

फ्रान्स देश पहिल्या प्रतींचें प्रबळ राष्ट्र बनविल्यानंतर, जिंकून घेतलेल्या प्रदेशांची व्यवस्था व दृढीकरण यांच्याकडे नेपोलियन लक्ष देता व तें पुरतें साध्य झाल्यावरच अधिक विजयप्राप्तीचा उपक्रम करिता, तर काय झालें असतें, याविषयीं कल्पना करणें बरेंच मनोरंजक आहे. कोणच्याही कामाचा पुरता पिच्छा पुरविण्याची शक्ति, अतुल राजकार्यकौशल्य, नैसर्गिक युद्धनैपुण्य, पक्कें व अचल धैर्य, आणि अप्रतिम चिकाटी, हे गुण अंगीं असल्यामुळें, त्यांच्या योग्य उपयोगानें या नृसिंहानें किती तरी गोष्टी साध्य केल्या असत्या ! पण अतिरेक झालेल्या महत्त्वाकांक्षेच्या पायीं राष्ट्रीय सत्तेच्या समतोलपणाच्या तत्त्वासंबंधानें तो अंध होऊन गेला. हें तत्त्व त्याच्या शत्रूंच्या पूर्णपणें लक्षांत वागत होतें, व त्याचा त्यांनीं पुरता फायदा घेतला. त्यानें सकल वस्तुमात्र फ्रेंच कर-

ण्याचा यत्न केला, त्यामुळें सारें यूरोप खळबळून जाऊन इंग्लंडाला तें आयतेंच उत्सुक व तत्पर साहाय्यकारी झालें. त्यांनीं राष्ट्रीय सत्तेच्या समतोलपणाची तुला पूर्ववत् करून अखेर आपलें सामर्थ्य कायम राखलें, आणि नेपोलियन व त्याच्यावरच अवलंबून असलेलें सर्व कांहीं एकदम रसातळीं गेलें. लॉर्ड कॉर्नवालिस साहेबाच्या वेळीं, हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राज्यकर्त्यांच्या सामर्थ्याच्या समतोलपणाविषयींची त्याची कल्पना, तत्कालीन हिंदी राज्यकर्त्यांनीं उमजून अमलांत आणली असती तर, हिंदुस्थानाच्या इतिहासाला कसें वळण लागलें असतें याची कल्पना मनांत येऊन आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं. समकालीन युरोपियन लोकांच्या अंगचें राजकार्यकौशल्य, राजकीय धोरण व दूरदृष्टि, यांच्या अभावामुळें त्यांना अशा राजनीतिचें मर्म लक्षांत आणतां आलें नाहीं, किंवा ती अमलांत आणली गेली नाहीं, हें मर्म लक्षांत ठेवून त्यांनीं राजकारणाचें धोरण ठेविलें असतें, तर ब्रिटिश लोकांना आपला क्रम तितका सोपा सांपडता ना.फ्रेंच लोकांचें प्राबल्य हिंदुस्थानांत कायम न होण्याला जीं बरीचशीं महत्त्वाचीं कारणें झालीं, त्यांतच त्यांच्या वेळीं देशी राज्यकर्ते, या आपापसांत झगडणाऱ्या परकीय लोकांच्यापेक्षां, एकमेकांला मदत करण्याला जास्त तयार होते, हेंही एक प्रबल कारण होतें. पण महाराष्ट्र-

राजमंडळ आणि निजामाचें दरबार यांच्यामध्यें नाना फडणीस व तत्सम इतर राजकार्यधुरंधर प्रमुख मंडळींचें नेतृत्व कमी होतांच, टिपूच्या राजकारणांत पहिलें तटस्थ राहिलें व दुसऱ्यानें त्याच्या पाडावाला जोरानें मदत केली. त्यानंतर तीन वर्षांतच मराठेशाहीच्या स्वातंत्र्याला जबरदस्त ठोकर बसली व दोन दशकांच्या आंतच ती सफा बुडाली. त्यांतल्या त्यांत त्याचा एक चांगला म्हणावयाजोगा परिणाम झाला तो हा कीं, पुष्कळशीं लहान लहान संस्थानें वांचलीं गेलीं.

क्षत्रियांच्या खऱ्या ध्येयांचें शिक्षण मिळालेल्या हिंदु लोकांच्या मनाला नेपोलियनचें शरण जाणें पसंत पडत नाहीं. त्याच्यासारख्या वैभवशाली पण दुःखपर्यवसायी आयुष्यक्रमाला धारातीर्थींच मरण पावणें अधिक श्रेयस्कर झालें असतें. त्याचा पूर्वीच इतका कांहीं नाश होऊन चुकला होता कीं, त्या स्थितींत व तशा कष्टदायक व अपमानकारक रीतीनें वांचविलें जाण्याइतकी त्या प्राणांची किंमतच राहिली नव्हती. त्याचा समकालीन व साहाय्यकर्ता दोस्त ह्मणून मानला गेलेला म्हैसूरचा टिपू सुलतान याचा अंत त्याच्या अगदीं उलट उदाहरण ह्मणून दाखवितां येण्याजोगें आहे. त्यानें आपल्या एकनिष्ठ सेवकजनांसह धारातीर्थीं देह अर्पण केला, त्यापूर्वीं पुष्कळ दिवस, आपला सर्वस्वीं नाश झाला, ही गोष्ट त्याला कळून चुकली होती. इंग्रजांच्या हातून त्याची व्यवस्था नेपोलियनापेक्षां पुष्कळच चांगली राखली जाण्याचा संभव होता. पण त्या

धैर्यशाली नरव्याघ्राच्या मनाला दीनपणें शत्रूला शरण जाण्याची कल्पना शिवली सुद्धां नाहीं. हातीं तरवार धरून लढतां लढतां तो श्रीरंगपट्टणच्या वेशींत ठार झाला. वीर्य व शौर्य यांचे खरे अप्रतिम हिंदी प्रतिनिधि—इकडील रजपूत लोक—नेपोलियनच्या शरण जाण्याकडे तिरस्कारदृष्टीनेंच पाहाते. या कृतीनें नेपोलियननें आपल्या कांहीं शिपायांचे प्राण वांचविले, हें खरें. पण किती तरी निकराच्या लढायांत आपल्या फौजा, आगीचा प्रळयकारक वर्षाव करणाऱ्या शत्रूंच्या विध्वंसक तोफखान्यावर बेधडक नेण्याला ज्याचें मन केव्हांही कचरलें नाहीं, त्याला या थोड्याशा लोकांची कींव यावी, हें तरी विलक्षणच !

साऱ्या युरोपाला दहशत पाडणाऱ्या नेपोलियनचा अखेर पाडाव करणारा भाग्यशाली इंग्रज जनरल—ड्यूक ऑफ वेलिंगटन—याला लष्करी व्यवस्था व सेनानिवेशविषयक पहिला धडा हिंदुस्थानांतील समरभूमीवरच मिळाला होता. कारण, त्यानें बऱ्याचशा लढाया मारल्या, त्या मराठ्यांबरोबरच्या युद्धांमध्यें, ही मजेदार गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

# भाग पांचवा.

## पारिस व तेथील ऐषआराम.

'भव्य थाटदार व आनंदी मंडळीचें मायवर' असें पारिस शहराचें वर्णन करितात. खरोखरच तेथें पाहावें तिकडे सुखोपभोगेच्छा व चैन यांना सारखा ऊत आलेला दिसत असतो. फ्रेंच लोक निसर्गतःच मोकळ्या मनाचे व त्यांचें अंतःकरण सदा उल्हसित असतें, या गोष्टी तेथें पोहोंचलेल्या प्रत्येक परकी प्रवाशाच्या मनांत तेव्हांच बिंबतात. तेथें सांसारिक उपाधींसंबंधी खोल विचारांत गढलेले असे कोणीच दिसून येत नाहींत. जो तो आनंदांत व खुशालींत मग्न. या सेन नदीतीरावर वसलेल्या अजब शहरांत प्रत्येकाचें मन, होईल तसें व तेथवर चैनींत व सुखानें कालक्रमणा कसें करावें, याविषयींच वेधलेलें दिसतें. ललित कलांची आवड व तद्विषयक उपजत बुद्धि, आणि सृष्ट किंवा कृत्रिम पदार्थमात्रांमधील सौंदर्य यांविषयीं प्रेम, या लोकांमध्यें पदोपदीं दृष्टोत्पत्तीस येतें. तेथील प्रशस्त व विस्तृत राजपथांची (बूलेव्हार्डस) सारखी व अप्रतिम व्यवस्था पाहून मला भारी आनंद झाला,

व आश्चर्यही वाटलें. आम्ही तेथें गेलों त्या वेळीं दुतर्फा वृक्ष-राजींतील वृक्षांना नवपल्लव फुटून ते बहारदार दिसत होते. यामुळें आह्मांला या राजपथांचें त्यांच्या अत्युत्तम स्थितींत दर्शन घडलें.

जातिनिर्बंधांमुळें हिंदू लोकांना आपलें खानपान इतरां-समक्ष व अगदीं उघड्यांत करतां येत नाहीं. अशांना इकडील लोकांचें उघड्यांत मोकळेपणीं उपाहार घेणें प्रथम प्रथम कसें-सेंच वाटतें. तरी लौकरच या उघड्या उपाहारगृहांच्या देखाव्याची संवय पडून, त्याचें कांहीं विशेष वाटेनासें होतें. तेथें जाणारे लोक, आपापली काफी किंवा मद्यें यांचा हळू हळू आस्वाद घेत, येणाऱ्या जाणाऱ्या मंडळीची गंमत स्वस्थपणें पाहात राहतात. सहल करण्याला आलेले लोक संथपणें फिरत, तेथें ऐकूं येणारे गायनवादनाचे सूर आनंदानें ऐकत राहतात. बहुतेक साऱ्या प्रतिष्ठित उपाहारगृहांमध्यें 'आर्चेस्ट्राची'—गायन-वादनाची-व्यवस्था केलेली असते. बहुतेक मोठ्या शहरांमध्यें अनेक बाबतींत साम्य असतें. सकाळच्या प्रहरीं उद्योगी कामकऱ्यांच्या झुंडीच्या झुंडी, लगबगीनें कामावर जात असतात. सायंकाळीं त्यांचे थवेच्या थवे फुरसतीनें व खुशाल चैन करितात. त्याच्यांत आम्हांला नवीन असें कांहीं दिसलें नाहीं. युरोपियन लोक-समाजाच्या प्रत्येक केंद्रामध्यें हा भरतीओहोटीसारखा प्रकार नित्य व साहजिक चालू असलेला आढळतो.

येथील करमणुकीचे निरनिराळे अपरिमित प्रकार पाहून कोणीही गोंधळूनच जाईल, आणि अनेक चित्रमहाल, नाटकगृहें, गायनवादनशाळा व सुखोपभोगाचीं इतर स्थळें, इतक्यांना या ठिकाणीं सारखा लोकाश्रय कसा मिळूं शकतो याचा कोणालाही अचंबा वाटेल. येथील सुंदर 'ऑपेरा हाउस' (नृत्यगायनशाळा) मध्यें जाऊन तेथील एखाद्या प्रयोगनिरीक्षणानें देखील पुष्कळ नवीन गोष्टींचें ज्ञान प्राप्त होतें. इतक्या प्रबललोकसत्तावादी देशामध्यें इतपत सरदारी व थाटमाट असूं शकेल, असें कोणाला स्वप्नांत सुद्धां वाटणार नाहीं. इकडे बंदोबस्ताच्या कामीं लष्करी लोकांची योजना केलेली पाहून मला कांहींसें विलक्षण वाटलें. शांतताभंग झाल्यास पोलिसाकडून योग्य बंदोबस्त राहण्याला कठिण पडतें म्हणून किंवा केवळ भपका व थाट यांसाठीं ही योजना आहे याची मला शंका आली. कारण, याच्यावरून प्रजासत्ताक राज्यव्यवस्थेंत सुद्धां राजसत्ताक राज्यव्यवस्थेंतल्या इतकाच थाटमाट व दर्शनी शोभा, यांविषयींची आवड जोरांत दिसून येते. लुव्ह्र राजवाड्यांत प्रदर्शनासाठीं ठेवलेलीं प्राचीन चित्रकलानिपुणांच्या हातचीं चित्रें व इतर ललितकलाविषयक कामें पाहून माझें मन मोहून गेलें. त्यांतील मिनिएचर्स(सूक्ष्म चित्रें)तर मला भारीच आवडलीं. लक्सेंबुर्ग येथील चित्रें व पुतळेही कमी मनोवेधक होते असें नाहीं.या साऱ्या वस्तु'ब्रिटिश रायल् अक्याडमी'-मध्यें प्रदर्शित झालेल्या वस्तूंच्या धरतीच्याच होत्या. हा

ल्व्हू राजवाडा ह्मणजे वास्तविक एक पदार्थसंग्रहालयच होय. हें पदार्थसंग्रहालय जवळ जवळ ब्रिटिश म्युझियम इतकें मोठें आहे आणि तेथें ठेवलेलें जवाहीर अत्युत्तम पैलूदार व उत्कृष्ट कोंदण केलेलें असून तें भारी किंमतीचें आहे. यासंबंधानें अशी आख्यायिका आहे कीं, राज्यक्रांतीच्या वेळीं तें लुटलें गेलें होतें. पुढें पारिस येथील एका घराचें छप्पर पाडतांना तें तेथें लपवून ठेवलेलें अवचित हातीं आलें. त्याच्यांत कांहीं सुरेख हिरे, 'अलाबास्तर'च्या उत्तमोउत्तम सुरया, जडावाचें अप्रतिम काम केलेल्या तरवारीच्या मुठी, वगैरे वस्तु आहेत. त्यांच्यावर नेहमीं सक्त पाहारा राहतो. तें एका उत्तम कारागिरानें तयार केलेल्या पेटींत ठेवलेलें असून त्याला हात लागतांच, तें पेटीसह आपोआप खालीं असलेल्या लोखंडी तिजोरींत उतरून बंद होतें !

पारिस शहराच्या बचावासाठीं पूर्वीं बास्टील नांवाचा किल्ला होता. त्यांतच राजकीय कारागृह होतें. त्याची जागा आह्मीं पाहिली. स. १७८९ सालीं पारिस येथील बिथरलेल्या प्रजाजनांनीं हल्ला करून, तो किल्ला पाडाव केला. तेव्हांपासूनच सुप्रसिद्ध फ्रेंच राज्यक्रांतीचा ओनामा समजला जातो. त्या हल्ल्यांत सामील असलेल्या सुमारें सहाशें इसमांचीं नांवें कोरलेलीं असलेला एक स्तंभ त्या जागीं उभा केलेला आहे. नाट्र डॉम् नांवाचें भव्य व विशाळ मंदिर माझ्या मनामध्यें फारच बिंबलें. त्याचा प्रचंड दर्शनी भाग व बाजूचे मिनारे,

भारींच सुरेख आहेत. पहिली राज्यक्रांति व पुढें इ. स. १७९२ ची काम्यूनची राज्यक्रांति, यांच्या वेळीं या मंदिराची पुष्कळच नासाडी झाली. तरीही तें भव्य व प्रेक्षणीय स्थळ आहे. सभोंवार पुष्कळ कोसपर्यंत तें दृग्गोचर होत असतें.

पांथियान् ही एक मोठी थोरली व भव्य इमारत आहे. ती पारिसची पुरस्कर्त्री सती जिनीव्हीव्ह् इजला अर्पण केलेल्या जुन्या प्रार्थनामंदिराच्या जागेवर पंधराव्या ल्युई राजानें बांधली आहे. या इमारतीचा सन १७९२ सालापासून पांथियान किंवा कीर्तिमंदिर ह्मणून उपयोग करूं लागले, व येथेंच फ्रान्स देशांतील विख्यात पुरुषांचीं प्रेतें पुरण्यांत येऊं लागलीं. पुढें दोन वेळां पुनः त्याचा मंदिराप्रमाणें उपयोग होण्याची तजवीज झाली. पण शेवटीं स. १८८५ पासून त्याचा पूर्ववत् कबरस्थानासाठींच उपयोग केला जात आहे. त्याच्या आंतील भाग ऐतिहासिक व दंतकथाविषयक चित्रें काढून सुशोभित केला आहे. राज्यक्रांतिद्योतक पुतळ्यांचा प्लास्तरचा कच्चा नमूना मध्यभागीं उभा केलेला आहे. त्यावरून संगमरवराच्या पुतळ्याचें कामही सुरू आहे. वरच्या बाजूस एक चित्र आहे. त्यांत जिनीव्हीव्ह् व जोन आफ् आर्क्, या दोघीं साध्वींनीं फ्रान्स देशाचें संरक्षण केलें, त्या संबंधी भविष्याचें यथार्थ द्योतन केलेलें आहे. जोन ऑफ आर्कच्या चरित्राचा द्योतक चित्रपट फारच प्रेक्षणीय आहे. त्याच्यांत विविध रंगांचा मिलाफ मोठ्या चातुर्यानें व

बेमालूम केला आहे. येथील घुमटाची उंची २७५ फूट आहे. पृथ्वी आपल्या आंसाभोंवतीं फिरते, याची प्रत्यक्ष सिद्धता करण्यासाठीं पेंड्युलम् किंवा घड्याळाचा लंबक याच्या चलनाच्या द्वारें अनुभव घेतला गेला, तो येथेंच. त्याच्या खालील गाभाऱ्यांत मिरॅबो, माराट, व्हाल्टेर व रूसो यांच्या कबरी आहेत. त्या आम्हीं पाहिल्या.

आणखी एक मनांत ठसण्यासारखी इमारत होटेल डी इन्व्हालिडिस् ही आह्मीं पाहिली. ती प्रारंभीं चौदाव्या ल्यूई राजानें बांधविली. पुढें पहिल्या व तिसऱ्या नेपोलियनांनीं, ती वाढवून तिची उत्तम दुरुस्ती करविली, आणि तिला पूर्व-रूपाला आणली. तेथें ५००० जखमी शिपाई राहण्याची सोय केलेली असून, हल्लीं त्यांत फक्त शंभरच शिपाई असलेले पाहून मला आश्चर्य वाटलें. येथील भव्य मंदिराचे दोन भाग असून त्याच्या मध्यभागीं एक उंच शोभिवंत स्थंडिल आहे. त्याच्यावर सभोंवतालच्या, रंगीत तावदानें लावलेल्या, खिडक्यांतून सुवर्णाप्रमाणें दैदीप्यमान सूर्यप्रकाश पडतो. यामधील जुना भाग जशाचा तसा आहे. त्याच्यांत लढायांमध्यें काबीज केलेलीं निशाणें ठेवल्यामुळें त्यास विलक्षण शोभा आली आहे. या जागेचा उपयोग हल्लीं येथें रहाणारे शिपाई लोक प्रार्थनेसाठीं करीत असतात. दुसऱ्या भागावर एक प्रचंड घुमट असून त्यास भव्य खांब दिलेले आहेत. तो आसपासच्या प्रदेशांत एक नाक्याचें ठिकाण झाला आहे.

त्याच्या खालीं एका वर्तुळाकार व उघडया हौदा–क्रिप्ट–मध्यें संगमरवरी दगडाच्या उंच अशा चबुत्र्यावर, त्याच दगडाची झारनें दिलेली नेपोलियनची भरदार कबर आहे. या कबरीसभोंवार नेपोलियननें मिळविलेल्या विशेष प्रसिद्ध विजयांचे निदर्शक असे, स्वच्छ पांढऱ्या संगमरवरी दगडांचे बारा पुतळे पाहऱ्यावर किंवा संरक्षक ह्मणून उभे केलेले आहेत. नेपोलियनचें प्रेत स. १८४० सालीं फ्रान्समध्यें आणलें गेलें. तेव्हां ही कबर तयार झाली नव्हती. पुढें कांहीं वर्षांनीं तें तिच्यांत ठेवलें गेलें. त्या गोल हौदांत जाण्याचा पंचरसी दरवाजा, नेपोलियननें आस्टर्लिट्झच्या लढाईंत पाडाव केलेल्या तोफा गाळून बनविलेला आहे. तेथेंच बाजूच्या एका कोठडीमध्यें नेपोलियनचा एक भाऊ व त्याचे कांहीं सेनाध्यक्ष, यांच्या कबरी आहेत. ज्या तोफेच्या गाड्यावरून त्या धुरंधर बादशहाच्या प्रेताची पेटी पारिस येथें आणली तो गाडाही आह्मीं पाहिला. जवळच्या खोलींत सेंट हेलेना बेटांत त्याच्या कबरीवर ठेवला असलेला दगड, तो मरण पावल्यावर वीस तासांतच घेतलेला त्याच्या चेहऱ्याचा ठसा, त्यानें राज्यारोहणप्रसंगीं घातलेला भव्य व मौल्यवान् झगा आणि त्याच्या कफनावर घातलेली चादर, हे जिन्नस ठेविलेले आहेत. तेही आह्मीं पाहिले.

नंतर आम्हीं या इमारतीला लागून असलेलें पदार्थसंग्रहालय पाहिलें. त्यांतील एका दालनांत फ्रेंच लोकांनीं जे सुप्रसिद्ध

विजय मिळविले त्या रणभूमीवरील स्मारक वस्तु व निशाणें ठेवलेलीं आहेत. दुसऱ्या एकांत अगदीं आरंभापासून उपयोगांत आलेल्या तोफा व बंदुका ठेवलेल्या आहेत. एका जागेंत भाले, बरच्या व तरवारी, यांचें सुरेखसें आयुधागार आहे. एका सबंध मजल्यावर फ्रेंच फौजेमध्यें उपयोगांत असलेले सर्व तऱ्हेचे लष्करी पोषाख घातलेले पुतळे आहेत. तसेंच फ्रेंच फौजेच्या सुप्रसिद्ध छावण्या, वेढे व लष्करी कवायती यांचे नमूने दुसऱ्या एका जागीं पाहण्यांत आले. आणखी एका मजल्यावर पृथ्वीवरील सर्व भागांतून फ्रेंच राजांना नजर आलेल्या लष्करी वस्तूंचा भला मोठा संग्रह आहे. त्यांमध्यें नेपोलियनला आलेल्याच नजरा किती तरी होत्या. तेथून निघण्यापूर्वीं पुढील चौकांत सज्जाच्या मध्यभागीं नेपोलियनचा मूळ आकाराचा पुतळा उभा केला आहे, तोही आम्हीं पाहिला. हा पुतळा त्याच्या मार्शलच्या पोषाखांत आहे.

जगप्रसिद्ध एफ्फेल टॉवरवर आम्ही चढून गेलों. तेथून खालीं पसरलेल्या चित्रविचित्र शहराचा विहंगमदृष्टीचा अत्युत्तम देखावा दृष्टीस पडतो. तो रंगीत भिंगें अगर दुर्बीण यांच्यांतून पाहिल्यास फारच मनोहर वाटतो. त्याच्या अफाट व चित्रविचित्र देखाव्यामध्यें फारच भव्य व टोलेजंग अशी आर्क डी ट्रायोंफ किंवा विजयकमान विशेष उठून दिसते. ती साऱ्या दुनयेंतील अप्रतिम व अत्युत्तम विजयकमानींपैकीं एक प्रमुख कमान आहे. ट्विलेरीस राजवाड्यापलीकडे

पूर्वेस 'क्लिओपाट्रा राणीची सुई' नांवाचा विलक्षण अखंड दगडाचा ( मिसर देशांतील विजयस्तंभ ) आणून उभा केलेला आहे, तोही दिसतो. याच जागीं पूर्वीं गिलोटीन नांवाचें, शिरच्छेद करण्याचें भयंकर यंत्र उभें केलेलें होतें. सोळावा ल्यूई राजा व त्याची हतभागी राणी, यांचा ह्याच यंत्रानें शिरच्छेद केला गेला होता. वय किंवा स्त्री-पुरुष यांतील भेदाभेदांचा यत्किंचित् विचार न करतां, फ्रेंच सरदार घराण्यांतील शेंकडोंशे लोक त्या यंत्रानेंच ठार केले गेले. त्या स्थळाकडे पाहतांच, ऐहिक सत्ता व अधिकार यांच्या विलक्षण परिवर्तनासंबंधीं विचार मनांत आल्यावांचून राहिले नाहींत. त्यांतच प्रजासत्ताक राज्यव्यवस्थेमध्यें सुद्धां, तैमूरलंग किंवा अतिशय दुष्ट व क्रूर मांचू बादशहांच्या अमलांतल्या प्रमाणेंच, जीविताविषयीं अत्यंत बेभरंवशाची स्थिति होणें शक्य असते, अशाही प्रकारचे विचार मनांत आले.

पारिसची हवा इतर युरोपांतील शहरांच्या मानानें फारच स्वच्छ व निर्मळ असते. ही गोष्ट तेथें जाणाऱ्या प्रत्येक नवख्या प्रवाशाला तेव्हांच स्पष्ट लक्षांत येते. व ही या शहरासंबंधाची एक विशेष गोष्ट आहे. सुंदर पुतळे व इतर स्मारकें आणि शोभिवंत इमारती यांच्या योगानें शिल्पकलेच्या बाबतींत हें शहर साऱ्या दुनयेंत कोणत्याही शहराला हार जाण्याजोगें नाहीं. या भव्य इमारती व पुतळे, स्पष्ट व फार दुरून दिसून येतात. येथील वातावरण स्वच्छ व सतेज आहे. लंडन येथील कुंद व

धूम्रमय हवेच्या मानानें, तें किती तरी चांगलें वाटतें. परंतु ब्रिटिश साम्राज्याची राजधानी जें लंडन शहर, तेथें धूर कांहीं कमी असता तर तेंही पारिस शहरापेक्षां कमी सुंदर दिसलें असतें असें नाहीं. तेथीलही पुष्कळसे रस्ते फारच प्रशस्त व सुरेख, अगदीं पारिसच्या रस्त्यांच्या तोडीचे आहेत.

फ्रान्स देशाची राजधानी ह्मणून पारिस शहराला जें महत्त्व आहे त्या मानानें त्या ठिकाणीं विद्याजर्नाच्या साधनांची उणीव नाहीं. आक्सफर्ड व केंब्रीज येथील युनिव्हर्सिट्यांपेक्षां तेथील युनिव्हर्सिटी निराळ्या तऱ्हेची असल्याचें दिसून आलें. कारण, तेथें राहण्याच्या सोई असलेलीं कॉलेजें नाहींत. पारिसमध्यें राहण्याचा खर्चही कमी आहे. हें लक्षांत घेतलें असतां एक नवी परकी भाषा शिकण्याची अडचण नसती तर, पुष्कळशा हिंदी विद्यार्थ्यांना तेथें जाणें सोईचें पडतें. तरी पण तसें करणें एकंदरींत फायदेशीर होतें किंवा कसें, याचा संशयच आहे.

तेथील हिप्पोड्रोम ( अश्वशाळा ) मध्यें प्रतिवर्षीं घोडयांचें प्रदर्शन भरतें. त्यांत घोडेस्वारीचीं कामें बरींच चांगलीं होतात. तसेंच घोडयाचें जीन, साज, सामान, वगैरेंचे नमूने तेथें ठेवलेले आहेत ते आम्हीं पाहिले. वस्तुतः तेथें घोडा व त्याच्या उपयुक्ततेसंबंधीं प्रत्येक वस्तु ठेवलेली दृष्टीस पडली. कांहीं सुप्रसिद्ध लष्करी घोडे व घोडेस्वार यांच्या तसबिरी

ठेवलेल्या होत्या. अशा तऱ्हेच्या इंग्रजी प्रदर्शनामध्यें कदाचित् व्यापारी दृष्टीची टापटीप व छानछोकी अधिक दृष्टीस पडती. पण तेथें उपयोगापेक्षां कौशल्यप्रदर्शनाकडे विशेष लक्ष दिलेलें दिसत होतें. अशा तऱ्हेच्या गोष्टी विशेष मोहक करण्यासाठीं फ्रेंच लोक किती तरी झटतात, हें सहज लक्षांत आल्यावांचून राहात नाहीं. उपाहारगृहें फारच काळजीपूर्वक सजवून तयार केलेलीं असतात, आणि त्यांच्या आश्रयदात्यांना सर्व तऱ्हेच्या भौतिक सोई व आराम मिळून ते खूष राहतील, यासाठीं सर्व तजविजी करण्यांत बिलकुल कसर केली जात नाहीं.

ब्रिटिश एम्बसी ( ब्रिटिश वकालती ) च्या मेहेरबानीमुळें आह्मांला येथील चेंबर आफ् डेप्युटीजचें काम पाहण्यास जाण्याची सवड मिळाली. तीही फारच चांगल्या व योग्य प्रसंगीं. कारण, त्यावेळीं तेथें सक्तीच्या लष्करी नोकरीची मुदत दोन वर्षांपासून तीन वर्षांपर्यंत वाढविण्याच्या भानगडीच्या प्रश्नाचा विचार चालू होता. तेथें फारच गर्दी होती. नियमित प्रेक्षकांपुर्तीच जागेची सोय केलेली असल्यामुळें, आह्मांला आमची पाळी येईतोंपर्यंत वाट पाहावी लागली. याचा आम्हांला कंटाळासा आला. आह्मी पुष्कळसे कमरे ओलांडून गेलों. वाटेंत अनेक कामदारांनीं आमची तपासणी केली. यामुळें खास चेंबरमध्यें पोहोंचेतोंपर्यंत पुष्कळ वेळ मोडली. कोण-राजाचें प्राणरक्षण करण्याचा प्रश्न असता तर इतकी सावध-गिरी ठेवण्याची आवश्यकता कोणाच्याही लक्षांत येती.

पण अशा लोकनियुक्त अधिकारी मंडळीच्या बचावासाठीं इतकी भारी खटपट व सक्त कोशिस करणें भाग पडावें, हें एक दैवदुर्विलसितच म्हणावयाचें ! तथापि अराजक मंडळीच्या चळवळीमुळें अशा प्रकारची खबरदारी घेणें जरूरीचें होतें.

आंत गेल्यावर ग्यालरीमध्यें आह्मांस बसविलें. आह्मी अंतरावर बसलों होतों तरी चाललेलें काम पाहण्याला व भाषणें ऐकण्याला अडचण पडली नाहीं. त्या ठिकाणीं चाललेला प्रकार मला विशेष भारदस्तपणाचा वाटला नाहीं. ही चेंबरची इमारत कांहींशी गोल थिएटराप्रमाणें आहे. तिच्यावरून प्राचीन रोमन फोरमचें कांहींसें स्मरण होतें. मध्यभागीं एक तक्तसें असतें. त्याच्यावर ठेवलेल्या खुर्चीवर अध्यक्ष बसतो. जमलेल्या मंडळीपुढें भाषण करणारा प्रतिनिधि तक्ताजवळ येऊन तेथून भाषण करितो. प्रत्येक पक्षापैकीं निवडक प्रतिनिधींनाच बोलूं दिलें जातें. पण वाटेल तो प्रतिनिधि, चाललेल्या कामांत व भाषणांत, जणों हक्कानें, व्यत्यय आणतो, असें दिसत होतें. वादविवाद रंगांत आला तसे प्रतिनिधि उतावीळ व बेफाम होऊन त्यांचे मनोविकार प्रबळ झाले, व साराच गोंधळ झालेला दिसला. वरचेवर आपसांत बाचाबाची चाले. स्वस्थता करण्यासाठीं सारखें ओरडून ओरडून अध्यक्षाचा घसा बसला, तरी त्याच्याकडे फारच थोडें लक्ष दिलें जात होतें. अध्यक्षाचा मान क्वचितच अगर नाहींच ह्मणण्याजोगा राखला जात होता. शांतता होण्यासाठीं व शिस्त राखण्याकरितां घंटा किती तरी वेळ वाजविली

जाई. पण व्यर्थ. या चाललेल्या प्रकारांत पुष्कळच जोराची चळवळ, हालचाल व कळकळ होती खरी, पण सारी तऱ्हा पार्लिमेंटच्या प्रतिनिधींच्या निवडणुकी होत असतांना उडणाऱ्या धांदलीसारखी दिसत होती. एका मोठ्या प्रबळ व थोर राष्ट्राचे जबाबदार प्रतिनिधि राजकार्य चालविण्यासाठीं सभास्थानीं विराजमान झाल्या प्रसंगीं जो बोज व जें महत्त्व असणें अवश्य आहे, त्याचा त्याच्यांत लवलेश दिसत नव्हता. आम्हां प्राच्यदेशीयांच्या मनामध्यें सभ्य वर्तनाविषयीं आदर पक्का बाणलेला असल्यानें मला ही सरकारी काम करण्याची तऱ्हा विशेष योग्य किंवा आदरणीय वाटली नाहीं. कदाचित् आम्हीं या प्रतिनिधींना त्यांच्या अत्यंत अव्यवस्थित स्थितीमध्यें पाहिलें असेंही असेल.

फ्रान्स देशांतील विशेष महनीय अशा सर्व ऐतिहासिक गोष्टींशीं अर्थात् पारिसचा निकट संबंध आहे. कोठेंही जा, तीन नांवें ऐकण्यांत येतात. नेपोलियन, जोन ऑफ आर्क् व सेंट् जिनीव्हीव्ह्. त्यांतही नेपोलियन हा अग्रगण्य वीर होय. या ओजस्वी साहसिकासंबंधें कोणी कांहीं म्हणो. एवढी गोष्ट खरी कीं, त्यानें ज्या अनेक अत्यंत महत्त्वाच्या व भारी सुधारणा जारी केल्या त्यांच्यामुळें फ्रान्स देश आजकाल सुधारणेच्या कांहीं बाबतींत विशेष अनुकरणीय बनला आहे.

पारिसपासून क्यालेला जातांना वाटेंत कांहीं विशेष प्रकार पाहण्यांत आला नाहीं. रस्ता बहुतेक सपाट प्रदेशांतूनच आहे.

पण आह्मी त्या फ्रेंच बंदराच्या जवळ जवळ पोहोंचलों, तशा कांहीं थोडया टेंकडया डोकावूं लागल्या. त्यांच्या नंतर कारखान्यांमधील धूर जाण्याच्या उंच नळ्यांचें—चिमण्यांचें—ब्राह्यांग दिसूं लागलें. त्यावरून क्याले हें एक कारखान्यांचें व घडामोडींचें शहर असून इंग्लंड व फ्रान्स या देशांतील दळणवळणांचें मुख्य ठिकाण आहे असें दिसलें.

आह्मीं धि चानल ( इंग्लिश खाडी ) ओलांडली तेंव्हां समुद्र खवळलेला नव्हता. यामुळें समुद्र लागण्याच्या त्रासापासून आम्ही वांचलों. लौकरच डोव्हरजवळचे पांढरे शुभ्र पहाडांचे कडे ओळखतां येऊं लागले. तेथला प्राचीन व भव्य किल्ला आपल्या उंच मोर्चावरून चानलवर गर्वानें डोकावत असलेलाही दिसूं लागला. आह्मी आगबोटीवरून उतरल्याबरोबर जणों दुसऱ्या आपल्याच घरीं पोहोंचलों, असें माझ्या अंतःकरणाला भासूं लागलें. पुढील अनुभवावरून ही भावना दृढतर झाली. ग्रेट ब्रिटन मधील किती तरी स्थळांविषयीं मीं इतकें कांहीं वाचलें ऐकलें होतें आणि इतकीं कांहीं चित्रें पाहिलीं होतीं कीं, वरचेवर पुष्कळचसे भाग व वस्तु पाहून, त्या जणों पूर्वपरिचयाच्या असाव्या असें वाटे. फार तर आमच्या खुद्द इलाख्याशिवाय हिंदुस्थानांतील इतर प्रदेशाविषयीं, मला असें क्वचितच ह्मणतां आलें असतें.

# भाग सहावा.

## साम्राज्याची राजधानी.

' हे लंडनच्या चमकणाऱ्या दीपांनो, तुम्ही आपल्या दीप्तीमुळें जणों त्या शहराच्या मुकुटांतील रत्नराजीच शोभतां आहां. हे लंडन शहरांतील ज्योतींनो, तुमच्या अंतर्भागीं किती तरी वैभव व संपत्ति वास करिते आहे ! '

जी. आर्. सिम्स्.

लंडनला आम्ही ज्या रेल्वेमार्गानें गेलों तो सुपीक, मजेदार चढ-उतारानें युक्त, वृक्षराजींनीं सुसमृद्ध व शोभिवंत, अशा प्रदेशांतून जातो. तेथील सुपीक जमीन आणि निरनिराळीं व विपुल पिकें, यांच्यावरून कॆंट् परगणा इंग्लंडमधील बगीचा ह्मणविला जातो. त्याच्यांतील पुष्कळच मोठमोठ्या शेतांमध्यें—हीं शेतें पुढें आह्मीं समक्ष जाऊन पाहिलीं—हाप्सचीं फुलें फुललीं म्हणजे, तीं वेंचण्याला शेंकडो आबालवृद्ध स्त्री-पुरुष जातात. तेथें त्यांना मनमुराद काम मिळतें. हीं झाडें सुमारें दहा फूट उंच डांभांवर चढविलेलीं असतात. हाप्सचा देशी दारू तयार करण्याकडे उपयोग होतो. हीं फुलें वेंचण्याचा हंगाम उन्हाळ्याच्या अखेरीचा असून तीं वेंचल्यानंतर काळजी-

पूर्वक वाळवितात आणि गोणत्यांत घट्ट भरून, बाजारांत पाठवितात.

लंडनमध्यें आह्मी हैड पार्कजवळ बेलीज् होटेलमध्यें उतरलों. तेथें आम्ही मोठ्या आरामांत व सुखानें राहिलों. साऱ्या भूमंडळावर लंडन शहर फारच मोठें व समृद्ध आहे. तेथील विलक्षण वैचित्र्य व मोहकपणा, यांचें योग्य वर्णन करण्याला, तसा कसलेला व प्रतिभाशाली लेखकच पाहिजे. तेथील घडामोड अशा कांहीं अवाढव्य प्रमाणावर आहे कीं, या राजधानीच्या शिवेंत प्रथमच पाऊल ठेवणारा परका मनुष्य प्रारंभीं पार गांगरून जातो. आह्मां हिंदी लोकांना लंडन ह्मणजे एक भली थोरली उतारपेठ, किंवा अनंत चळवळींनीं युक्त व गजबजलेलें असें एक जणों मधमाशांचें प्रचंड पोवळेंचसें भासतें.

याच ठिकाणीं खरोखर आखिल विश्वाचा विवर्तनकील आहे. कारण, पारिस किंवा न्यूयॉर्क यांचे पेक्षां लंडन शहर हें अधिक प्रमाणांत जगन्मित्र [ विश्वकुटुंबी Cosmopolitan ] आहे. तेथील वस्तींत भूगोलाच्या सर्वही भागांतून आकृष्ट झालेल्या नागरिकांचा समावेश होतो. या शहरच्या कोसोंगणती रस्त्यावर व पन्नाससाठ लक्ष वस्तींत, सर्व राष्ट्रें, जाति व धर्म यांचे प्रतिनिधि प्रत्यहीं आढळतात. कारण, या राजधानीच्या स्वागतशील प्राकारांत जातिविषयक भेदाभेद पुष्कळ अंशानें मानला जात नाहीं.

या ठिकाणीं मानवप्राण्यांचा इतका कांहीं प्रचंड समूह एकत्र झालेला आहे कीं, तो पाहून पाहणाऱ्याला स्वतःच्या तृणप्रायतेची तात्काळ प्रतीती होते. स्वतःचें व्यक्तिविषयक भान पार विसरून जातें. आपण एक कस्पटप्राय अणुरेणु किंवा या प्रचंड प्राणिमय महासागरांत एक यःकश्चित् बुद्बुदवत् आहों, असें त्याला वाटूं लागतें. तेथील अजस्र व बादशाही इमारती, प्रशस्त व विस्तृत राजमार्गांमध्यें फिरणाऱ्या मोटार गाड्या, टाक्सी क्याब, व नानातऱ्हेचीं लहान मोठीं वाहनें आणि दुतर्फा रुंद व प्रशस्त फरसबंदी पायवाटांवरून, पुष्कळ अंशानें चांगला पोषाक केलेले पुरुष, स्त्रिया व मुलें, यांची गर्दीची व सतत चाललेली रहदारी, इत्यादि गोष्टी पाहून, प्रेक्षकाच्या मनांतील कल्पनातरंगांना अधिकच ऊत येतो. या रहदारींतील कांहीं लोकांचे चेहरे उदास असून ते कांहीं तरी विशेष महत्त्वाच्या कामगिरीवर जणों तांतडीनें जात असल्याचें वाटतें. दुसरे कांहीं खुशालचंद गमतीनें रस्त्याच्या बाजूंच्या मोहक व रमणीय दुकानांकडे दृष्टि देत चाललेले दिसतात. हीं दुकानें ह्मणजे लंडन शहरांतील राहणीचीं आल्हादकारक प्रदर्शनेंच होत.

या अनुपम अफाट राजधानीचा अतिउत्तम देखावा पाहण्याला नाक्याची जागा ह्मटली ह्मणजे टेम्स् नदीवरील ठिकठिकाणच्या अनेक सुंदर पुलांपैकीं एखाद्या पुलाचा सज्जा होय. या ठिकाणाहून विहंगमदृष्ट्या पाहिलें असतांना, उद्योगमग्न व प्राणिसंचारामुळें जणों उचंबळणाऱ्या या शहराचा व

त्याच्या सभोंवतालच्या अनेक सीमांत स्थळांचा देखावा पाहणाऱ्याच्या दृष्टीस पडतो. वर्ड्स्वर्थ कवीनें वेस्टमिन्स्टर पुलासंबंधानें एक सुप्रसिद्ध सॉनेट ( सुभाषितपद्य ) लिहिलेलें आहे. त्यांत त्यानें त्या पुलावरून ऐन प्रातःकाळीं दृष्टीस पडणाऱ्या लंडनच्या देखाव्याचें फारच अर्थपूर्ण, उज्ज्वल आणि चटकदार वर्णन केलें आहे. तें मीं हिंदुस्थानांत कॉलेजांत असतांना वाचलें होतें. तेव्हां त्या देखाव्याची मला फक्त अंधुक कल्पना आली होती. परंतु तो देखावा ज्यावेळीं मी स्वतःच्या नेत्रांनीं पाहिला, त्यावेळीं माझ्या अंतःकरणामध्यें त्या कवीच्या स्फूर्तीचा अंशतः उद्गम झाला आणि लंडन व त्याचें सौंदर्य यांचें, या कविवर्यानें जें विशद चित्र रेखाटलेलें आहे, त्याचें खरें मर्म पूर्णपणें माझ्या लक्षांत आलें.

लंडन येथें पोहोंचल्यावर मी प्रथम इंडिया ऑफिसांत गेलों व बरोबर आणलेलीं ओळखीचीं पत्रें सादर केलीं. तेव्हां अर्ल क्र्यू, पर्मनंट अंडर सेक्रेटरी, पार्लमेंटरी अंडर सेक्रेटरी आणि कौन्सिलचे मेंबर लोक यांनीं मोठ्या आदरपूर्वक मला भेटी दिल्या. लॉर्ड क्र्यूबरोबर माझें पुष्कळ वेळ भाषण झालें. तेथील प्रमुख कायमच्या अधिकाऱ्यांशींही माझीं बरींच संभाषणें झालीं. त्यांतील कांहीं हिंदुस्थानांत गेलेले नव्हते, तरी त्यांनासुद्धां तिकडील कामाकारभाराची चांगलीच माहिती असल्याचें दिसून आलें. याशिवाय मी लौकरच कोल्हापूरच्या राजपुत्रांच्या

भेटीला जाऊन आलों. ते व त्यांचे सोबती, हल्लीं हेन्डेन येथील एका खानगी शाळेंत विद्याभ्यासासाठीं राहिले आहेत. त्यांचें राहतें घर सुरेख आहे, आणि एलिझाबेथ राणी कांहीं दिवस तेथें राहिली होती, यामुळें त्याला ऐतिहासिक महत्त्व आलें आहे. तेथें असतांना तिनें एक झाड लाविलें होतें. तें अद्यापि कायम आहे. तें माझ्या पाहण्यांत आलें.

हेंडेन येथील लंडन फ्लाइंग ग्रौंड्स् किंवा आधुनिक विमानें उडविण्याच्या जागेंतूनच मीं पुढें कांहीं दिवसांनीं एका 'बायप्लेन' मधून प्रथम अंतरीक्षसंचार केला. हवेमध्यें वर उडून जाऊं लागतांना एक नवीनच प्रकारची व अंतःकरणाला उल्हास आणणारी वृत्ति होते. प्रारंभीं मला किंचित् कचरल्यासारखें वाटलें, ही गोष्ट मला कबूल केली पाहिजे. पण लवकरच ही भावना नाहींशी होऊन तिच्या ऐवजीं मनांत विश्वास उत्पन्न झाला. वरच वर आकाशांत मेघमंडळाकडे जाऊं लागलों, तसा खालीं असलेला जनसमुदाय, मुंग्यांच्या गजबजलेल्या वारुळासारखा दिसूं लागला. लंडनचा अफाट विस्तार क्रमाक्रमानें, हळू हळू पसरलेल्या चित्रपटाप्रमाणें अधिकाधिक निदर्शनास येऊं लागला. वर जाण्याच्या वेळेप्रमाणेंच खालीं उतरणें सुखानें पार पडलें, तेव्हां आमच्या राणीसाहेबांचा जीव खालीं पडला. हें आमचें साहस केव्हां व कसें सुखरूप पार पडतें, याविषयीं त्या कांहीं अंशीं काळजींतच होत्या.

लंडनमधील प्रेक्षणीय वस्तु पाहणें म्हणजे एक दिव्यच करण्यापैकीं होय ! प्रेक्षकांचें चित्त आकर्षण करणारीं इतकीं कांहीं स्थळें येथें आहेत कीं, या अर्वाचीन बाबिलॉन शहरांतील नानातऱ्हेचे जणों निधीच असे चित्ताकर्षक व प्रेक्षणीय वस्तूंचे संग्रह, यांची नुसती तोंडओळख होण्यालासुद्धां महिनेच्या महिने लागतील. एक अमेरिकन कोट्याधीश सेंट पालच्या देवालयावर चढून तेथून या राजधानीचा देखावा पाहात होता. तेव्हां त्यानें, ' वाः, लुटून फस्त करण्याला काय तरी उत्तम शहर हें ! ' असे उद्‌गार काढल्याचें ह्मणतात. खरोखरच साऱ्या भूमंडळावर अपरंपार संपत्ति व वैभव यांच्या संबंधांत लंडनइतका अभिमान बाळगतां येणारीं शहरें फारच थोडीं आहेत. येथील सेंट पालचें देवालय ह्मणजे एक परंपराप्राप्त अमूल्य चीज आहे. त्याच्याविषयीं कोणत्याही राष्ट्राला अभिमान व प्रौढी बाळगतां येईल. प्रथमचें देवालय सन १६६६ सालच्या भयंकर अग्निप्रलयामध्यें खाक झालें. त्याच जागीं सर ख्रिस्टोफर रेन यानें सन १६७५ सालीं, हल्लींची प्रचंड इमारत पुरी केली. त्याचा खर्च कोळशावर कर बसवून भागविला होता. तेथील अत्यंत प्रमुख व नामांकित काम म्हणजे त्याचा प्रचंड व भव्य घुमट होय. त्या घुमटावर एक मोठा थोरला गोल व क्रॉस असे बसविलेले आहेत. तो क्रॉस जमिनीपासून सुमारें चारशें

फुटांच्या उंचीवर आहे. या देवालयांत पुरलेल्या थोर व शूर वीरांमध्यें नेल्सन् व वेलिंग्टन् जवळ जवळ पुरलेले आहेत. इंग्लंडच्या इतर सुप्रसिद्ध महात्म्या पुरुषांना शेवटचें विश्रांतिस्थान वेस्टमिन्स्टर ॲबे मध्यें मिळालेलें आहे. तीही एक भारी शोभिवंत व भव्य इमारत आहे. तिचें बांधकाम प्रथमतः एडवर्ड दि कन्फेसर राजानें सुरू केलें; व तें विल्यम दि कांकरर याच्या राज्यारोहणप्रसंगीं नुकतेंच पुरें झालें होतें. त्या इमारतीमध्यें पुष्कळ राजे व राण्या दफन झाल्या आहेत. नामांकित कवि, धुरंधर मुत्सद्दी, शूर योद्धे, इत्यादिकांचाही तेथेंच समावेश आहे. त्यांतच हिंदुस्थानच्या इतिहासांत नांवाजलेले व सर्वमान्य असेही पुष्कळ लोक आहेत. हल्लींचे आपले सार्वभौम बादशहा आदिकरून बहुतेक सर्व इंग्लिश राजे लोकांचे राज्याभिषेकसमारंभ, याच प्राचीन इमारतीच्या प्राकारांत झालेले आहेत.

बाहेरून आलेल्या प्रेक्षकांचें अक्षय्य चित्त वेधणारी येथील दुसरी इमारत म्हणजे प्राचीन गिल्ड हॉल ही होय. मोठमोठे सामाजिक जलसे व परदेशी राज्यकर्ते आणि इतर विख्यात गृहस्थ, यांचे सार्वजनिक स्वागतसमारंभ करण्याची जागा म्हणून या गिल्ड हॉलची प्रसिद्धि आहे. त्याच्या जवळच एक अत्युत्तम पदार्थसंग्रहालय, चित्रशाळा व सार्वजनिक पुस्तकालय व वाचनालय हीं आहेत. तेथें

सर्वांना फुकट जाण्याला मोकळीक आहे. हीं सर्व स्थळें चांगलीं फुरसतीनें पाहून काळजीपूर्वक निरीक्षण करण्याजोगीं आहेत. तेथून थोड्याशा अंतरावर, म्यान्शन हौस आहे. तें बांधण्यास सत्तर हजार पौंड, किंवा साडेदहा लक्ष रुपये लागले. प्रतिवर्षीं जो नवीन ' लॉर्ड मेयर ' नेमला जातो, त्याचें सरकारी ठाणें या इमारतींत असतें.

या शहराच्या कार्पोरेशनला स्थानिक स्वराज्यासंबंधांत, त्याच्या प्राचीन परंपरेअन्वयें, विशिष्ट हक्क प्राप्त झालेले आहेत, हें येथें जातां जातां नमूद करण्याजोगें आहे. त्या कार्पोरेशनच्या ताब्यांत एक चौरस मैल शहराचा खास भाग आहे. त्याच्या हद्दींतून थेट पुढें जाणारे गंदेनाले, लोकशिक्षण आणि दुसऱ्या एक दोन बाबतींशिवाय करून, सारे स्थानिक अधिकार या कार्पोरेशनकडेच आहेत. लंडन शहराच्या इतर भागांहून अलग अशीं पोलिस व न्यायाचीं कोर्टेंही त्याचीं स्वतंत्र आहेत. शिवाय, त्यांच्या हद्दीबाहेर सात मैलांतल्या मार्केटांचा ( बाजारांचा ) मक्ताही त्याच्याकडे आहे. लंडन शहराच्या बाकीच्या भागांमध्यें २८ ' बरो ' किंवा विभाग केलेले आहेत, त्या सर्वांवर ' लंडन कौंटी कौन्सिल'चा अधिकार आहे. प्रत्येक ' बरो'वर एकेक ' मेयर ' नेमलेला असतो. ' लंडन कौंटी कौन्सिल 'च्या एका साप्ताहिक सभेला मी गेलों होतों. त्या संस्थेमध्यें प्रत्येक ' बरो ' कडून प्रतिनिधि निवडलेले आहेत.

ही सभा भरण्याची जागा पारिस येथील 'चेंबर आफ डेप्युटीज्' सारखीच अर्धगोलाकृति बांधलेली आहे. या संस्थेमध्यें बऱ्याच स्त्रियाही सभासद आहेत. सभासद या नात्यानें त्या चांगलें काम करीत आहेत इतकेंच नव्हे, तर 'बोर्ड्स आफ् गार्डियन्स' च्या सभासदपणाचेंही काम त्या उत्तम करितात. 'वर्क हौस' (अशक्त, बेरोजगारी लोकांना अटकावून ठेवून त्यांच्याकडून त्यांच्या योग्य काम घेऊन, त्यांच्या राहण्याची व खाण्या-पिण्याची सोय करण्याच्या जागा) व 'इन्फर्मरी' (निराश्रित अपंग लोकांसाठीं धर्मशाळेवजा जागा) यांच्यामध्यें मुलें व गरीब आजारी लोक, यांची नीट काळजी घेणें, यासंबंधांत त्या मेंबर स्त्रियांच्या हातून चांगलेंच काम होतें आहे, हें ऐकून मला कौतुक व समाधान वाटलें.

या शहरामध्यें प्रतिवर्षी जे अनेक ठराविक समारंभ होतात, त्यांत 'लॉर्ड मेयर'च्या मिरवणुकीचा देखावा हा मुख्य होय. आह्मी लंडनमध्यें राहात असतांना, शेवटीं शेवटीं, तो आह्मांला पाहण्यास सांपडला. प्रसिद्ध राजपुरुषांविषयीं प्रजाजनांनीं दाखविलेली पूज्यता, भक्ति व आदर यांची तऱ्हा मीं पूर्वी पाहिलेली होती. शहरांतील उत्तम प्रकारें शृंगारलेल्या रस्त्यांमधून नवीन नेमलेल्या 'लॉर्ड मेयर'ची स्वारी निघाली असतांना नागरिक बंधुजनांच्या हातून त्यांचें जें उत्साहपूर्वक व जयघोषयुक्त स्वागत होत असतें, त्या विजययात्रेचा समारंभ

पाहत असतांना मला कमी आनंद झाला किंवा कमी कौतुक वाटलें असें नाहीं. ही मिरवणूक 'म्यान्शन हौस' पासून निघून 'लॉ कोर्ट्स' (न्यायाच्या कोर्टा) पर्यंत गेली. तेथें या नव्या 'लॉर्ड मेयर' नें (समाजश्रेष्ठीनें) आपल्या कामासंबंधानें शपथ घेण्याचा विधि झाला. ही सारी मिरवणूक फारच छान व भपकेदार होती, आणि त्यांतील अत्यंत प्रमुख देखावा ह्मणजे मेयरच्या भपकेदार रथाला सोन्याचा मुलामा केलेला असून, त्याला उत्तम चौकडी जोडलेली होती; आणि त्याच्या आघाडीला लाईफ गार्ड्स स्वारांची तुकडी ब्यांडसहित चाललेली होती, हा होय. लंडनमधील प्राचीन कंपन्या व गिल्ड–निरनिराळ्या कारागीर लोकांच्या सनदी मंडळ्या–आपापलीं परंपराप्राप्त प्राचीन निशाणें फडकावीत चालले होते. तेही बरेच गमतीचे दिसत होते. न्यू रिव्हर कंपनीच्या स्थापनेचा त्रिशतसांवत्सरिक उत्सव याच वेळीं साजरा करण्यांत आला होता. त्यांत तीनशें वर्षांपूर्वींच्या लार्ड मेयरच्या मिरवणुकीच्या समारंभांतील कांहीं देखाव्याचें पुर्तेपणीं अनुकरण केलें होतें. रिव्हर जायंट (नदीरूपी राक्षस) याचा बारा फूट उंचीचा एक अवजड पुतळा तयार केला असून एक चांदीचें चिलखत घातलेला बटुवीर तो घेऊन आघाडीस चालला होता. लंडन शहराला पाण्याचा पुरवठा करण्यासाठीं न्यू रिव्हर स्कीम उभारून तिचें काम पुरें करण्यांत आलें होतें. त्याचें प्रदर्शन करण्यासाठीं हें एक द्योतक चिन्ह केलेलें होतें. त्या काळीं हें एक भारी

अजब काम समजलें गेलें होतें. या साऱ्या मिरवणुकींतील मुख्य व प्रेक्षकांना अत्यंत आवडणारा भाग ह्मटला म्हणजे जमिनीवरील व दर्यावर्दी लष्करी प्रदर्शन हा होता. तो मुख्यतः या शहराशीं संबंध असलेल्या प्रांतिक फौजेच्या पलटणी, निरनिराळे क्याडेट कोर, बॉय स्कौट्स, दर्यायी स्कौटस व मुलांच्या ब्रिगेडी, यांनीं संघटित होतां! त्यांतील मुलें खूप ऐटीनें पावलें टाकीत होतीं. त्यांच्यापैकीं पुष्कळांच्या पुढें त्यांचेच ब्यांड वाजत होते. इंग्लंड देशांत आजकाल वाढत्या पिढीला जें उत्कृष्ट शारीर-शिक्षण दिलें जात आहे, त्याचे चकित करून सोडणारे व पक्के मनावर ठसण्याजोगे नमूने या मुलांच्या लष्करी चालीवरून डोळ्यांसमोर येत होते. या मिरवणुकीच्या सर्व रस्त्यांवर दोन्ही बाजूंस जमलेली प्रेक्षक लोकांची चिकार गर्दी पाहून, भपकेदार तमाशे, मिरवणुकी व ते पाहण्याची हांव, पूर्वेकडील लोकांप्रमाणेंच पाश्चिमात्यांच्याही अंगीं किती तरी प्रबळ व खिळलेली आहे, यासंबंधानें माझी खात्री दृढतर झाली.

बो स्ट्रीट मधील पोलीस कोर्ट हें या राजधानींतील किरकोळ गुन्ह्यांची झटपट चौकशी करण्याचें मुख्य न्यायाचें कोर्ट होय. तें मी पाहण्यास गेल्या वेळीं इंग्रजी न्याय इन्साफ करण्याच्या तऱ्हेची प्रथम व प्रत्यक्ष ओळख होण्याची मला संधि मिळाली. म्याजिस्ट्रेट एका उंचशा लिहिण्याच्या मेजाजवळ बसला होता. जवळच

कायद्याच्या पुस्तकांचा लहानसा संग्रह होता. म्याजि-स्ट्रेटचा पोषाक नेहमींचाच साधा होता. दाखल झालेल्या मुकदम्यांचा तो पद्धतशीर पण तडकाफडकी निकाल करीत होता. फाजील पुरावा ऐकण्याच्या कामीं वेळाचा अपव्यय केला जात नव्हता. कोर्टाचें काम आटोपल्यावर तेथील एका कामदारानें कैद्यांच्या पिंजऱ्याकडे बोट दाखवीत म्हटलें, यांतून कांहीं उत्तमोत्तम तसेच कित्येक अट्टल बद-माषही निघालेले आहेत. त्यावर मीं कायद्याच्या तावडींत सांपडलेल्या उत्तमोत्तम पुरुषाचें नांव विचारतां चटकन् डॉक्तर जेमसन असें उत्तर मिळालें. त्याला त्याच्या इतिहासप्रसिद्ध अशा ट्रान्सव्हालमध्यें केलेल्या दौडीसंबंधानें पिंजऱ्यांत उभें राहावें लागलें होतें.

प्रीव्ही कौन्सिलच्या ज्युडिशिअल कमेटीच्या एका बैठकीच्या वेळीं हजर राहण्याची संधि मीं मोठ्या आनंदानें साधून घेतली. त्यांच्या बैठकीचा कमरा साधासाच होता, आणि या कमिटीसमोर काम करण्याची पद्धत ह्मणण्यासारखी नियमबद्ध नव्हती. हिंदुस्थान व समुद्रपारचे इतर राज्यविभाग यांतून होणाऱ्या अपीलांची सुनावणी या कमेटीपुढें होते. हें कोर्ट केवळ सल्लागार म्हणून काम करीत असून त्याच्या समोर चाल-लेल्या अपीलांचा अखेरचा निकाल देण्याचें काम लाक्षणिक-रीत्या बादशहांसाठीं राखून ठेवितात.

# भाग सातवा.

## लंडनचा आसमंतात्-भाग.

या राजधानीच्या सभोंवार असलेलीं प्रेक्षणीय स्थळें आम्ही पुष्कळ वेळ जाऊन फिरून पाहून आलों. त्या सर्व खेपा आम्हांला चांगल्या मनोरंजक व मजेदार वाटल्या. टेम्स नदीच्या कांठीं असलेली क्यू येथील रॉयल गार्डन्स—बादशाही बाग—मला फार पसंत पडली. तिच्यांत वळणें असलेले नागमोडी रस्ते, चतुराईनें लावलेले फुलझाडांचे तक्ते, फुलझाडांच्या रक्षणशाला (Conservatories), आणि प्रशस्त हिरवळीचे तक्तेच्या तक्ते, इत्यादिकांची अप्रतिम योजना केलेली आहे. सर्व भूमंडळावरील ब्रिटिश हद्दींत उत्पन्न होणाऱ्या सर्व तऱ्हेच्या वृक्षवल्ली, येथें लावल्या जाव्या, यासाठीं ही व्यवस्था केलेली आहे. खरोखर पृथ्वीच्या सर्व भागांतील सृष्टिसौंदर्याचें संमेलन—एकीकरण—मोठ्या संगतवार रीतीनें केल्याचें या ठिकाणीं नजरेस पडतें. उष्ण व शीत या दोन्ही कटिबंधांचें येथें जसें कांहीं लग्न लावलें गेलें आहे, असें वाटतें; आणि

सृष्टिदेवतेच्या अमर्याद साधनांचा जणों या ठिकाणीं एक सुंदर वस्तुपाठच दाखविला आहे कीं काय असा भास होतो. या विस्तीर्ण उपवनाच्या मध्यभागीं एक अवाढव्य काच-गृह उभें केलेलें आहे. प्यासिफिक महासागरांतील बेटांमध्यें वाढणारे पंखेदार पानांचे तालसम वृक्ष, मसाले उत्पन्न होणारीं हिंदुस्थानांतील झाडें, वटवृक्ष, कापशीचीं व निळीचीं झुडपें, या काचगृहाच्या विस्तीर्ण छताखालीं उभीं आहेत. त्याच्या पुढेंच एक कृत्रिम तलाव आहे. त्याच्यांत छानदार हंस तरत असतात. जवळच थोड्याशा पायऱ्या उतरून गेल्यावर 'रॉकरी' किंवा शिलामय रमणीय स्थल आहे. तेथें पहाडी पुष्पें उमललेलीं आढळतात. एक जपानी बगीचा व शिखरदार मंदिर, यांच्या योगानें या मजेदार देखाव्याला प्राच्यरूप प्राप्त झालेलें आहे. येथें सर्वांना पाहण्याला फुकट जाऊं देतात. प्रतिवर्षीं तेथें सुमारें दहा लक्षांवर लोक पाहण्यास जातात.

दुसऱ्या एका खेपेला आम्ही 'वुल्विच् अर्सनल' पाहून आलों. हा तोफा ओतण्याचा सरकारी कारखाना आहे. त्याच्यांत सुमारें बारा हजारांवर मजूर तोफा, बंदुका वगैरे आधुनिक संहारक यंत्रें व अवजारें तयार करण्याचें काम करीत असतात. आम्हीं तोफा तयार होत असलेल्या पाहिल्या. त्या अजस्र 'क्रेन'—पकडून उचलण्याचीं यंत्रें—यांमध्यें धर-लेल्या होत्या. त्यांच्या द्वारें किती तरी मानवप्राण्यांचा

संहार होण्याचा संभव आहे, याविषयीं मनांत अवश्य विचार येतात. याच्या अगदीं उलट स्थिति 'ग्रीनविच' येथील जगप्रसिद्ध ऑब्झर्व्हेटरी किंवा वेधशालेची आहे. तीही आह्मीं जाऊन पाहिली. तिच्या द्वारें किती तरी नवीन उपयुक्त शास्त्रीय शोध लागलेले आहेत. ही वेधशाळा चांगली उंचावर आहे. तेथून टेम्स नदी दोन्ही बाजूंला वळणावळणांनीं संथपणें वहात असलेली सुरेख दिसते. पश्चिमेकडे क्रिस्टल प्यालेस—कांचमहाल—याचें काचेचें छप्पर दिसत होतें. हा महाल अगदीं प्रथमच्या सार्वराष्ट्रीय प्रदर्शनाचें स्मारक आहे. तें प्रदर्शन, जगांतील सर्व राष्ट्रांचीं परस्पर स्नेहबंधनें दृढतर व्हावीं, या हेतूनें भरविलें गेलें होतें.

पुढें एकदां आम्ही सांडहर्स्ट कॉलेजला गेलों. ही आमची सफर मोठी मजेची झाली. लष्करी खात्यांत हुद्देदार नेमलेल्या लोकांना येथें लष्करी शिक्षण दिलें जातें. हिंदुस्थानांतील पोलिटिकल ( राजकीय ) खात्यांतील पुष्कळसे कामदार या कॉलेजांतून पास झालेले असतात. ही इमारत व तिच्या आसपासचीं विस्तृत व मोकळीं मैदानें आणि अश्वारोहणशाला हें सर्व आह्मांला दाखविण्यांत आलें. या कॉलेजांत सहा कंपन्या किंवा विभाग असून, त्यांपैकीं प्रत्येक विभागांत निरनिराळे वर्ग आहेत. येथें सांगोपांग शिक्षण देण्याची सोय केलेली असून, या शिक्षणक्रमांत अलीकडील कांहीं वर्षांत बरीच सुधारणा

झालेली आहे, असें आह्मीं ऐकिलें. या कॉलेजांत पूर्वीं निवड-णुकीनें भरती होत असे, पण आतां परीक्षा घेतात. नुकत्याच झालेल्या परीक्षेला, जागा भरण्याच्या होत्या, तितकेच उमेदवार होते, ह्मणतात.

आम्ही लंडन येथें असतांना तेथील सीझन–सामाजिक समा-रंभांचा–जलशांचा–हंगाम–ऐन बहारींत होता. आम्हांला अशा निरनिराळ्या प्रसंगांला हजर राहण्याबद्दलचीं अनेक आमंत्रणें आलीं असल्याकारणानें या ऐषआरामसमारंभांच्या चालू अस-लेल्या सत्रांत सामील होऊन मजा पाहाण्याचा हक्क व बहुमान अनायासें मिळाला होता. सेंट जेम्स प्यालेस राजवाडयांत झाले-ल्या बादशाही ' लेव्ही 'ला ( दरबाराला ) मी गेलों होतों. त्या प्रसंगीं पुष्कळसे हिंदी गृहस्थ आलेले होते. पण या सर्वां-मध्यें उत्कृष्ट, उज्ज्वल व प्रेक्षणीय प्रसंग बकिंगह्याम् प्यालेस मध्यें झालेला ' स्टेट बॉल' किंवा बादशाही नाच हा होय. तेथील देखावा, आजवर माझ्या पाहाण्यांत आलेल्या सर्व प्रसंगांमध्यें खरोखर अव्वल प्रतीचा व अवर्णनीय भपकेदार होता. हिंदी राजपुत्र म्हणून बरेंचसें जडजवाहीर माझ्या दृष्टी-खालून गेलें असलें तथापि, या प्रंसगीं मंडळींनीं अंगावर घातलेल्या रत्नमण्यांचें तेज व अप्रतिम सौंदर्य पाहून मी अगदीं चकित झालों. तसेंच या समारंभास आलेल्या स्त्रियांचे अतिशयच छानदार कपडे आणि लष्करी व दरबारी लोकांचे भपकेदार पोषाक,

यांमुळें त्या सर्व समारंभाला विलक्षण वैभवशाली रूप, वर्णवैचित्र्य आणि तेजस्विता प्राप्त झाली होती. दुनियेच्या या भागाच्या मानानें तो देखावा अभूतपूर्वसा भासत होता. या प्रसंगीं फारच उत्तम व चोख अदब राखली गेली होती. शहानशहा व महाराणी तेथें आल्यानें या भव्य व वैभवशाली समाजाला एक विशेषच गंभीरपणाची शोभा प्राप्त झालेली होती.

पुढेंही अनेक वेळां आह्मांला शहानशहा व महाराणी साहेब यांना पाहण्याची संधि मिळाली. त्यांतही विशेषतः हाइड पार्कमध्यें गार्ड लोकांच्या ब्रिगेडीचा रिव्ह्यू व सलामी झाली तेव्हां व विंडसर येथें हौसहोल्ड क्याव्हलरी किंवा खास पागेची सलामी झाली तेव्हां. या दोन्ही प्रसंगीं ब्रिटिश फौजेचें शिरोरत्न अशा या लष्करी लोकांचा उत्तम व थाटदार भारदस्तपणा, आणि त्यांच्या शिताफीच्या कवायती, यांचा मजवर फारच चांगला ठसा उमटला. आस्काट येथील घोडयाच्या शर्यतीच्या वेळीं बादशहा व महाराणी बसले असतांना, सम्राट् व महाराज्ञी यांचें बादशाही आवारामध्यें आम्हांला दर्शन घडलें. त्या दिवशीं एक दुःखपर्यवसायी प्रकार घडून भारीच रसभंग झाला. मताभिलाषी स्त्रीमंडळाचीं निशाणें धारण केलेल्या एका स्त्रीनें, शर्यतींत दवडणाऱ्या बादशहाच्या घोडयापुढें आपणास घालून घेतलें. त्यामुळें तिला भारी दुखापत होऊन ती मरण पावली. याप्रमाणें बळी

गेलेल्या त्या स्त्रीची प्रेतयात्राही पुढें आम्हीं पाहिली. स्त्रियांना मत देण्याचा अधिकार असावा, या प्रश्नाला संमत असणारे शेंकडोसे लोक त्या प्रेतयात्रेंत चालले होते. ही यात्रा लंडन शहरांतील ज्या रस्त्यांनीं, रेलवे स्टेशनावर गेली, त्या सर्वांवर तमाशा पाहण्याला सहस्त्रावधि तमासगीर जमले होते. तें प्रेत स्कॉटलंड मध्यें नेलें, व तें पुरण्याची क्रिया व तत्संबंधीं धार्मिक प्रार्थना वगैरे तिकडेच करण्यांत आली.

इकडे उन्हाळ्याच्या दिवसांत उद्यानोत्सव (गार्डन पार्टीज) करण्याचा प्रघात फारच लोकप्रिय आहे. प्राइम मिनिस्टर—मुख्य प्रधान—यांनीं दिलेल्या अशा एका समारंभाला आम्ही गेलों होतों. लंडनमधील बहुतेक निरनिराळ्या राष्ट्रांतील समाजस्थितीचे निदर्शक व प्रतिनिधि, अशा मंडळीला निमंत्रण होतें, व अशी मंडळी पुष्कळशी आली होती. तसेंच अर्ल व कौंटेस् आफ जर्सी यांनीं आपल्या चित्रवत् सुंदर आस्टर्ले पार्कमध्यें दिलेल्या पार्टीलाही आम्ही गेलों होतों. दुसरें एक आनंददायी निमंत्रण नार्थब्रुक क्लबकडचें होतें. तेथें मुंबईच्या गव्हर्नरचें काम करून परत आल्यानंतर लॉर्ड सिडेनह्याम ह्यांच्या सन्मानार्थ मेजवानी होती. त्या प्रसंगीं, मद्रासचे माजी गव्हर्नर लॉर्ड आम्थिल, अध्यक्ष होते. लॉर्ड रे व लार्ड लामिंगटन, हेही आलेले होते. मिस्टर व मिसेस रतन टाटा यांनीं एक ईव्हिनिंग पार्टी ( सायंकाळची मेजवानी ) दिली

होती. तेथें गेल्या वेळीं म्हैसूरचे युवराज, व दुसरी बरीचशी आंग्लो–इंडियन मंडळी, यांच्या भेटी झाल्या. तेथें मोठ्या आनंदांत काळ गेला. लंडन येथील आमच्या दिनचर्येमध्यें सामाजिक ( औपचारिक ) भेटी व परतभेटीला वगैरे जाणें, हेंही कांहीं कमी महत्त्वाचें कार्य होतें, असें नाहीं. आम्ही लार्ड व लेडी रे, लार्ड व लेडी लामिंगटन, व लार्ड व लेडी सिडेनह्याम, यांच्या भेटीला जाऊन आलों. तेही परतभेटीला आले. तसेंच सर चार्लस व लेडी आलिव्हंट, व सर जॉन व लेडी म्यूर म्याकेंझी, यांच्यासारख्या आमच्या जुन्या पूर्वींच्या व सन्मान्य मित्रांचें पुनर्दर्शन व भेटी झाल्यानें, मोठा आनंद वाटला. ते हिंदुस्थानांत असतांना त्यांचा आमचा जो संबंध जडला होता, त्याचें स्मरण आम्हांला आनंदकारकच होतें. टाइम्स ऑफ इंडिया पत्राचे मुख्य मालक, मिस्टर टी. जे. बेन्नेट, सी. आय्. ई. यांच्याकडेही मी गेलों होतों. तेव्हां दक्षिणी ब्राम्हण मंडळींच्या सद्यःस्थितीसंबंधानें त्यांच्याशीं बरेंच चांगलें व मजेदार भाषण झालें.

क्याप्टन व मिसेस बॉईड कारपेन्टर यांनीं कान्नाट रूम्स मध्यें ग्रेट ब्रिटनच्या समुद्रपारच्या राज्यविभागांतील हाय कमिशनर्स व एजन्टस जनरल, व इतर पाहुणे मंडळी, यांचें स्वागत व सन्मान करण्याचा प्रसंग घडावा म्हणून एक मेजवानी दिली. तिला निमंत्रण असल्यानें मीही गेलों होतों. तो प्रसंग माझ्या आयुष्यांतील अभिमानास्पद प्रसंगांपैकीं एक होता.



बकिंघॅम राजवाडा. महाराणी व्हिक्टोरिया यांचें स्मारक.

यजमान व यजमानीण हीं दोघेंही आनंदवृत्तीचीं असल्यानें त्यांना असा समारंभ करण्याची जी एकदां सुखदायक प्रेरणा झाली तेव्हांपासून अलीकडे हा समारंभ लंडन येथें सीझनमध्यें अवश्य होणाऱ्या अनेक सामाजिक समारंभांमध्यें अद्वितीय व मनावर पक्का ठसणारा होतो. पृथ्वीवर दुसऱ्या कोणत्याही शहरामध्यें एतत्तुल्य प्रसंग क्वचितच दृष्टीस पडण्याजोगा आहे. भूमंडळाच्या सर्व भागांत पसरलेल्या ग्रेट ब्रिटनच्या वसाहती व त्यांच्यावर अवलंबून असलेले प्रदेश, यांतील सुप्रसिद्ध व थोर प्रतिनिधी त्या स्थळीं एकत्र जमलेले होते; आणि एकमेकांशीं स्नेहभावानें वागणाऱ्या अशा त्या जंगी समाजामध्यें मी मोकळेपणीं मिसळून त्यांचीं तीं कळकळीचीं व स्वदेशाभिमानानें ओथंबलेलीं भाषणें ऐकत होतों. त्यावेळीं मला टेनिसनच्या एका अमर कवनांतील पुढील भाषांतररूपानें दिलेल्या ओळींमध्यें व्यक्त झालेल्या मनोवृत्तीची यथार्थ उमज पडली. ब्रिटन्स मोठ्या मोठ्या आवाजानें म्हणतात, 'हे पुत्रांनो, तुह्मी सारे एकून एक, एकजीव व्हा, व एकसाम्राज्यघटक व्हा. तुमचें अंतःकरण, तुमचा जीवात्मा, ब्रिटनशीं एकरूप असूं द्या. तुमचें एकच जीवन, एकच ध्वज, एकच आरमार व सिंहासन राहील, असे व्हा.'

मातृभूत भूमि आणि तिचे दूरवर फेंकले गेलेले राज्यभाग, परस्परनिबद्ध करणारा स्नेहपाश किती दृढ व अंतः-

करणांत भिनलेला आहे, ही गोष्ट लक्षांत आणल्यानें खरोखर भारी समाधान वाटतें. सहानुभूति, प्रेम, एकजूट, हीं त्या प्रसंगीं चाललेल्या सर्व प्रकारांचीं मुख्य प्रेरक तत्त्वें होतीं. सायंकाळीं प्रारंभालाच लॉर्ड किन्नेयर्ड यांनीं क्याप्टन बॉइड कारपेन्टर यांचे या सम्मेलनाच्या योजनेबद्दल व व्यवस्थेबद्दल गोड शब्दांनीं अभिनंदनपूर्वक आभार मानले. शहानशहाच्या समुद्रपारच्या राज्यांच्या अभिवृद्धीविषयींचा 'टोस्ट' किंवा सहपान, याच्या पूर्वीं, दि राइट ऑनरेबल जे. एच्. क्यांपबेल्ल, के. सी., एम्. पी., यांनीं भाषण केलें. त्याला सर पीटर स्टूअर्ट—बाम यांनीं दुजोरा दिल्यानंतर अवचित मला तत्स्वीकारप्रदर्शक भाषण करण्याला सांगण्यांत आलें. इंग्लंडांत आपलें प्रथमचेंच भाषण करण्याचा योग्य प्रसंग निवडण्याची मला संधि मिळती, तर ती याहून अधिक चांगली अशी मला खचित निवडतां आली नसती. हें एक तऱ्हेचें दिव्यच होतें. मी त्याला तयारही नव्हतों. तरी पण माझें भाषण ऐकण्यांत मंडळीनें जी आतुरता व मान्यता दाखविली, आणि तें पुरें झाल्यावर मजवर जी अभिनंदनाची वृष्टि झाली, तिनें माझ्या त्या दिव्याची पुर्ती भरपाई झाली. त्या भाषणांत मीं ह्मटलें, 'मला या प्रचंड ब्रिटिश साम्राज्याचा एक प्रजाजन होतां आलें आहे, याबद्दल मला मोठा अभिमान वाटत आहे. तरी पण आपला देश सोडून बाहेर पडेपर्यंत, याचें खरें महत्त्व व रहस्य, यांची योग्य जाणीव मला

झाली नव्हती. ब्रिटिश साम्राज्याशीं घडलेल्या संबंधाविषयीं माझ्या हिंदी प्रजाबंधूंच्या मनांत जी दृढभक्ति आहे, तिचें, जणों त्यांचें मुख होऊन, या महद्भाग्याच्या प्रसंगीं आपणापुढें द्योतन करण्याची ही संधि मला मिळते आहे, याबद्दल मी अतिशय आभारी आहें, व याचा मला मोठा अभिमान वाटत आहे.' पुढें 'ईस्ट इंडिया असोसिएशन' समोर "इंग्लंडानें हिंदुस्थानासाठीं काय केलें आहे?" या विषयावर व्याख्यान देण्याविषयीं मला निमंत्रण झालें. त्या प्रसंगीं या विषयावर मीं बरेंच विस्तारपूर्वक भाषण केलें. हें व्याख्यान वेस्टमिन्स्टरमधील कॅक्स्टन हॉलमध्यें ता० २३ जून रोजीं देण्यांत आलें. त्या प्रसंगीं लॉर्ड रे अध्यक्ष असण्याचा, व लॉर्ड लामिंगटन, सर जॉर्ज बर्डवुड, कर्नल सी. ई. येट, एम्. पी., आणि इतर मंडळी, यांच्याकडून सहानुभूति व प्रेमद्योतक चार शब्द ऐकण्याचा बहुमान मला मिळाला. त्याचा विस्तार करण्याची येथें आवश्यकता नाहीं. कारण, तें व्याख्यान व त्यावरील वादविवाद, स. १९१३ च्या आक्टोबरच्या 'एशियाटिक क्वॉर्टरली रिव्ह्यू' च्या अंकांत प्रसिद्ध झालेले आहेत.

लंडन शहर प्रदर्शनांचें जसें माहेरघर. आम्ही तेथें असलेल्या मुदतींत पुष्कळशीं प्रदर्शनें आमच्या पाहण्यांत आलीं. 'अर्ल्स कोर्ट' मध्यें 'युनायटेड सर्व्हिसेस्' चें प्रदर्शन फारच मनोवेधक होतें. लष्कर व आरमार या खात्यांविषयीं लोकांमध्यें आवड

वाढावी, व फौजेंत भरती होण्याला उत्तेजन मिळावें ह्मणून हें प्रदर्शन करविण्यांत आलें होतें. त्याच्यांत लहान लहान प्रमाणावर मनवारी व लढाऊ जहाजें, लोहकवचयुक्त आग-गाड्या, इस्पितळांच्या गाड्या, फौजी इस्पितळें, युद्धविषयक सर्व शस्त्रास्त्रें व अवजारें, वगैरे ठेवलेलीं होतीं. शिवाय, तेथें लष्करी ब्यांड—बाजेही फारच उत्कृष्ट चालू होते. ' वाटर शूट ' किंवा पाण्यांतून उंचावरून वाहात येण्याचा तमाशा, व पुष्कळसे किरकोळ खेळ तमाशेही सुरू होते. आरमारांनीं केलेल्या तोफेच्या भडिमाराची प्रतिकृतीही दाखविली जात होती. ती मन खडबडावून सोडणारी असून, तिच्या योगानें या देखाव्याला युद्धप्रसंगाचें मूर्त स्वरूप प्राप्त होई. ' आलिंपिया ' मध्यें सार्वराष्ट्रीय घोड्यांचें प्रदर्शन भरलें होतें. त्यांतील पुष्कळशा तमाशांमध्यें 'फायर ब्रिगेड '—आग विझविण्याचें काम करणारी मंडळी—यांच्या शर्यतीही होत्या. पुढें त्याच अवाढव्य इमारतीमध्यें वार्षिक ' सार्वराष्ट्रीय मोटार शो' किंवा मोटारगाड्यांचें प्रदर्शनही झालें. ' रिचमंड ' येथील घोड्यांच्या प्रदर्शनालाही आह्मी गेलों होतों. त्याला बादशहा व महाराणीसाहेबही आले होते. ' आलिंपिया ' व ' रिचमंड ', दोन्ही ठिकाणीं उड्या मारण्याच्या उत्तम शर्यती चालू होत्या. त्यांत कॅनॅडामधील घोडे विशेष शिकवून तयार केलेले होते. ' रिचमंड ' येथील प्रदर्शनांत सर्व तऱ्हेच्या घोडयांचे नमूने होते. तेथें शिकारीच्या कामाचे, व व्यापारी लोकांच्या उप-

योगी, असे घोडे व गरीब पण उपयोगी गाढवें, यांचे पृथक् पृथक् वर्ग ठेवण्याची योजना केलेली होती. 'रॅनले क्लब' मधील घोडयांच्या मेळ्यांत उड्या मारण्याचें अप्रतिम काम पाहण्यांत आलें. तेथेंच 'मोटार पोलो'ची शर्यत पाहिली. तिच्यांत खेळणारे लोक, मोटार गाड्या किती तरी व्यवस्थित व सफाईदार फिरवीत होते. तें पाहून अचंबा वाटला. त्या सर्व गाड्या 'फोर्ड'च्या बनविलेल्या होत्या.

फ्रेंच प्रजासत्ताक राज्याचे अध्यक्ष एम्. पॅंकारी, सरकारी रीतीनें, उन्हाळ्यांत लंडनला आले होते. त्यांचा स्वागत-समारंभ अगदीं बादशाही थाटाचा झाला. शहरांत मैलोंगणती रस्त्यांवर ध्वजपताका, कमानी, विजयतोरणें, वगैरेंच्या द्वारें सुंदर शोभा आणलेली होती, व जागजागीं अन्वर्थक व स्वागतपर वाक्यें फडकत होतीं. मिरवणुकीच्या रस्त्यावर प्रेक्षकांची चिकार गर्दी झालेली होती. या थोर व भाग्यशाली पाहुण्याच्या स्वागताप्रीत्यर्थ शहरांतील सारी वस्तीच जणों बाहेर पडली होती.

इंग्लंडांत लोकसत्तात्मकराज्यपद्धतिप्रिय लोक विशेष. त्या मानानें राजे व शहानशहा ह्मणजे, एक वंशपरंपराप्राप्त प्रेसिडेंट, इतकेंच लोक समजत असतील, अशी माझी समज होती. पण आम्हां हिंदी लोकांप्रमाणेंच, राजा व राजघराण्यांतील माणसें यांना मान देणें, व त्यांच्या-

विषयीं पूज्यभाव दाखविणें, यांचें ब्रिटिश लोकांमध्यें उपजतच अंगवळणसें पडलें आहे, हें पाहून मला समाधान व आश्चर्य वाटलें. आह्मी मोठे राजनिष्ठ ह्मणून भारी अभिमान बाळगितों, आणि राजे व बादशहा यांच्याविषयीं शक्य तितका सर्वोत्कृष्ट आदर व पूज्यभाव ठेवतों. पण आमची राजनिष्ठा अभावदर्शक अथवा निष्क्रियारूप होय. शहानशहांच्या हुकुमास शिरसा मान देण्याचें काम साहजिक घडून जातें. आज्ञा झाली, तर प्रत्येक हिंदी सद्‌गृहस्थ, राजासाठीं प्राणही अर्पण करील; तथापि इंग्लंडांत आपल्या नृपतींशीं सहकारीपणानें वागण्याची जी प्रवृत्ति प्रजाजनांमध्यें आढळून येते, ती आमच्या देशांत नाहीं. त्या देशांतील राजनिष्ठा आमच्या इकडच्यापेक्षां अधिक मूर्त स्वरूप धारण करते. हिंदुस्थानांत लष्करी परंपरा असलेले सरदार व थोर, प्रतिष्ठित लोक, पूर्वकाळीं राजाचा मान व दबदबा जतन करणें हें मुख्य कर्तव्य मानीत असत. पण सामान्य जनसमूह तेव्हां व आतांही, या गोष्टी ईश्वराधीन आहेत, या कामावर नेमलेल्या लोकांचेंच तें काम आहे, आणि सरकारी अंमलदार या कामीं पुर्ती नजर ठेवतील असा विश्वास बाळगतां येण्याजोगा आहे, असेंच समजून होते व आहेत.

इंग्लंडांत लोक राजनिष्ठ आहेत ते त्यांच्या अतःकरणप्रवृत्तीनुरूप. त्यांची राजनिष्ठा जागरूक व कार्यकर्ती आहे. राजा जेथें कोठें जाईल, तिकडे त्याचा उत्साहपूर्वक व जोरानें

जयघोष केला जातो. राजा व राजघराण्यांतील मंडळी यांच्यासंबंधानें सर्व लोक नेहमीं आदरानें बोलतात. बहुतेक साऱ्या सार्वजनिक प्रसंगांच्या शेवटीं राष्ट्रगीत–न्याशनल आंथेम–गायलें जातें. प्रत्येक गायनवादनशाळा ( कान्सर्ट हॉल ) नाटकगृह (थिएटर) आणि मनोरंजनाचें हरएक स्थळ, यांतील प्रत्येक प्रयोगाचा शेवट व्हावयाचा तो, त्याच गीतानें, राष्ट्रगीत चाललें असतांना सर्व लोक उभे राहतात व दाराबाहेरचे लोक तें कानीं पडतांच टोप्या काढतात. पण मनोरंजनाच्या स्थळामध्यें थोडेबहुत लोक अशा तऱ्हेनें योग्य सन्मान व संभावितपणा दाखवीत नसलेलेही मीं पाहिले व त्यांचें मला वाईट वाटलें.

# भाग आठवा.

## इंग्रज लोकांचीं मनोरंजनाचीं साधनें.

नेपोलियननें इंग्लिश लोकांना ' बनियांचें ( दुकानदारांचें ) राष्ट्र ' असा किताब दिलेला होता. ' लिटल् कार्पोरल ' ( नेपोलियनचा बांधा ठेंगू असल्यानें त्याला हें नांव पडलें होतें. ) च्या लक्षांत इंग्रज लोकांची उत्कट सुखोपभोगेच्छा आली नाहीं, किंवा तिकडे त्याचें दुर्लक्ष झालें, असें दिसतें. माझ्या या सफरीमध्यें मला, हे लोक कामकाज करीत असतांना व त्यांचे खेळ तमाशे चालले असतांना दोन्ही स्थितींत पाहण्याला सांपडले. तसे त्यालाही सांपडते तर, त्यानें आपलें मत खचित बदलून, त्यांना उत्सवप्रिय व तमासबीन मंडळींचें राष्ट्र, असें ह्मटलें असतें. कामधंदा करणें व त्याच्यांत गढून जाणें, तसेंच फुरसत काढून त्या वेळांत आरामांत व सुखोपभोगांतही कांकणभर अधिकच मग्न होण्याची या लोकांची शक्ति, त्याच्यासुद्धां लक्षांत आली असती. कामकाजामधील त्यांच्या निमग्नतेहून श्रेष्ठतर गोष्ट ह्मटली म्हणजे फुरसतीच्या

वेळीं आरामांत व खेळतमाशांत गढून जाण्याची त्यांच्या अंगची उपजतशक्ति ही होय.

एखाद्या लोकप्रिय क्रिकेट मॅचला किंवा फूटबाल मॅचला हजर राहतांच, ब्रिटिश लोक विश्रांतीची वेळ येतांच कामा-काजाची काळजी कशी पार झुगारून देतात, हें कोणाच्याही तेव्हांच लक्षांत येईल. केवळ लंडनमध्येंच नव्हे, तर या राज्यांतील प्रत्येक शहर, गांव व खेडें यांच्यामध्यें, शनिवारीं तिसऱ्या प्रहरापासून मजूर व कामकरी यांचा सुट्टीचा दिवस असतो. व सारीं आफिसें, लहान मोठे कारखाने व गिरण्या बंद होतात. तेव्हांपासून सोमवार सकाळपर्यंत साऱ्या लोकांमध्यें खेळ, तमाशे व आरामाचीं साधनें, यांचें साम्राज्य सर्वत्र पसरतें, व जिकडे तिकडे लोक सुखोपभोग व गंमत यांमध्यें निमग्न होतात. कांहीं लोक ' पार्क्स '—उपवनां—मध्यें आराम घेण्याला जातात. तेथें त्यांना नाना तऱ्हेचे खेळ तमाशे, फुकट किंवा नांवाला थोडीशी फी देऊन, पाहण्याला मिळतात. तसेंच तेथें, हवा चांगली व सोईवार असली तर, पुष्कळसे लोक, नुसतेच गमतीनें इकडे तिकडे फिरत राहतात, किंवा बैठकींची व्यवस्था केलेली असते त्यांवर अथवा वृक्षच्छायेखालीं बसून वाचनांत काळ घालवितात. हिंदुस्थानामध्यें अशा तऱ्हेनें फिरत व सहज वेळ काढण्याचा प्रघात नाहीं. तिकडील लोकांची करमणूक म्हणजे तमाखू पीत आपसांत चकाट्या पिटीत राहणें एव्हढीच. करमणूक व सुखोपभोग, यांविषयींची इंग्रज

लोकांची कल्पना याहून विस्तृत असते. या ठरलेल्या साप्ताहिक निमसुट्टीच्या दिवशीं ते लोक अतिशयच मोठ्या प्रमाणावर एकत्र जमून, त्या त्या दिवसमानानुरूप, क्रिकेट, फूटबॉल, टेनिस, हॉकी, यांच्या म्यॅचेस ( सामने ) पहात राहतात. एखादी ' फूटबॉल कप् फायनल म्यॉच ' पाहण्यासाठीं एकाच वेळीं, एकाच जागीं, लाख लाख माणसें जमणें विरळा घडतें असें नाहीं.

अशा तऱ्हेच्या या जीवनचरित्रामध्यें कांहीं लोक राष्ट्रीय ऱ्हासाच्या प्रादुर्भावाचीं दुश्चिन्हें होताहेत असें समजतात. असें निव्वळ तमासबीन होऊन गंमत पहाण्यापेक्षां, जमलेल्या सर्व मंडळीनें त्या तशा खेळांत सामील होण्याची तजवीज झाली तर, त्यांच्या शरीरबलावर जास्त चांगला परिणाम होईल, असें ते प्रतिपादन करितात. कामकरी मंडळींसंबंधानें हें जें ह्मणणें आहे, तेंच वरिष्ठ प्रतीच्या लोकांविषयींही थोड्याशा फरकानें खरें आहे. चाललेल्या शर्यती पाहात उभें राहण्यापेक्षां सरदार मंडळी ' जाकी'—चाबुकस्वार—याच्या ऐवजीं स्वतः आपापल्या घोड्यांवर बसून दवडतील तर जास्त चांगलें, हें निःसंशय होय. ही करमणूक या सरदार मंडळीच्या स्वतःच्या प्रकृतीला जरी अधिक चांगली असली तरी यांच्यापैकीं पुष्कळांच्या घोड्यांना मात्र ती तितकी श्रेयस्कर होणार नाहीं. मोठमोठ्या लोकांच्या अशा प्रचंड समूहांनीं मनाला हुरूप व उत्तेजन देणारी एखादी चांगली 'क्रिकेट'ची किंवा ' फुटबॉ-

ल'ची ' म्यॉच ' पहात राहण्यांत, अर्थातच मोठासा अवगुण आहे असें नाहीं. तरी पण या खेळांत जुगाररूपी पिशाचिका कमी अंशानें प्रवेश करते असें नाहीं, हें ऐकून मला वाईट वाटलें. या जुवेबाजीनें चोख व आरोग्यप्रद खेळाला बट्टा लागतो. या दुष्परिणामी परिस्थितीचा उच्छेद होणें अवश्य आहे. या अवलक्षणाच्या महत्त्वाकडे सरकारचेंही लक्ष वेधलें असून पैजेसंबंधाचा कायदा नुकताच जास्त कठिण व प्रतिबंधक केला गेला आहे, ही गोष्ट समाधानकारक आहे. सर्व खऱ्या विचारी लोकांना, हें बरें झालें, असेंच वाटतें आहे. पैजेच्या पुष्टीकरणार्थ असें, कांहीं एक सांगतां येण्याजोगें नाहीं. तिच्यामुळें खेळाची नासाडी होते—खेळ म्हणजे नुसतें मानसिक प्रोत्साहन, एवढाच अर्थ घेणें असेल तर निराळें.—इतकेंच नव्हे, तर त्याच्या पायीं अनेक लोक धुळीस मिळतात.

बाहेर मोकळ्या हवेंत खेळण्याची व परिश्रम करण्याची आवड ब्रिटिश जनतेमध्यें उपजत असल्याचें दिसून येतें. इंग्लंडांत अशा आरोग्यप्रद खेळ तमाशांसाठीं साधनें उपलब्ध आहते, तशींच तीं हिंदुस्थानांतील लोकांसाठींही उपलब्ध केलीं जावीं, असें मला फार वाटतें. या योगानें लोक कदाचित् कमी आळशी होतील व त्यांची शारीरिक व नैतिक वडण अधिक बलवान् होईल. खेळ निरुपद्रवी आहे इतकेंच नव्हे पण त्याची दिशा योग्य असली तर तो फायदेशीरच होतो, व त्यामुळें रोजचें कामकाज करण्याला मनुष्य जास्त योग्य होतो. इतर

सर्व बाबींप्रमाणें यांत धोका आहे तो त्याच्या अतिरेकामध्यें. यावरून पाश्चात्यांच्या जीवनक्रमामध्यें करमणुकी व खेळ तमाशे, जो पुष्कळसा भाग व्यापतात, त्याविषयीं विचार करणें मला इष्ट वाटतें. मी हिंदुस्थानासारख्या गरीब देशांतून आलेला. युरोपांतील इतर देश व इंग्लंड, यांमध्यें दृष्टीस पडणारीं असंख्य थिएटरें—नाटकगृहें,—नृत्यगायनशाला, व चित्रप्रदर्शन-शाला, आणि त्यांना प्रत्येक रात्रीं उदार आश्रय देणारी मंडळी पाहून पुढील अनुमान काढल्याखेरीज माझ्याच्यानें रहावेना:— या बाबतींमध्यें द्रव्य, वेळ व मानवी शक्ति यांचा निष्कारण दुरुपयोग होतो. याहून पुष्कळच अधिक फायदेशीर व उपयोगी उद्योगांच्या मार्गामध्यें या साऱ्यांचा विनियोग खचित करतां येण्याजोगा आहे. सायंकाळचे खेळ तमाशे, व गमती उपयोगी असून, लोकांना जास्त विशंकनीय करमणु-कीच्या मार्गांपासून अलग ठेवण्याला त्यांचा कांहीं अंशीं फायदा होतो, असेंही म्हणतां येईल. पण त्यांच्यांत अतिरेकानें निमग्न होणें अपायकारक आहे. असल्या चैनबाजीच्या करमणुकीकडे लोकांची कमी प्रवृत्ति झाली तर, राहणीच्या खर्चाचें मानही कमी होईल. सामाजिक सुधारणा करूं इच्छिणारांना हें एक चांगलेंच काम आहे.

आराम व सुखसमाधान, हीं बाह्य स्थितीपेक्षां आंतर किंवा मानसिक स्थितीपासूनच विशेषेंकरून प्राप्त होतात, हें सुवर्णतुल्य तत्त्व युरोपाला अद्यापि शिकावयाचें आहे.

आपण आपली मानसिक स्थिति एखाद्या वस्तूपासून सुखसमाधान होण्यायोग्य बनविणार नाहीं तोंवर, ती वस्तु आपल्या स्वाधीन आहे इतक्यावरूनच केवळ तिच्यापासून होणारें सुख आपणांला मिळेल, असें मुळींच नाहीं. उदाहरणार्थ, भूक लागली असल्याशिवाय खाद्य पदार्थांना हरतऱ्हेनें रुचि आणल्यानेंही ते गोड लागतील, असें नाहीं. निद्राविनाशरोगग्रस्ताला, कितीही मऊ बिछाना व उशागिरद्या यांनीं झोंप आणणें शक्य नसतें. उत्तमोत्तम गायनवादनसुद्धां ऐकण्याची लहर नसेल तोंवर, ऐकणारापुढें पुष्कळ अंशीं व्यर्थ होतें.

जीवनसंबंधीं गरजा होईल तितक्या कमी करण्यानेंच खरें सुख व समाधान प्राप्त होतें, त्या वाढवीत जाऊन प्रत्येक गरज भागवित जाण्याच्या यत्नांत राहिल्यानें नव्हे, हें तत्त्व युरोपांतील तरुण व नवीन राष्ट्रांना अद्यापि शिकावयाचें आहे. एका वस्तूचा हव्यास व लालसा तृप्त होते न होते तोंच, त्या दुसरीविषयीं उत्पन्न होतात. त्यांची पूर्तता व्हावी न व्हावी तोंवर कांहीं निराळ्याच गोष्टीविषयीं भूक लागते. विषयांतर करीत मी एक उपदेशपर प्रवचनच करूं लागलों, याबद्दल वाचक मला क्षमा करतील. मी सांगूं इच्छितों तें इतकेंच कीं, युरोपाला संपदा व समृद्धि यांचा दीर्घ व आकंठ उपभोग घडल्यानंतर खचित आपोआप अशी एक वेळ येईल

कीं, या विषयांसंबंधानें उपनिषदांमध्यें निबद्ध असलेल्या शिक्षणाच्या सत्यतेचें, त्यांतील लोकांना प्रत्यंतर खास येईल.

सर्वसामान्य जनतेच्या करमणुकीचे कांहीं प्रकार बोधप्रद व मानसिक उन्नति प्राप्त करून देणारे आहेत. त्यांच्यांत बोध व शिक्षण एकवटलेलें असतें, हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे. या कोटींपैकींच लंडन येथील ' झू '–प्राणिसंग्रहालय–आहे. तें आह्मीं पाहिलें. अशीं स्थळें हिंदुस्थानांतही आहेत, हें खरें. पण तीं याच्या इतकीं विस्तृत नाहींत, किंवा तेथील व्यवस्था व मांडणही तितकी चांगली नाहीं. हिंदुस्थानांत अज्ञात असे शीतकटिबंधांतील पशू तेथें आह्मीं प्रथमच पाहिले. त्यांचें आह्मांला मोठें कौतुक वाटलें. पूर्वदिग्भाग सोडून निघाल्यापासून प्रथमतःच येथें हिंदुस्थानी बैल व गाय पाहण्यास सांपडल्यानें आह्मांला आनंद झाला. आमच्या विशेष लक्षांत भरणारी अशी दुसरी एक चीज'मॉकिंग बर्ड'–चेष्टेखोर पक्षी–ही होय.तो माणसाच्या आवाजाची हुबेहूब नकल करितो. सृष्टपदार्थविज्ञानशास्त्रांपैकीं प्राणिजीवनशास्त्राचा सर्वोत्कृष्ट वस्तुपाठ देणारा असा हा सारा संग्रह आहे.शिक्षक लोक शाळेंतील मुलांचे थवेच्या थवे शिक्षण देण्यासाठीं उन्हाळ्यांत या 'झू'मध्यें घेऊन जातात, असें मला कळलें.

लंडनमध्यें ' म्यूझियम्स'–पदार्थसंग्रहालयें–यांचा केवढा तरी जणों खजीना आहे. त्यांच्यांत 'ब्रिटिश म्यूझियम' प्रमुख आहे.–

राष्ट्रीय प्राचीन वस्तू व इतर हरतऱ्हेचे नमुनेदार पदार्थ यांचें हें जणों अनमोल भांडार आहे. त्यांच्यांत प्राच्य भागासंबंधाचीही एक अत्युत्तम शाखा आहे.—तसेंच 'वॉलेस कलेक्शन' याच्यांत सुरेख सामानसुमान, लहान मोठ्या तसबिरी, चित्रें, चिनी व पॉर्सिलेनचें सामान, जुनीं चिलखतें, वगैरेंचा भरणा आहे. 'व्हिक्टोरिया ऑल्बर्ट म्यूझियम'च्या हिंदी शाखेंत, शहानशहा व महाराणी यांच्या स्वाऱ्या दिल्ली दरबारासाठीं गेल्या वेळीं, त्यांना मिळालेलीं मानपत्रें व नजर झालेल्या वस्तू ठेवलेल्या आहेत. 'टॉवर आफ् लंडन'—लंडनचा किल्ला—याचाही उल्लेख होणें अवश्य आहे. कारण, तीही एक प्रदर्शनाप्रमाणेंच प्रेक्षणीय जागा आहे. त्याच्यांत गोल जिने, विलक्षणसे कमरे व कोठड्या आहेत. त्यांतीलच एकांत बादशाही जवाहीर, लोखंडी गजांच्या पिंजऱ्यांत ठेवलेलें आहे. त्याच्यावर सक्त पाहरा असतो. याशिवाय कायमचीं अशीं चित्रांचीं प्रदर्शनें 'न्याशनल ग्यालरी,' 'दि टेट ग्यालरी,' 'दि न्याशनल पोर्ट्रेट ग्यालरी' आदिकरून बरींच आहेत. 'मॅदाम् टुस्सो'चें प्रदर्शनही विसरण्याजोगें नाहीं. त्याच्यांत इंग्लंडच्या इतिहासासंबंधीं गोष्टी प्रत्यक्षवत् घडलेल्या पाहण्यास सांपडतात. त्यांतील राजपुरुषांचे समूह, तसेंच राजा व राणी सिंहासनारूढ झालेले पाहून, मला दिल्ली दरबाराचें स्मरण झालें.

लंडनमधील प्रत्येक डिस्ट्रिक्टमध्यें फ्री पब्लिक रीडिंग रूम्स लायब्ररी,—सार्वजनिक मुफत पुस्तकालयें व वाचनालयें—

आहेत. वाचनालयें केवळ कामकरी लोकांनाच अप्रतिम देणगीसारखीं आहेत असें नसून, मध्यम सुखवस्तु लोकांनाही तो एक अलभ्य लाभसा आहे. तेथें सर्व वर्गाचे व प्रतीचे लोक जातात. सामान्य जनतेची सार्वजनिक अड्ड्याची जागा-दारूचा पिठा—याचा रामबाण उतारा, तसेंच वरिष्ठ दर्जाचा सुखानंद प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नास उत्तेजन देणारीं साधनें या नात्यानें तीं अभिनंदनीय आहेत. अशा संस्था माझ्या देशांतही स्थापल्या गेल्या तर मला फार पसंत होईल.

लंडन मधील सामाजिक जीवनाचें, 'क्लब' हें एक महत्त्वाचें उपलक्षण झालेलें आहे. हिंदुस्थानांत युरोपियन रहिवाशांशिवाय इतरांना या संस्था, इंग्लंडांत त्या ज्या अर्थानें समजल्या जातात व वास करतात, तशा मुळींच माहीत नाहींत, म्हटलें तरी चालेल. मुंबईसारख्या मोठ्या शहरांत 'इंडियन क्लब्स्' आहेत. पण त्यांचा सभासदपणा संकुचितसा असून त्यांना लोकाश्रयही विशेष नसतो. तेथें सायंकाळीं फार तर कांहीं थोडे खेळ खेळण्यापुर्ती सोय असते. यापलीकडे त्यांचें फारसें महत्त्व असत नाहीं. इंग्लंडांत सुखवस्तु मंडळीचे क्लब्स् मोठ्या प्रमाणावर व तऱ्हेतऱ्हेच्या सोईंनीं युक्त असतात. तेथें सुरेख व पुष्कळ सामान असलेलीं आरामदायक क्रीडास्थळें, लंजेस्, बिलियर्ड रूम्स, चहा, उपाहार किंवा भोजन करण्या–घेण्याच्या जागा, सर्व तऱ्हेनें परिपूर्ण लायब्ररऱ्या, लिहिण्याच्या जागा, इत्यादि करमणुकीचीं व सुखासमाधानाचीं विपुल साधनें अस-

तात इतकेंच नव्हे, तर त्यांच्यांत उत्तम सजविलेल्या, निजण्याच्या, कपडे करण्याच्या, स्नानाच्या, वगैरे कोठड्याही असतात. अशा रीतीनें त्यांच्यांत सामाजिक दळणवळणाचीं साधनें व हॉटेलांतील सोई दोन्ही एकत्र सांपडतात. तेथें मधून मधून व्याख्यानें व इतर करमणुकीचे प्रकारही चालतात. आणि सार्वजनिक मेजवान्या व गमतीचे मेळे होतात.

या क्लबांचा पूर्ण फायदा घेतला जातो. खरोखर राजकीय व सामाजिक दृष्टीनें पाहूं जातां या फारच उपयुक्त व फायद्याच्या संस्था आहेत. सामाजिक संबंधानें परस्पर भेटी व ओळखी होण्याला ते फार सोईचे पडतात. तेथें मित्रमंडळी भेटतात व आपापले विचार प्रगट करतात. जोराचें व हितकारी लोकमत तयार करण्याला त्यांचा उत्तम उपयोग होतो. राजकीय स्वरूपाचे जे क्लब आहेत त्यांचा उपयोग विशिष्ट राजकीय पक्षाचे निरनिराळे सभासद एकत्र व एक विचारानें राहण्यासाठीं, परस्परांच्या ज्या मतज्ञानाची आवश्यकता आहे त्या ज्ञानाचें संवर्धन करण्याकडे आणि परस्परांमधील एकीची भावना दृढतर करण्याकडे होतो. खर्चाच्या बाबतींत जपणूक व काटकसर, या गोष्टी सहकारी तत्त्वावर चालविल्या गेलेल्या संस्थांचा मुख्य फायदा समजला जातो. तो या क्लबांमध्यें कितपत मिळूं शकतो, याविषयीं मतभेद आहे. यांतील कांहीं जुन्या संस्थांमध्यें मध्यम प्रतीच्या हॉटेलांप्रमाणेंच रोजच्या राहणीला लागणाऱ्या सोई व ऐषआरामाचीं साधनें



७

बेताच्या खर्चांत मिळूं शकतात. पण इतर जास्त थाटदार क्लबांमध्यें खर्चाचें मान विशेषच संपन्न लक्ष्मीपुत्रांच्या शिवाय इतरांना झेंपण्यासारखें नसतें. कांहीं क्लबांमध्यें विशिष्ट प्रकारचा विलगपणा असतो. 'कार्लटन', 'न्याशनल लिबरल', 'दि रिफार्म,' 'कॉन्स्टिटयूशनल,' वगैरेमध्यें असा प्रकार आहे. त्यांच्या नांवानुरूप सार्वजनिक प्रश्नांच्या संबंधांत विशिष्ट मतें असलेल्या लोकांसाठीं ते जिनसांचा पुरवठा करितात. इकडील लोकसमाजाच्या इतर तऱ्हांचे निदर्शक असे दुसरेही क्लब आहेत. 'अथीनियम' याच्यांत ललितकला, वाङ्मय व निरनिराळीं शास्त्रें यांच्याशीं संबंध असलेले लोक, 'दि आर्मी अँड नेव्ही' याच्यांत बादशाही लष्करी व आरमार खात्यांतील अमलदार लोक, 'दि आक्सफोर्ड अँड केंब्रिज' यांत या दोन्ही युनिव्हर्सिटयांमधील मंडळी, 'दि ग्यारिक' यांत नाट्यकला व रंगभूमीसंबंधी मंडळी अशा तऱ्हेचे लोक असतात. 'दि रॉयल याट' व 'आटोमॉबिल क्लब' यांचे उद्दिष्ट हेतु त्यांच्या नांवावरूनच व्यक्त होत आहेत.

कामकरी मंडळीचेही सामाजिक व राजकीय क्लब्स् आहेत. ते बहुतेक मोठ्या गांवांत व पुष्कळशा खेड्यांमधूनही आढळतात. ते बहुतांशीं प्रजासत्तात्मवादी असून, त्यांच्यामधील वातावरण व्यक्तिस्वातंत्र्य व सलोखा यांनीं आक्रमिलेलें असतें. वरील प्रकार विशेष संपन्न क्लबांमध्यें बेताचाच आढळतो.

## इंग्रज लोकांचीं मनोरंजनाचीं साधनें.

इंग्लंडांत स्त्रियांची जी प्रगति झालेली आहे तिचें, खास त्यांच्याचसाठीं स्थापन झालेल्या क्लबांवरून उत्तम निदर्शन होतें. अशा क्लबांमध्यें, 'अलेक्झांड्रा लेडीज क्लब'-अलेक्झांड्रा राणी त्याच्या पेट्रनेस (मुख्य साहाय्यकर्त्या) असल्या-वरून हें नांव पडलें आहे—, 'दि पायोनिअर लेडीज क्लब,' 'दि लेडीज आर्मी अँड नेव्ही क्लब,' 'दि लेडीज अथीनियम्' व अखेर पण त्याच्या जागरूक कर्तबगारींत महत्त्वाच्या मानानें कमी नव्हे असा, 'दि सफरेजिटस' या नांवानें जास्त प्रसिद्ध असलेला 'दि विमेन्स सोशल अँड पोलिटिकल युनियन', हे क्लब होत. या विवेचनावरून, सामाजिक विषयासंबंधीं केंद्र आणि राज-कीय चळवळीच्या विस्ताराचें साधन या नात्यानें क्लबांना एक विवक्षित स्थान मिळालेलें आहे. अलीकडे त्यांचा प्रसार व त्यांची वाढ यांविषयीं खरोखर कांहीं जागीं नाराजी व नापसंती दिसूं पाहात आहे. कारण, या क्लबांच्या संस्थेमुळें जुन्या पद्धतीचें कौटुंबिक जीवन व राहणी—ज्यांच्याविषयीं आज पिढ्यानुपिढया इंग्लंडाला अभिमान बाळगण्याजोगी स्थिति प्राप्त झालेली आहे—त्यांचा अगदींच नाश नाहीं तरी, निदान त्यांच्यांत बरीच खडबड होण्याचीं चिन्हें आहेत, असें मत होत चाललें आहे.

क्लबाच्या तऱ्हेची राहणी हिंदुस्थानांत कधीं काळीं प्रस्थापित होईल किंवा नाहीं, तें अद्यापि निदर्शनास यावयाचें आहे. तसें घडून आलेंच तर, त्यापासून कौटुंबिक

बंधनें दृढ होणार नाहींत, हें खास. कारण हल्लींच हिंदी लोकांना घरादाराची विशेष ओढ लागे अशी स्थिति–विशेषतः मुलाबाळांचा पाश नसेल त्या ठिकाणीं–फारच कमी आहे. हिंदी स्त्रियांना अधिक चांगलें शिक्षण मिळालें, व त्या कौटुंबिक बाबतींत जास्त दक्ष व सुपात्र झाल्या तर, कौटुंबिक राहणी व जीवन यांची रम्यता जास्त वाढेल, आणि असें झालें तर क्लब अस्तित्वांत येऊन, ते नीटपणें चालण्याला तितकीं कमी कारणें राहतील.

# भाग नववा.

## लंडनचे पोलिस.

लंडनच्या पोलिसांची कीर्ति दूरवर व सर्वतोमुखीं झालेली आहे. या ब्रिटिश राजधानीमध्यें येणाऱ्या परकी लोकांचें लक्ष अवश्यमेव आकषर्ण करणारी अशी ती एक अजब व ठळक चीज आहे. जाहिराती व सचित्र पोस्टकार्डें, यांच्यावर काढलेल्या या पोलीस जवानाच्या चित्रांत, तो धिप्पाड व भक्कम शरीरकाठीचा–बांध्याचा–दाखविलेला असतो. आदब व अक्कल यांचा तो जणों पुतळाच, अशी त्याची कीर्ति आहे. ती अवास्तव आहे असें मुळींच नाहीं.

हिंदुस्थानांतील पोलिसांचा आम्हांला अनुभव आहे. त्या मानानें लंडनमधील 'बाब्बी'–पोलीस जवान–त्याच्या नित्याच्या परिस्थितीमध्यें कसा काय असतो, तें पाहण्याचा प्रसंग येण्याची मला बरीच जिज्ञासा, किंबहुना हौस, होती. तो प्रसंग 'व्हिक्टोरिया' रेलवे स्टेशनावर पोहोंचतांच प्रथम आला. मी त्याच्याकडे बराच वेळ न्याहाळत राहिलों. राज्यारोहणासंबंधाच्या दिल्लीदरबा-

रांत लंडनचे कांहीं पोलीस, बुद्ध्या मागवून, त्यांच्याकडे रस्त्या-वरील रहदारीचा बंदोबस्त सोंपविला गेला होता; त्यावेळीं मीं त्यांना पाहिलें होतें. या साऱ्या लोकांमध्यें चपलपणा हा गुण विशेष वळणीं पडलेला असतो, असें महशूर आहे. त्याला अनुसरून स्टेशनावरील पोलीस जवान, आम्ही नवखे व परकी हें ताडून, तात्काळ मदतीला आला; व त्यानें गाडी-वगैरे हवी कां याची चौकशी केली. एक गाडी बोलावून त्यानें गाडीवानाला आम्हांला कोठें न्यावयाचें तें समजावून दिलें, व आमची यासंबंधें तसदी चुकविली. वास्तविकपणें अगदीं प्रारंभापासून मला, पोलीस सतत व खात्रीनें भारी उपयोगीं पडले. त्यांना पुष्कळच व भारी जबाबदारीचीं कामें असलीं, तरी सामान्य जनतेशीं सभ्य-पणें वागून, त्यांच्या उपयोगीं पडण्याला त्यांना फुरसत मिळते.

त्यांच्या मदतीची आवश्यकता लागल्यास सर्वांशींच सभ्यपणा व भलेपणा दाखविण्यांत, ते श्रीमंत गरीब, थोर किंवा सामान्य जन, असा भदाभेद करीत नाहींत. याचें एक उदाहरण मीं स्वतः पाहिलें. एकदां मी मोटारमधून चाललों असतांना एक पोलीस जवान पायरस्त्यावर उभा असलेला दिसला. तितक्यांत एका गृहस्थानें कांहीं माहिती विचारण्यासाठीं आपली मोटार थोप-विली. तसा तो जवान, त्याचा भाव ताडून, चटकन् त्या मोटारजवळ पोहोंचला, व त्या गृहस्थाला हवी असलेली माहिती देऊन तसाच परत जाऊन उभा राहिला. त्यानंतर लगेच एका खटारेवाल्यानें त्याला हटकलें. तसें त्या श्रीमान्

मोटारवाल्याकडे धांवला होता, त्याहून कांकणभर अधिकच तांतडीनें तो त्याच्याकडे गेला व त्या रेकलेवाल्याशीं तितक्याच सभ्यपणानें वागला. हें पाहून माझ्या मनांत तेव्हांच विचार आला कीं, हिंदुस्थानांतील देशी पोलीसही, दर्जा किंवा स्थितीचा भेदाभेद न दाखवितां, सामान्य जनांशीं असेंच सभ्य व आदबशीर वर्तन ठेवितील तर हिंदुस्थान देशाचें भलेंच होईल.

इंग्लिश पोलिसाचा मुख्य गुण, तात्कालिक स्फूर्तीनें काम करणें व चाललेल्या प्रकाराचें पाहतांच निदान ठरविणें, हा होय. तेथील भारी रहदारीच्या रस्त्यांवरून चाललेल्या जनसंमर्दाचें त्यांच्या करवीं होणारें नियमन, हें स्वस्थ व संथपणाच्या कर्तबगारीचें एक अप्रतिम उदाहरण आहे. त्याच्यामुळेंच लंडन येथील रहदारीची व्यवस्था, साऱ्या दुनियेंत अप्रतिम म्हणवून घेण्याचा महत्वाचा बहुमान, त्यांनीं मिळविलेला आहे. याच्या अगदीं उलट पारिस-येथील रस्त्यांची स्थिति दिसून येते. तेथील पोलीस किंवा फौजी लोक, तितके चपल नाहींत. ते रहदारी वाटेल तशी चालूं देतात. यामुळें तेथें गलबा व गोंधळ, यांचें साम्राज्य असतें. लंडनच्या रस्त्यांवर जो व्यवस्थितपणा दिसून येतो, त्याला जनसमूहाची सहकारिता पुष्कळ महत्त्वाची व कार्यसाधक होते, हें खरें. 'रॉबर्ट्स'नें ( पोलीस जवानानें ) हात उचलण्याचा अवकाश, कीं एका बाजूची रहदारी तात्काळ बंद करणारी जणों जादूची कांडीच फिरली. इतक्यांत तो सामाजिक व्यवस्था व हुकुमत आणि कायदे-

कानू यांचा सरंक्षक दुसऱ्या हातानें उलट बाजूच्या वाहनांच्या प्रवाहाला योग्य वळण लावतो. यामुळें रस्त्यावरील रहदारीच्या अडचणी व थोपी—ज्या युरोपभर वरचेवर दिसून येतात त्या—आपोआप बंद होतात.

या इंग्रजी व्यवस्थितपणाची किंमत विशेष महत्त्वाच्या प्रसंगीं अधिक लक्षांत भरते. उदाहरणार्थ, 'प्राइम मिनिस्टर'—मुख्य प्रधान—यांनीं त्यांच्या सरकारी राहण्याच्या ठिकाणीं स्वागत-पर मेजवानी दिली होती. तेथें एक निमंत्रित पाहुणा म्हणून जाण्याचा बहुमान मला मिळाला होता. त्यावेळीं शेंकड्यांनीं मोजण्याइतक्या गाड्या आलेल्या. तरी त्यांच्या रहदारीची व्यवस्था पोलिसांनीं इतकी उत्तम केली होती कीं, अडचण किंवा गडबड यांचे नांवनिशाण नजरेस पडलें नाहीं. समारंभ उरकून गेल्यावर थोड्या मिनिटांनीं तेथें तो झाला होता असें सुद्धां कोणाला वाटतें ना. शहानशहा यांची 'लेव्ही' व त्यांनीं दिलेला सरकारी 'बॉल'चा समारंभ, बादशहांच्या जन्मदिवसाच्या उत्सवप्रसंगीं 'इंडिया ऑफिस' मधील 'रिसेप्शन' समारंभ, व फ्रेंच प्रेसिडेंट सरकारी तऱ्हेनें लंडनला आले होते, त्या वेळचा समारंभ, हे इंग्लिश पोलिस व्यवस्थेमधील विशिष्टपणा व्यक्त करणारी अप्रतिम चतुराई व उत्तमपणा यांचें निरीक्षण कर-ण्याला तसेच चांगले प्रसंग होते.

अशा प्रसंगीं हिंदुस्थानांत खरोखर फारच निराळी तऱ्हा झाली असती. हिंदी पोलीस जवानांचा उपजत स्वभाव व

स्वयंस्फूर्तियुक्त कर्तृत्वशक्तीची उणीव, हीं त्यांच्या इंग्रजी व्यवसाय-बंधूंच्या एतत्संबंधीं गुणांच्या मानानें पुष्कळच कमी आहेत. नेहमीं जय्यत व स्फूर्तिवंत राहणें, आणि येईल त्या प्रसंगाला बरोबरीनें तोंड देण्याला तयार असणें, या बाबतींत त्यांनीं त्यांच्यापासून धडा घेतल्यास फायदाच होईल. इंग्रजी पोलीस जवान, स्वतः समाजाचा ताबेदार आहे, या गोष्टीची जाणीव ठेवून वागतो. तो अनेकवार खरोखरच त्यांचा ताबेदारच नव्हे, तर मार्गदर्शक, तात्विक गुरु व परम मित्रही होतो. याचीं उदाहरणें लंडनच्या रस्त्यांवर रोज पाहण्याला मिळतात. आपले सुस्वभाव 'बॉब्बी,' केव्हां केव्हां, केवळ पितृवात्सल्यतुल्य काळजीनें एकाद्या लहान मुलाला गर्दीची रहदारी असलेल्या रस्त्याच्या एका बाजूहून दुसऱ्या बाजूला उचलून नेऊन पोहोंचवितांना, किंवा परदेशी अनोळखी मंडळीच्या कंपूला विशेष प्रेक्षणीय स्थळांचा मार्ग दाखवितांना, अथवा कोणी वृद्ध गृहस्थ किंवा स्त्री यांना आनंदानें व आदबीनें रहदारीच्या चक्रांतून वाट काढीत सुरक्षित जागीं नेतांना, असे आढळतात. एकदां कांहीं तात्कालिक अडचणीच्या स्थितींत सांपडलों असतांना मी आपली मोटार थोपवितों न थोपवितों तोंच, एक पोलीस जवान कांहीं मदत देतां आली तर ती देण्याला मोटारच्या बाजूस येऊन तात्काळ उभा राहिला. अशा स्थितींत हिंदुस्थानांत गाडी सोडून स्वतः पोलीस शिपायाकडे जावें लागतें.

पण इंग्लंडांत, मीं वर दाखविल्याप्रमाणें, बहुश: याच्या उलट प्रकार असतो. या साऱ्या देशभर पोलिसांचा ड्रेस मुख्यत: अगदीं सारखा असतो पण हिंदुस्थानांत शहरोशहरच्या पोलिसचा पोषाख निरनिराळा, ही गोष्टही विशेषेंकरून माझ्या लक्षांत आली.

इंग्लंडांतील हल्लींच्या पोलीस फौजेचा मूळ पाया, सर रॉबर्ट पील यांनीं सन १८२९ सालीं घातला. त्यावरून-च त्यांना 'पीलर्स' आणि 'बाब्बीस' अशीं नांवें लोकांनीं दिलीं. या गोष्टीचें स्मरण झालें म्हणजे मजा वाटते. त्यापूर्वी सामाजिक स्वस्थता राखण्याचें काम 'शेरिफ' लोकांकडे होतें व तें फारच असमाधानकारक होत असे. इंग्लंडांतील निरनिराळ्या 'कौंटी'–प्रांतां–मधील पोलीस, संयुक्त कमेट्यांच्या ताब्यांत आहे. ' कौंटी कौन्सिल ' व कौंटीमधील ' जस्टिसेस ऑफ् दि पीस ' यांच्या सभासदांमधून या कमेट्या निवडल्या जातात. लंडनचें पोलीस खास 'होम ऑफिस'च्या हुकुमतीखालीं आहे. खुद्द शहरांतलें पोलीस मात्र तेथील प्राचीन कार्पोरेशनच्या हाताखालीं आहे. अशा तऱ्हेनें जनतेचा पोलिसांवर प्रत्यक्ष ताबा राहिल्यानें, इंग्रजी पोलीसाला, सामाजिक लोकमताला अप्रतिकूल राहावें लागतें, आणि त्यामुळें आपण जनतेचे ताबेदार, ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत पक्की वागत राहते.

अशा तऱ्हेचा सामाजिक ताबा ठेवला जाण्याला हिंदुस्थानाची तितकी प्रगति झालेली नाहीं. तिकडे इंग्लंडांतील 'कौंटी कौन्सिल' च्या नमुन्याची संस्था अस्तित्वांत नाहीं. शिवाय, पोलीस समाजाचे ताबेदार ही गोष्ट मान्य असलेले, उदात्त व लोकमताचे पुरस्कर्ते असे कांहीं गृहस्थ हिंदुस्थानांत आहेत, तरी वरिष्ठ दर्जाच्या लोकांमध्यें पोलिसानें आपल्याच भजनीं राहावें ह्मणजे अर्थांतच, बहुजनसमाजाविषयीं नुकसानकारक नाहीं तरी, तुच्छपणाची वृत्ति ठेवावी, अशी इच्छा असणारेही पुष्कळ लोक आहेत. कांहीं तर पोलिसांना बाजारांतून जिन्नस आणणें वगैरे, आपलीं खासगी कामें करण्याला सांगण्यापर्यंत देखील मजल मारतात. वस्तुतः सार्वजनिक सरकारी नोकरांना नित्यशः हिंदुस्थानांत, कमी दर्जाचे हुद्देदार आपला खासगी कामधंदा व व्यवहार करण्याला लावीत असल्याचें नजरेस येतें. हिंदुस्थानांतील पोलिसांवर स्थानिक लोकनियुक्त प्रतिनिधींचा ताबा ठेवतां येणें तूर्तच शक्य नसलें तरी, हळू हळू ही सुधारणा करतां येईल, अशी आशा बाळगणें वावगें होणार नाहीं. येथें हेंही सांगणें अवश्य आहे कीं, आयर्लंडमधील पोलीस अद्यापि सरकारच्याच ताब्यांत आहे, व तें निमलष्करी तऱ्हेचें आहे, यामुळें, त्याचे समाजाशीं संबंध–जे इंग्लंडामध्यें इतके चांगले व फायदेशीर प्रत्ययास येतात–ते तेथें कमी प्रमाणांत दिसून येतात.

'ब्रिटन' मधील कायदे व सामाजिक स्वस्थता यांचे रक्षक–पोलीस–यांचें शिक्षण व वर्तन, यांची सर्वतोमुखीं प्रशंसाच

आहे. पण त्यांची कर्तबगारी व उपयुक्तता, यांचा पुष्कळसा भाग सामाजिक सहकारितेवर अवलंबून आहे, हें मीं वर दाखविलेंच आहे. हिंदुस्थानांत या बाबतींत तफावत आहे, ती मुख्यत: जनतेच्या उपजत स्वभावावर अवलंबून आहे. लडंनचे पोलीस तिकडे नेले—त्यांचा स्वभावच तसा अतिमानुष असला व ते कसल्याही मोहजालांत न फसणारे असेच असले तर गोष्ट निराळी--तर त्यांच्या हातून तिकडे तितकें चांगलें काम उठणें शक्य नाहीं. कारण तेथील लोक त्यांना इकडच्या सारखें साहाय्य—जें इकडे अगदीं साहजिक व अवश्य समजलें जातें—देणार नाहींत व त्यांचे हुकूमही तसे सहज मानणार नाहींत. हिंदुस्थानांतील पोलिसांच्या व्यवस्थेमधील अडचणी दूर होण्यासारख्या नसल्यानें त्यांना माहिती देण्याला व त्यांच्याशीं सहकारित्वानें काम करण्याला लोक नाखुष असतात; आणि समाजाकडून सहकारित्वाची मदत न मिळाल्याकारणानें पोलिसांना आपली कर्तबगारी चांगल्या तऱ्हेनें दाखवितां येत नाहीं. यांत हिंदी पोलिस जवानांनाच केवळ दोष देतां येत नाहीं. त्यांच्यामध्यें कोणी सच्चा मनुष्य गेला, तर लांचलुचपत व लबाडी त्याच्या पुढें दत्त म्हणून उभ्या. त्या अशा जोरांत असतील तेथें उच्च प्रतीच्या नीतिमत्तेची अपेक्षा करणें असमंजसपणाचें होय. एखाद्यानें स्वच्छ राहण्याचा प्रयत्न केलाच तर त्याचें नुकसान ठेवलेलें. कोणाही मनुष्याचा एखाद्या मुकदम्यांत हितसंबंध असेल, किंवा साक्षी होण्याला त्याच्यावर

जबरदस्ती होईल, अथवा तो पोलिसाच्या मेळांतला असेल, तरच तो सामान्यतः पोलिसाच्या मुकदम्यांत साक्षी देण्याला पुढें येतो. नाहीं तर खरी हकीकत सांगण्याला पुढें येण्याची पर्वा बहुत करून कोणी करीत नाहीं.

खुद्द सरकार व त्यांनीं नेमलेलीं कित्येक कमिशनें, यांनीं या प्रश्नाचा पुष्कळ विचार केलेला आहे. तसेंच हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांमध्यें, या बाबतींत किती तरी वादविवाद व ऊहापोह झालेला आहे. हल्लींही लांचलुचपतीचा प्रकार जारी आहे. तरी पण गेल्या दहा वर्षांत पुष्कळशा बाबतींत चांगलीच सुधारणा झाली आहे. शिवाय आजकाल हुद्देदार लोक इंग्रजी शिक्षण मिळालेले आणि ब्रिटिश नैतिक कानू व रिवाज यांचा आस्वाद घेतलेले आहेत. ही गोष्ट या पोलीस फोर्सच्या नैतिक स्थितीवर चांगला परिणाम खचित घडवून आणील. साधारणतः पोलिस शिपाई भरती होतात ते खालच्या दर्जाच्या लोकांमधूनच, तेव्हां ते आपल्या सर्वसाधारण समाजापेक्षां चांगले निपजण्याची अपेक्षा करणें शक्य नाहीं; ही गोष्ट आपण अवश्य लक्षांत ठेविली पाहिजे. सर्व समाजाचे मिळून जे कांहीं अवगुण असतील, ते या पोलिस जमातीमध्येंही अंशतः प्रतिबिंबित होणारच. शिवाय, त्यांच्या शिक्षणाचाही प्रसार तात्पुरताच व गुन्हे पकडून मुद्देसूद पत्ता लावण्याची अक्कलही बेताचीच असते.

पूर्वी हुद्देदार लोक फारच कमी अक्कलवान् असत. आपणाला मिळालेली हुकुमत ही द्रव्य मिळविण्याचें साधन आहे असें ते समजत व त्याचा उपयोग करून घेण्याची संधि गमावणारा तो एक विक्षिप्त व्यक्ति, असें मानलें जावयाचें. अशांतल्या कोणी अशिक्षित हुद्देदारानें वरिष्ठाची मर्जी संपादण्यासाठीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग किंवा त्याच्या बाहेर वर्तन करण्याला कांकूं केलें नाहीं तर तो तितक्याच प्रमाणांत लोकांवर जुलूम करण्याला व त्यांच्याकडून गैरकायदा मूठदाबी वसूल करण्यालाही तयार होता.

सरकारानें नुकत्याच अमलांत आणलेल्या सुधारणा पुष्कळ फायदेशीर झालेल्या आहेत; तरी जास्त सुधारणेला आणखी पुष्कळ जागा आहे. या सुधारणा यशस्वी होण्यास हुद्देदारीच्या जागेवर हल्लींपेक्षां निराळ्या व उच्च प्रतीचे हिंदुलोक नेमले पाहिजेत. ब्रिटिश सुपरिंटेंडेंट व त्यांचे असिस्टंट सामान्यतः उत्तमांतलेच असतात. पण त्यांच्या हातांखालच्या अंमलदारांची निवड करतांना योग्य तऱ्हेचीं माणसें मिळवितां येणें फार कठिण आहे. हे हुद्देदार अगदीं निर्लेप व सच्चे असले पाहिजेत. तसेंच समाजामध्यें त्यांचें वजन असणेंही अवश्य आहे. या दोन्ही गोष्टी एकत्र सांपडणें पुष्कळ प्रसंगीं कठिणच असतें. हें साध्य होण्याला खरोखर चांगल्या अस्सल घराणदार व वरिष्ठ प्रतीचें इंग्रजी शिक्षण मिळालेल्या माणसांमधूनच निवड झाली पाहिजे. त्यांतही शिक्षणविषयक बाब नेहमीं

लक्षांत ठेवणें जास्त जरूर आहे. राज्यकारभारावर खऱ्या ब्रिटिश चारित्र्याचा छाप पुर्ता उमटण्याला, जिम्मेदारीच्या व भरंवशाच्या जागेसाठीं निवडावयाचे लोक वरिष्ठ प्रतीचें व चांगलें—इंग्लंडांत तें ज्या अर्थीं समजलें जातें तसें—शिक्षण मिळालेले असे निवडले गेले पाहिजेत. या शिक्षणामध्यें प्रामाणिकपणा, चोखपणा, कळकळ व कर्तव्यदक्षता, इतक्यांचा समावेश होतो. शिक्षणाशिवाय एकाहून दुसऱ्या हिंदी माण-सामध्यें विशेषसा फरक आढळणार नाहीं.

कांहीं लोक असें समजतात कीं, सुशिक्षित लोक पोलिसांना प्रसंगविशेषीं करावीं लागणारीं कामें करण्याला योग्य नसतात व ते वरिष्ठांना हरतऱ्हेनें खुष ठेवण्याला झटत नाहींत. हें मत पुष्कळशा लोकांत प्रचलित आहे किंवा कसें, किंवा तें कित-पत खरें आहे, हें मला खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. असें असेल व याचा अर्थ इंग्रजी शिक्षण मिळालेले लोक किरकोळ कुरापती व किटाळें उपस्थित करणें, किंवा जुलुम करणें, याला तयार नसतात, असाच असेल तर, हेंच त्यांची खरी किंमत वाढविण्याला मुख्य कारण होय. त्यांना नापसंत कर-ण्याला नव्हे. असे खरे व सत्यप्रिय लोक नेमल्यानें सरकार व सरकारी अंमलदार यांचा लौकिक कमी न होतां उलट तो वाढेल व अशा रीतीनें सुधारणा झालेल्या पोलीस व्यवस्थेमुळें सामाजिक उन्नति व प्रगति, यांना उत्तेजन मिळेल.

आम्ही इंग्लंडांत असतांना 'दि ग्रेट् पर्ल मिस्टरी'—मोत्यांची विलक्षण भानगड—या नांवानें वाखाणलेल्या चोरीच्या कामांत ब्रिटिश पोलीस व्यवस्थेची शिताफी व चातुर्य यांचें एक उत्कृष्ट उदाहरण घडून आलें. त्या कामीं एका हिंदी गृहस्थाला बराच महत्त्वाचा भाग घ्यावा लागला होता. सुमारें १३५००० पौंड (२०२५००० रुपये) किमतींचा एक मोत्यांचा कंठा पारीस व लंडन यांच्या दरम्यान टपालांतून गहाळ झाला. ज्याच्या नांवानें तो रवाना झाला होता, त्याला रत्नांच्या ऐवजीं खडीसाखरेच्या खड्यांचें पार्सल मिळालें. 'पारिस' येथें हिऱ्यांचा व्यापार करणाऱ्या एका हिंदी जवाहिऱ्याकडे त्या कंठ्यांतलें मोतीं विक्रीसाठीं आले होते. त्यामुळें अधिकारी लोकांना ही चोरी करणाऱ्या मंडळीच्या मागावर जातां येण्याचें साधन मिळवून देण्याची त्याला संधि सांपडली. ते चोर पुढें लंडनमध्यें धरले गेले व त्यांची चौकशी झाली. तोंवर त्या चोरीचा पत्ता लावून मोतीं परत मिळवून देण्यासाठीं १०००० पौंडां—(१५०००० रुपयां)चें बक्षिस लावलें गेलें होतें व तें मोतीं कोठें आणि कसें गडप झालें, याविषयीं साऱ्या युरोपभर चर्चा चालू झाली होती. लंडनच्या एका रस्त्यावर या मोत्यांचें पुडकें सहज एका मजुराला सांपडलें. तें पुडकें त्या मजुरानें प्रथमतः एका बाजूला लाथाडलें होतें. त्याच्यांतील निधीविषयीं त्यावेळीं त्याच्या स्वप्नांत सुद्धां कल्पना नव्हती !

# भाग दहावा.

## पार्लमेंट—सभागृहें.

"तूं ज्या कांहीं योजना मनांत आणशील, त्या तुझ्या देशाविषयींच असूं देत."

शेक्सपियर.

लंडन हें ब्रिटिश राजसत्तेचें मुख्य स्थान. अनंत, मनोहारी व वैचित्र्यविशिष्ट साधनांच्या दृष्टीनें साऱ्या भूमंडळांत दुसऱ्या कोणत्याही शहरास लंडनइतका अभिमान बाळगतां येणार नाहीं; किंवा ऐतिहासिक संबंधाच्या समृद्धीविषयीं लंडनची बरोबरी करतां येणार नाहीं. हें प्रचंड व प्रभावशाली शहर, त्यांतील सुंदर इमारती व चित्रपटासारखे रस्ते, यांची खरी कल्पना नुसत्या शाब्दिक वर्णनानें होणें शक्यच नाहीं. येथील चित्तवेधक, स्फूर्तिदायक व विस्तीर्ण देखाव्याचा चित्रपट बनण्याला साधन होणाऱ्या वस्तूंपैकीं दोन वस्तू अशा आहेत कीं, त्यांच्यासंबंधानें तेथें जाणारे लोक आश्चर्यचकित झाल्यावांचून राहात नाहींत. त्यांचें सौंदर्य व त्यांची अप्रतिम ढब यांमुळें त्यांच्याकडे अवश्यमेव मन वेधतेंच.

पण याखेरीज त्यांच्या भोंवतीं या थोर ब्रिटिश राष्ट्राचें जीवन व उमेदी यांच्याशीं सर्वथैव संलग्न अशीं किती तरी स्मारकें जमून वृद्धि पावत आलेलीं आहेत कीं, त्यांमुळेंही पाहणाराचें मन आकर्षित झाल्याशिवाय राहात नाहीं. अशा या इमारती अर्थांतच दोन्ही पार्लमेंट गृहें व वेस्टमिन्स्टर ॲबे, या होत. या दोन्ही बादशाही व भव्य इमारती—ज्यांच्या वैभवापुढें मोगल लोकांच्या प्राचीन संगमरवरी प्रासादांचें तेज फिकें पडतें—मधील परस्पर संबंध पुष्कळांना कदाचित् माहित असेल त्याहून किती तरी निकट व खरा आहे. कारण, प्राचीन काळीं पार्लमेंटाला कांहीं काळ वेस्टमिन्स्टर ॲबेमध्यें तात्पुतें स्थळ मिळालेलें होतें. या ॲबेमधील पूर्वीची कायदे करण्याची ' चेंबर ' अद्यापि पाहण्यास जाणाऱ्यांना एक कौतुक वाटण्याजोगें स्थल आहे.

माझ्या लहानपणापासून या महान् ब्रिटिश पार्लमेंटच्या संबंधानें मीं किती तरी ऐकलें व वाचलें होतें. तत्संबंधीं चित्रांमुळें माझ्या मनांत पूर्वींपासूनच त्यांच्याविषयीं दृढ परिचय उत्पन्न झालेला होता. मी इंग्रजी इतिहास शिकूं लागलों तेव्हांपासून, ' सेंट स्टीफन् 'चा राजवाडा—जेथून मोठमोठ्या हालचालींना प्रारंभ झालेला, व सामाजिक प्रगतीसंबंधीं कायदेकानू पसार झालेले होते—त्यानें माझ्या कल्पनापटावर फार विस्तृत जागा व्यापलेली होती. ब्रिटिश सत्ता व सरकार, यांच्या या मूळ

वसतिस्थानाचें आपल्या नेत्रांना प्रत्यक्ष दर्शन घडावें, अशी मला साहजिक व उत्कट लालसा होती. ब्रिटिश अंमल व राज्यव्यवस्था म्हणजे, मूर्तिमान् स्वातंत्र्य व प्रगति, अशी माझी अगदीं अव्वलपासून दृढ कल्पना झालेली होती. दीर्घकाल मनांत मुरून राहिलेली ही माझी इच्छा या विलायतच्या सफरीनें मला पूर्ण करतां आली.

साऱ्या मोठ्या वस्तूंचा मूळारंभ अणुमात्रच असतो. हिंदुस्थानांत वनप्रदेशांतील वृक्षराज असा राक्षसी वटवृक्ष एका राई एवढ्या बीजापासून पैदा होतो. अफाट महासागराकडे धांव घेणाऱ्या महानदीचा उगम पर्वताच्या कड्यावरून थेंबथेंब टपकणाऱ्या लहानशा ओहोळापासून असतो. ही नैसर्गिक सृष्टीमध्यें दिसून येणारी गोष्ट समाजामध्येंही तत्त्वतः दिसून येते. ब्रिटिश कायदे करणाऱ्या मंडळीचें बीज शोधूं गेलें तर तें साक्सन् काळांतील शहाण्या लोकांच्या 'विटॅन् एगेमाट्' मध्यें सांपडतें. हिंदुस्थानांतील ग्राम-पंचांशीं त्याची कांहींशी तुलना होऊं शकते. 'नार्मन कांकेस्ट'च्या-नार्मन लोकांनीं इंग्लंड जिंकून घेतलें त्या-वेळीं राज्यकारभार राष्ट्रीय 'कौन्सिल' किंवा सरदार मंडळी यांच्या मार्फत होत होता. राजाच त्या मंडळाचा अध्यक्ष असे. पण त्यानेंच सर्व सत्ता बळकावल्यामुळें, या मंडळाची कार्यमर्यादा संपुष्टांत आलेली होती, असें दिसतें. पुढें कांहीं काळानंतर सरदार लोकांनीं एकदिल होऊन राज्या-

धिकाराचा पुष्कळसा अंश जबरदस्तीनें राजाकडून काढून घेतला. पुढें ही सरदार मंडळी आपसांत भांडूं लागलेली आढळते. त्याचा परिणाम असा झाला कीं, राजाला आपली पूर्वीची पूर्ण सत्ता प्रस्थापित करतां येऊन तो पुन्हां वस्तुतः निरंकुश सत्ताधारी बनला. याच्याही पश्चात् सरदार व मध्यम स्थितींतले लोक यांच्या साहाय्यानें व संमतीनें राजा अधिकार चालवीत असलेला दिसून येतो. पुनः पुढें याच लोकांच्या हातीं अधिकाधिक राजसत्ता जाते. 'पार्लमेंट' शब्दाचा जो लौकिक अर्थ समजला जातो, त्या अर्थाची पार्लमेंट सभा ब्रिटिश जनतेच्या हक्काच्या सुप्रसिद्ध सनदे (ग्रेट चार्टर) वर जॉन राजाला सही करणें भाग पाडलें जाई तों, अस्तित्वांत आली नव्हती. ही प्रसिद्ध सनद ब्रिटिश स्वातंत्र्याचा मूळ पाया असें नेहमीं मानतात. पुढें ती अनेक वेळां पुनःपुनः कायम केली गेली आहे.

पार्लमेंट हौसेस–सभागृहा–समोर क्रॉमवेल्‌चा घोड्यावर बसलेला सुरेख पुतळा उभा केलेला आहे. इंग्लंडच्या इतिहासांतील आणखी एका ठळक स्थित्यंतराच्या क्षेत्रमर्यादाचिन्हाचा व काळाच्या विलक्षण घडामोडीचा तो पुतळा स्मारक आहे. सामाजिक स्वराज्य–'कॉमन वेल्थ'–च्या नंतर राजकीय पेंडयुलम्–ओळंब्या–ला 'रिस्टोरेशन'चा–हक्कदार राजाला पुनः बोलावून आणण्याचा–एक हेलकावा पुनः सुदैवानें मिळाला. त्यामुळें डोईजड लष्करी जुलुमाऐवजीं, पुनः राजकीय अंमल

चालू झाला, इतकेंच नव्हे, तर त्याबरोबरच पार्लमेंट व जमीनदार मंडळी यांचेंही श्रेष्ठत्व कायम झालें, आणि राष्ट्रीय कारभारामध्यें त्यांचाच शब्द पुष्कळ काळपर्यंत विशेष प्रबळ अधिकाराचा राहिला. राजा व प्रजा यांच्यामध्यें मधून मधून झगडे होत राहिले, पण त्यांच्यापासून हळू हळू राजकीय पक्ष व प्रधान मंडळ अशा दोन 'पार्टीज्'–पक्ष–व 'क्याबिनेट' यांनीं घटित राज्यव्यवस्था वृद्धिंगत झाली. ब्रिटिश राज्यव्यवस्थेमध्यें राजाच्या ऐवजीं अधिकारारूढ पक्षच निर्णायक अधिकारी बनला व 'क्याबिनेट' अधिकारारूढ पक्षाची कार्यकर्त्री 'कमेटी' झाली. 'हौस ऑफ् कामन्स'–सामान्य लोकांच्या प्रतिनिधींची सभा–इच्यामध्यें 'क्याबिनेट' नें बहुमत अनुकूळ करून घेतलें असल्यामुळें, ती राजाला सर्व प्रजेच्या तर्फे म्हणून सल्ला देऊं लागली. ती राजानें मान्य न करणें म्हणजे, 'क्याबिनेट'ला राजीनामा देण्याला सांगण्यासारखेंच होतें.त्यानंतर पार्लमेंट 'क्याबिनेट' च्याच पक्षाला कायम राहिली तर, त्या 'पार्लमेंट'ची बरखास्ती किंवा राजानें माघार खाऊन त्या पार्टीचें म्हणणें मान्य करणें, हें ठरलेलें.

राज्यांतील तीन ' इस्टेट्स् ' ह्मणजे राजा, लॉर्डस् स्पिरीचुअल् व टेंपोरल् ( धर्मसंबंधी व राज्यसंबंधी सरदार ) आणि ' कॉमन्स ' ( प्रजेचे प्रतिनिधी ) हे सर्व मिळून ' ब्रिटिश पार्लमेंट ' होतें, हें सर्वांना माहीतच आहे. लॉर्ड्स् स्पिरीचुअल व टेंपोरल एकत्रच बसतात. त्यांना ' हौस ऑफ्

लॉर्ड्स्' किंवा 'अप्पर चेंबर' ह्मणतात. आजकाल सर्व राजकीय सत्ता मुख्यत्वें लोकनियुक्त 'चेंबर'–'हौस ऑफ् कॉमन्स' (प्रजेच्या प्रतिनिधींची सभा) इच्यामध्येंच केंद्रीभूतशी झालेली आहे. निरनिराळे 'रिफार्म आक्ट्स' किंवा सुधारणुकीचे कायदे पसार होऊन, निवडणुकीच्या हक्काची (मतें देण्याची) सत्ता प्रथम थोर जमीनदारांच्या हातून निघून, मध्यम स्थितीच्या लोकांच्या हातीं व नंतर साधारण लोकसमाजाच्या हातीं गेली आणि अखेर आतां हळूहळू जी लोकप्रिय प्रजासत्तात्मक राज्यव्यवस्था अस्तित्वांत आली आहे, तिच्यांत ब्रिटिश राजसत्तेंतील खरें स्वातंत्र्य व्यक्त होत आहे व ती इतर राष्ट्रांना नमून्यादाखल झालेली आहे. ब्रिटिश राष्ट्राचा उदय व प्रगति, व ज्याच्यावर सूर्य नेहमीं उदित राहतो, असें महान् साम्राज्य, यांची घटना इत्यादिकांचा इतिहास, पार्लमेंट सभागृहें पहात असतांना चित्तचक्षूपुढें एखाद्या विस्तृत व विचित्र देखाव्याप्रमाणें तरंगतसा राहतो.

'इंडिया ऑफिसा'नें कृपा करून आमची तेथें जाण्यासंबंधीं व्यवस्था केली होती. आमच्याकरितां 'हौस ऑफ कॉमन्स'मध्यें डिस्टिंग्विष्ड स्ट्रेंजर्स ग्यालरींत (प्रसिद्ध परकीय लोकांसाठीं राखून ठेवलेल्या ग्यालरींत) जागा केली होती. तेथून खालीं जमलेल्या मंडळींचा देखावा नीट व स्पष्ट दिसत होता. मिस्टर जोसेफ किंग एम्. पी., यांनींही तशीच राणीसाहेबांसाठीं लेडीज् ग्यालरी

( सभ्य स्त्रियांच्या ग्यालरी ) मध्यें कृपा करून जागेची सोय करविली होती. तेथें जावयाच्या पूर्वी ही ऐतिहासिक इमारत आह्मी फिरून पाहून आलों होतों. हें पाहात फिरणेंही अत्यंत मजेदार व आनंददायक झालें होतें.

'सेंट स्टीफन्स हॉल'च्या भव्य इमारतीमध्यें, आम्ही एका साध्याशाच 'पोर्च' ( ढेलज ) मधून गेलों. आंत शिरतांच तेथें, पूर्वकालीन प्रसिद्ध मुत्सद्द्यांचे संगमरवरी पुतळे दृष्टीस पडतात. बर्क व ग्राट्टन, पिट्ट व फॉक्स, मान्सफील्ड, सामर्स, चाथाम, वालपोल, सेल्डेन, हॅंपडेन, क्लारेन्डन, आणि फॉक्लंड, अशा विख्यात व थोर पुरुषांचें स्मारक, असे हे पुतळे, ज्यांच्या त्यांच्या नेहमींच्या ढबीमध्यें उभे केलेले आहेत. पिट्ट आणि फॉक्स यांच्यासारख्या कट्ट्या प्रतिस्पर्ध्यांचे पुतळे,एकमेकासमोर—जणों पूर्ववत् वाग्युद्धाला तयार—उभे पाहून माझ्यांतील विनोदी भावनांना भरतें आलें व या दोन्ही पुतळ्यांची अस्वाभाविक स्थापना सहजगत्या झाली अगर ती बुद्धिपूर्वक करण्यांत आली, याविषयींही माझ्या मनांत कल्पना आली. लॉर्ड फॉक्लंडच्या पुतळ्याला अलीकडे थोडेंसें नुकसान पोहोंचलेलें आहे.त्याची निशाणी कायम आहे.याविषयींची आख्यायिका अशी आहे कीं, तीन चार वर्षांपूर्वी स्त्रियांना मताधिकार देण्याच्या चळवळीसंबंधानें दंगेधोपे चालू असतांना या प्रश्नाच्या तर्फेच्या कांहीं आडदांड स्त्रियांची एक टोळी 'सेंट स्टीफन्स हॉल'च्या मार्गानें गुपचिप 'हाउस ऑफ् कॉमन्स' मधील 'लाब्बी' कडे गेली

व तिनें तेथील अंमलदार लोकांना अवचित गांठलें. त्यांच्यांतील एका स्त्रीनें बरोबर नेलेल्या सांखळीनें, स्वतःला लॉर्ड फॉकलंडच्या पुतळ्याच्या एका पायाला जखडून घेतलें; आणि 'स्त्रियांचे हक्क' यावर मोठमोठ्यानें बडबड चालविली. पोलीस लोक धांवून आले व त्यांनीं त्या कजागिणीला जबरदस्तीनें तेथून ओढून नेलें. त्या दांडगाईमध्यें लॉर्ड फॉकलंडच्या पुतळ्याच्या पायाचा एक भाग तुटून गेला.

'सेंट स्टीफन्स हॉल' मधून मोठ्या दिवाणखान्यांत गेल्यावर, तेथील सजावट व रोषनाई पाहून, भारी अचंबा वाटतो. हा दिवाणखाना 'हौस ऑफ लॉर्ड्स्' व 'हौस आफ कॉमन्स्' यांच्या दरम्यान आहे. त्याच्यावर शानदार घुमट असून त्याच्या खालीं, फारच मोठ्या, रंगित कांचेचें काम केलेल्या, खिडक्या आहेत. त्यांतून रंगीबेरंगी प्रकाश पडतो. त्याचा झालेला मिलाफ फारच मनोरम वाटतो. उत्तर व दक्षिण या दोन्ही बाजूंच्या ढेलजेच्या वरच्या भागांत 'सेंट जॉर्ज अँड दि ड्रेगन' व वेल्सचा पुरस्कर्ता महात्मा 'सेंट डेव्हिड,' यांचीं अनेक रंगांच्या कांचांच्या तुकड्यांनीं बनविलेलीं सुंदर चित्रें आहेत. भिंतींमध्यें कोनाडे असून त्यांत ब्रिटिश राजे व राण्या यांचे पुतळे आहेत. जमिनीवर लॉर्ड जॉन रसेल, धि अर्ल ऑफ् इड्डस्ले ( सर स्टाफर्ड नॉर्थकोट ), जॉन ब्राइट्, लॉर्ड ग्रानव्हिल, व ग्लाड्स्टन अशा विख्यात मुत्सद्दयांचे भव्य पुतळे आहेत. या योगानें त्या स्थळाला भारी

शोभा आलेली आहे. ग्लाडस्टनच्या पुतळ्याला अपूरा पुतळा ह्मणतात. कारण त्याच्या डाव्या पायाच्या विजारीच्या भागाला, उजव्या पायाप्रमाणें पट्टीची शिवण दाखविलेली नाहीं. हें वाचून चिकित्सेखोर मंडळीला चमत्कार वाटेल. पुतळा घडणाऱ्या शिल्पकाराचें यांत दुर्लक्ष झालें आहे. पण त्यानें, या गुण-संपन्न मुत्सद्द्याची जी चेहऱ्याची चर्या व ढब दाखविली आहे, ती फारच भारदस्त व सजीवशी आहे. यामुळें त्या चुकीची भरपाई झाली आहे. या अलौकिक पुरुषाच्या अंगीं सर्वच राष्ट्रांतील लोकांविषयीं वसत असलेल्या सहानुभूतीमुळें त्याची जगांतील श्रेष्ठ व महात्मे लोकांमध्यें गणना होत असे.

मी 'हौस ऑफ् लॉर्ड्स'मध्यें पोहोंचलों तेव्हां, तेथील काम जोरांत चाललें होतें. लॉर्ड लॅमिंगट्न हे 'बाल्कन्स' मधील मुसलमानांच्या संरक्षणासंबंधी प्रश्न विचारीत होते. पुढें ते मोठ्या मेहरबानगीनें आमच्याबरोबर दाखवीत फिरले. 'लॉर्डस' मंडळी फारशी हजर नव्हती. तेथील सभासद लोकांमध्यें शांतता व आराम यांचा प्रभाव दृष्टीस पडत असून, तो त्या दिवाणखान्याचें ऐश्वर्य व सौंदर्य यांस अनुरूप असाच होता. येथें फारच भव्य व शानदार बादशाही सिंहासन ठेवलेलें असून, तें सुवर्ण व गर्दलाल रंग यांचा दैदीप्यमान पुंजच आहे असा भास होतो. या सिंहासनावरून शहानशहा पार्लमेंटची बैठक सुरू करितात. त्या समारंभाचा देखावा मध्ययुगांतील थाट-माटासारखा असतो. हें सिंहासन दिवाणखान्याच्या वरील टोंकाला

ठेवलेलें असून, त्याच्यावर असलेल्या अनमोल मेघडंबरीमुळें तें फारच खुलून दिसतें. त्याच्या डाव्या बाजूला क्वीन एम्प्रेस् मेरी यांचें सिंहासन व उजव्या बाजूला हिज रॉयल हायनेस प्रिन्स ऑफ वेल्स यांची दरबारी बैठक आहे. त्याच्या दोन्ही बाजूला दोन, सोन्याचा मुलामा केलेलीं सुरूच्या झाडाच्या आकाराचीं उंच शामदानें आहेत.

सिंहासनाच्या पुढेंच लॉर्ड चान्सेलरची वूलसॅक–गादी-दार कोच–आहे. पूर्वीं लोंकर पैदा करून ती परदेशीं पाठविणें, हाच इंग्लंडचा मुख्य धंदा व व्यापार होता. त्यावेळीं नक्षीदार व सुरेख काम केलेले लोंकरीचे मऊ गादीवजा थैले लंडन येथील व्यापारी, या हौसला ( सभेला ) शिष्टाचार, व आपल्या धंद्याच्या महत्त्वाचें निदर्शक ह्मणून नजर करीत असत. त्यावरून या कोचाला वूलसॅक हें नांव पडलें आहे.

तळमजल्यावरील बाकीच्या भागांत आडवीं बांकें मांडलेलीं आहेत. त्यांच्या प्रत्येक बाजूला भिंतीपर्यंत लाल रंगाच्या बैठकींच्या रांगा एकीवर एक लागलेल्या आहेत. अधिकृत पक्षापैकीं सन्मान्य ' लॉर्डस् ' व त्यांच्या तर्फेचे इतर लॉर्ड्स् सिंहासनाच्या उजव्या बाजूला आणि 'आपोझिशन्'–विरुद्ध पक्षाचे–लॉर्ड्स् डाव्या बाजूला असतात. मधील आडव्या बैठकी, दोन्ही पक्षांचे नव्हेत अशा मंडळींसाठीं राखलेल्या असतात. ओक लांकडावरचें फारच सुरेख कोरींव काम, सुंदर पितळेचें काम, नॉर्मन कांकेस्टपासून निरनिराळ्या राजघराण्यांतील राजे व

राण्या, यांचीं रंगित कांचांच्या तुकड्यांनीं बनविलेलीं चित्रें असलेल्या मोठमोठ्या व प्रेक्षणीय खिडक्या, इत्यादिकांनीं या भव्य दिवाणखान्याला शोभा आणण्याच्या कामाची पूर्तता झाली आहे.

राजेसाहेबांची स्वारी 'पार्लमेंट' सुरू करिते तेव्हांचा समारंभ फारच प्रेक्षणीय होतो. त्या प्रसंगीं 'पीयर्स' 'लॉर्डस्' लोक, ठरीव दरबारी पोषाख घालून, शहानशहाच्या स्वागतासाठीं उभे असतात. 'ब्लॅक रॉड' ( काळ्या रंगाचा व सोन्याचा सिंह मुठीवर बसविलेला राजदंड, अधिकाराचें चिन्ह म्हणून हातीं धारण करणारा अंमलदार ) 'कॉमन्स' व त्यांचा 'स्पीकर' यांना 'हौस ऑफ् लॉर्ड्स्' च्या 'बार'— दिवाणखान्यांतील विवक्षित हद्दी—पर्यंत बोलावून आणण्यासाठीं पाठविण्यांत येतो. ते आल्यावर, बादशहा सिंहासनावरून आपलें भाषण वाचून दाखवितात. तें 'क्याबिनेट'( प्रधान मंडळा )नेंच तयार केलेलें असतें. त्यांत ब्रिटिश राज्याचें परराष्ट्रांशीं वसत असलेल्या राजकीय संबंधाचें सिंहावलोकन व सुरू होणाऱ्या पार्लमेंटपुढें प्रधानमंडळाकडून जीं कायद्याचीं बिलें यावयाचीं असतात, त्यांचा सारांश दिलेला असतो. 'कॉमन्स' लोक तेथून आपल्या जागीं परत जातांच, आपण सिंहासनावरून झालेल्या भाषणांत नमूद असलेल्या विषयांचाच विचार करण्याला बांधले गेलों नाहीं, असें सिद्ध करण्यासाठींच जणों, बहुतकरून कोणच्या तरी एका बिलाचें

पहिलें वाचन करण्याचा आपला हक्क बजावतात. पुढें तें भाषण दोन्ही ' हौसेस्' मध्यें अनुक्रमें 'लॉर्ड चान्सेलर' व 'स्पीकर ' पुनः वाचतात. त्यास उत्तरादाखल मानपत्र देण्याची सूचना एक सभासद पुढें आणतो व त्यास दुसरा अनुमोदन देतो. ते दोघेही अधिकारारूढ पक्षांतले व या प्रसंगीं दरबारी पोषाख केलेले असावे लागतात. या मानपत्रांत बहुतेक मूळ भाषणाचाच अनुवाद असतो. विरुद्ध पक्ष बहुधा या मानपत्रांत कांहीं दुरुस्त्या करण्याची सूचना पुढें आणतो. आणि अशा रीतीनें अधिकारारूढ पक्षाच्या राज्यकारभाराच्या धोरणावर टीका व हल्ला करण्याची संधि विरुद्ध पक्षाला पार्ले-मेंट सुरू होतांच मिळते. मानपत्राबद्दल एकवाक्यता झाली ह्मणजे, तें रीतीप्रमाणें राजेसाहेबांना अर्पण केलें जातें.

सरकारी दरबारी समारंभाच्या प्रसंगीं उपयोग करण्याची राजेसाहेबांचा पोषाख करण्याची खोली पृथक् आहे. ' किंग् ऑर्थर अँड हिज् नाइट्स् ऑफ धि राउंड टेबल' यांच्या संबंधाची दंतकथा दर्शविणाऱ्या उठावदार व उत्तमोत्तम चित्रांच्या योगानें तेथें भारी शोभा आलेली आहे. त्याच्या छतावर फारच सुरेख प्यानेल्चें ( तबकवजा ) काम केलेलें आहे. त्याला लागूनच राजकीय ' ग्यालरी ' आहे. तिच्यांत 'वॉटर्लूच्या लढाईनंतर वेलिंगटन व ब्लूशर यांची भेट' व 'नेल्सनचा मृत्यु' हीं अत्युत्तम चित्रें आहेत. जवळच ' प्रिन्सेस ग्यालरी ' आहे. तेथें उंच सिंहासनावर महाराणी व्हिक्टोरिया यांचा

बसलेला पुतळा आहे. त्याच्या एका हातांत अधिकाराची निशाणी–राजदंड,–व दुसऱ्यांत विजय आणि कार्यसिद्धि यांचें द्योतक अशी 'लॉरेल' ची माला आहे. उजवीकडे दिसण्यांत कडक व कठोर, अशी न्यायदेवता उभी आहे. तिच्या हातीं, प्रत्येक कृत्य तोलण्यासाठीं न्यायाचा कांटा आहे. डावीकडे दयेची कृपामय मूर्ति आहे. तिची चर्या सौम्य व कळवळीची अशी दाखविलेली आहे. ती क्षमा व समेट यांचें निदर्शक अशी ऑलिव्हची डहाळी अर्पण करण्यासाठीं पुढें झुकलेली आहे.

'हौस ऑफ् कॉमन्स'च्या 'ग्यालरी' मध्यें मी अगदीं नवखा किंवा अपरिचित होतों, असें नाहीं. मजजवळ तेथील रंगीत तसबिरी आहेत. त्यांच्यावरून मला तेथील अंतर्भागाची चांगली माहिती झालेली होती. कांहीं चेहरेही सहज ओळखतां येत होते. ही 'चेंबर' मोठीशी वाखाणण्यासारखी सुंदर किंवा भव्य आहे, असें नाहीं. प्रथमच पाहणाऱ्याचा ती पाहून बराच हिरमोड होतो, असें मला सांगण्यांत आलें. मला तर ती एक कामकाजायोग्य स्थळ आहे, असें वाटलें. तेथें बसण्याची सोय नियमितच आहे. तरी तेथें व्हावयाच्या कामाच्या मानानें ही जागा ठीक व योग्य अशीच आहे. तेथें गहिऱ्या हिरव्या रंगाच्या बैठकीच्या रांगा असून त्यांच्या मध्यभागीं रुंद व प्रशस्त रस्ता सोडलेला आहे. या बैठकीच्या रांगांना बेताचा चढाव दिलेला असून बाजूच्या

ग्यालऱ्यांमुळें भिंती रुक्षशा वाटत नाहींत. मेंबर लोकांचें, इतर सभासदांना उद्देशून चाललेलें भाषण सर्वत्र चांगलें ऐकूं जाण्याला, ही बैठकीची व्यवस्था फार नामी आहे. पण अधिकारारूढ पक्षांतील 'मिनिस्टर्स' ( प्रधान मंडळी ) बहुतेक नेहमींच, विरुद्ध पक्षाकडे तोंड करून भाषण करितात; व खुद्द त्यांच्या पक्षाचे लोक त्यांच्या मागें बसलेले असतात. ही व्यवस्था मला थोडी अप्रयोजक वाटली. 'फ्रेंच चेंबर ऑफ डेप्युटीज्' मधील ह्या बाबतीची व्यवस्था यापेक्षां बरी वाटते. त्या चेंबरची जागा अर्धवर्तुलाकार केलेली असून, तेथें प्रेसिडेंटाच्या खुर्चीच्या खालच्या बाजूस एक चबुत्र्यासारखी जागा आहे. तेथूनच सर्वजण भाषण करतात. भाषण करण्याला आपली जागा सोडून तेथवर जावें लागतें. यामुळें या व्यवस्थेंतही थोडी गैरसोय आहेच.

या 'हौस' दिवाणखान्यामधील तावदानाच्या खिडक्यांतून निरनिराळ्या 'पार्लमेंट'च्या ( बरोज )–विभागां–चीं 'आरमोरियल बेअरिंग्स्'–विशिष्ट लष्करी चिन्हें–काढलेलीं आहेत. तसेंच त्याच्यांत भक्कम 'ओक' लांकडाचें सुंदर 'पानेल्लिंग'–तबकवजा काम केलेलें–आहे. त्या योगानें शोभा, शाश्वती व उपयुक्तता, हें सर्व साधलेलें आहे. सन्मान्य परकीयांची व 'पीयर्स'–'लॉर्ड्स्'–लोकांची, या दोन्ही ग्यालऱ्यांमधून खालचा देखावा साफ दिसतो. पण सभ्य स्त्रियांच्या 'ग्यालरी'च्या आड,पितळी जाळी लावलेली आहे हें लक्षांत

ठेवण्याजोगें आहे. त्याच्यावरून, हिंदुस्थानांत बायकांना बंद सज्जांत किंवा पडद्याआड ठेवण्याची चाल आहे तिचें स्मरण होतें. ' कॉमन्स ' सभेमध्यें ' स्पीकर 'ची खुर्ची, ही एक ठळकशी चीज आहे. ती ओक लांकडाची असून तिच्यावर सुरेखसें कोरीव काम केलेलें आहे. त्या खुर्चीवर एक मोठी मेघडंबरीही आहे. 'स्पीकर' 'हौस ऑफ् कॉमन्स'मध्यें येतो, तो अगदीं साध्या थाटानें. त्याच्यापुढें 'मेस'—भालदार काठी—घेऊन सशस्त्र 'सार्जंट ऑफ् आर्म्स'—पोलीस अंमलदार—चालत असतो. व बरोबर त्याचा सेक्रेटरी, आणि 'चापलेन'—धर्मगुरु—हे असतात. तेथें पोहोंचतांच 'चापलेन' प्रार्थना वाचूं लागतो. ती आटपे-पर्यंत प्रेक्षकांना आंत जाण्याची परवानगी नसते.

आह्मी हिंदी लोक स्वप्नसृष्टींत चूर असल्याविषयीं महशूर—आमची बुद्धिविकासाची दिशा केवळ कल्पनातरंगांमध्यें दंग होण्याची. 'हौस आफ् कॉमन्स'मधील चाललेलें काम पाहात असतांना या निसर्गसिद्ध स्वभावाला मीही बळी पडलों. 'स्पीकर'-विषयीं अतिशयच आदरबुद्धि दाखविली जाते. तिचा माझ्या मनावर वस्तुतः चांगलाच ठसा उमटला. पक्षाभिमानापासून उत्पन्न होणारा दुराग्रह व मनाचा कुत्सितपणा यांच्यापासून तो अगदीं अलिप्त असून, सभेंत चाललेल्या वादविवादाचें सुरेख नियमन करितो. यामुळें त्याला, दरबारी लोक राजाला मान देतात, त्याच भावनेनें सर्व लोक मानीत असत. येथील बऱ्याच गोष्टी मला पसंत वाटल्या. तरी वादविवादाच्या तऱ्हेवरून पाहतां,

ब्रिटिश पार्लमेंटची पद्धत सर्वथैव उत्तमच आहे, असें कांहीं मला वाटलें नाहीं. हिंदुस्थानांत कायदेकौन्सिलामध्यें सभासद भाषणें करितात, तेथें एखाद्या विषयाला पाठबळ देणारें बहु-मत मिळविण्यासाठीं जज्ज व जूरी यांच्यापुढें स्वपक्षाचें समर्थन करावें लागतें, तद्वत् योग्य व शांत बुद्धिवाद योजून प्रयत्न केला जातो. पण ब्रिटिश राजकारणामध्यें हवा तितका शब्दच्छल व खरीं खोटीं कारणें पुढें करून स्वपक्षाचें समर्थन करण्याचे कामीं प्रयत्न करण्यास प्रत्येक पक्षाचे लोक कसर करीत नाहींत असें दिसतें. बोलणारा आपल्या भाषणाचा अक्षरशः किंवा अगदीं सरळ अर्थ घेतला जावा, असें कदाचित् इच्छीत नसेल. पण त्याला निवडून देणाऱ्या मतदारांचा कांहीं भाग त्यांच्या भाषणाचा अगदीं सरळ तोच अर्थ कर-तात हें खास. परिणामावरून साधनांचे गुणदोष ठरविले पाहिजेत, असा कोटिक्रमही लढवितां येईल. पण ही अव्वल प्रतीची मुत्सद्देगिरी नव्हे.

मोठमोठे राजकीय पक्ष असणें इष्ट असण्याबद्दल बरेंचसें समर्थन करतां येण्यासारखें आहे; कारण त्यामुळें अधिकार व हक्क यांचा दुरुपयोग न होण्याबद्दल कांहीं अंशीं हमी मिळते. चाललेलीं भाषणें व वादविवाद ऐकत असतांना मला असें वाटलें कीं, मेंबर लोक निवडणुकीच्या भागांत स्वतःच्या मतांचा जो प्रसार करावयाचा तो पार्लमेंटांतील भाषणांच्याद्वारें करतात; कारण या राष्ट्रांत वर्तमानपत्रें म्हणजे राजकीय बाबतींतील

एक बलाढ्य प्रस्थच होय. वादविवादाच्या झगड्यामध्यें पक्षाभिमानाचा अतिरेक झाला.असतां तात्कालिक युक्तायुक्ततेच्या स्थंडिलावर सार्वजनिक हिताचा बळी पडण्याची भीति असते. हिंदुस्थानासारख्या देशांतून येणाऱ्या मला, ही गोष्ट विशेष जाणवली. तेथें साऱ्या कौन्सिलांतून स्वदेशभक्तीविषयींची कल्पना भारी उदात्त व उच्च स्वरूपाची दृष्टीस पडत असते. दोन्ही प्रमुख पक्षांतील मंडळी वाक्कलह व झगडे करण्याच्या ऐवजीं आपल्यामधून सर्व सभेच्या विश्वासास पात्र असे सुमारें सहासहा प्रतिनिधि निवडून त्यांच्या कमेटीकडे ज्याविषयीं मतभेद आहे, अशा प्रश्नांच्या निकालाचें काम सोंपवितील तर, त्या योगानें शहाणपणाचे कायदेकानू करण्याच्या कामीं विशेष फायदा होईल, असा एक विचार माझ्या मनांत आला. या योगानें हल्लीं होत असलेला पुष्कळसा वेळेचा अपव्यय टळेल आणि खुद्द पार्लमेंटमध्येंच नव्हे तर साऱ्या देशभर माजणारें वैमनस्य बंद पडेल. मीं सुचविलेल्या या तऱ्हेला, थोड्याशा लोकांच्या हातींच विशेष सत्ता जाईल, असा एक आक्षेप घेतां येईल हें मी जाणतों.पण आह्मां प्राच्य लोकांना राष्ट्रीय भवितव्यतेच्या नियमनाचें काम मध्यम बुद्धीच्या बहुजनसमाजापेक्षां, थोड्याशाच शहाण्या लोकांच्या नेतृत्वाखालीं असणें अधिक श्रेयस्कर मानण्याची संवय पडून गेलेली आहे.

कोणच्या तऱ्हेची राज्यव्यवस्था परिणामीं फायदेशीर होईल हें ठरविणें सोपें नाहीं. कारण जागजागीं वस्तुस्थिति बदलते.

इतिहासावरून पाहतां राष्ट्रांच्या प्रगतीमध्यें, प्रथम एकसत्ताक स्वतंत्र राजसत्ता व नंतर प्रजासत्ताक तिच्यामागून नियमित-जनसत्ताक राज्यव्यवस्था, अशा प्रकारचा राजकीय चक्रनेमिक्रम असल्याचें दृष्टीस पडतें. या प्रत्येकीमध्यें कांहीं ना कांहीं दोष व वैगुण्य असणारच. वरीलपैकीं कोणत्या प्रकारची राज्यव्यवस्था चांगली आहे, हें ठरवितांना कोणच्या तऱ्हेमध्यें सर्वांत अधिक चांगुलपणा व कमी वैगुण्य आहे, याचा विचार करणें अवश्य आहे. ब्रिटिश कॉन्स्टिटयूशन किंवा राज्यव्यवस्थेमध्यें या वरील प्रत्येक तऱ्हेंतील चांगल्या गुणांचा उत्तम प्रकारचा मिलाफ झाल्याचें आपण पाहतों. राज्यांतील तीन्ही 'इस्टेट्स'—मुख्य वर्ग—राजा, वरिष्ठ लोक व प्रजा—यांच्या अधिकारांचा समतोलपणा, व 'पार्टी सिस्टिम'—दोन पक्षांच्या द्वारें चाललेली राजकार्याची व्यवस्था—या दोहोंमुळें एकंदरींत राज्यकारभाराचें काम समाधानकारक चाललें आहे. कोणत्याही उपायांनीं या पद्धतींतील दोष नाहींसे करतां आले तर, ही पद्धति सर्वोत्कृष्ट होईल. पण या जगामध्यें सर्वोत्कृष्टपणा केव्हांही दुर्मिळच. आपण आहे त्या स्थितींतच शक्य तेवढें हित साधलें पाहिजे. या दृष्टीनें पाहतां ब्रिटिश पार्लमेंटरी अमलांत जोंपर्यंत खरेपणा, न्याय व सहानुभूति, हीं प्रेरक तत्त्वें आहेत, तोंपर्यंत तो अंमल राज्यव्यवस्थेसंबंधांत शक्य तितका उत्तम आहे, असेंच दिसतें.

पण हे विचार व कल्पनातरंग बाजूला ठेवून मला 'सेंट स्टीफन्स'ची सफर पुरी केली पाहिजे. यांतील 'लाब्बी' ही

एक महत्त्वाचें खातें आहे. ती जणों सर्व सभासदांची अड्ड्याची-बैठकीची-जागा आहे. तेथें ते खाजगी रीतीनें एकत्र जमून, आपसांत राज्यकारभारासंबंधी प्रश्नांचा खल करितात, परस्परांचीं राजकीय बाबतींतील ह्कतें समजून घेतात. आणि दोन्ही पार्टींचे व्हिप्स-नियंते-आपापल्या पक्षाचीं मतें टांचून ठेवतात.

पार्लमेंटची बैठक संपेतोंपर्यंत हे दोन्ही पक्षांचे नियंते आपापल्या पक्षाच्या हितसंबंधांच्या कामीं अत्यंत दक्ष असून ते त्यांचें संरक्षण अतिशय जागरूकपणें करितात; आणि आणीबाणीच्या प्रसंगीं सभा बरखास्त होईपर्यंत कोणाही सभासदाला जातां येत नाहीं. कारण, अशा वेळीं प्रत्येकाच्या मताची जरूर लागतेच.

या ठिकाणीं प्रशस्त व भरपूर पुस्तकसंग्रह असलेल्या लायब्ऱ्या आहेत. त्याचप्रमाणें बोळाच्या वाटा असून त्यांत कुलुपें लावण्याजोगे खाने आहेत. त्यांच्यांत प्रत्येक सभासदाला कागदपत्र सुरक्षित ठेवतां येतात. मोठ्या वस्तूसंबंधांत अमेरिकन लोकांच्या कल्पना व तजविजी तशाच भारी प्रमाणावर असावयाच्या. तदनुरूप युनायटेड् स्टेट्सच्या 'सेनेट' मध्यें प्रत्येक मेंबरासाठीं स्वतंत्र कोठडी दिली आहे, ह्मणे. येथील एका लायब्ररीमध्यें एक ओक लांकडाचें जुनें मेज मला दाखविण्यांत आलें. तें पूर्वींच्या 'हौस ऑफ् कामन्स'मध्यें होतें. त्याच्या सभोंवतीं पूर्वीं पार्लमेंटांतलीं महत्त्वाचीं वाग्युद्धात्मक

रणें माजलीं होतीं. राष्ट्रीय भवितव्यतेवर परिणाम करणारे असे महत्त्वाचे प्रश्न वादविवादाच्या पारड्यांत लोंबत असतांना त्यासंबंधाचीं अनेक वादविवादात्मक द्वंद्वयुद्धें ज्या ठिकाणीं झालीं त्यांचें स्मरण देणारें असें हें विलक्षण मेज आहे.

येथें प्रशस्त व उत्तम सजविलेल्या ' टी रूम्स '-चहा घेण्याचे कमरे-आहेत. ' हौस ऑफ् कॉमन्स ' मध्यें निस्सत्व वादविवाद व भाषणें चालूं लागलीं असतांना, लॉर्ड बीकन्सफील्ड यांनीं आपल्या एका कादंबरींत व्याजोक्तीनें लिहिल्याप्रमाणें, ' विशी ' बोलण्याला उभा आहे व 'वाशी' बोलणें संपवून बसला आहे; किंवा एक राजश्री आपलें कंटाळवाणें भाषण आटपून दुसरे तसलेच राजश्री आपली टकळी सुरू करण्याला उभे आहेत; अशा स्थितींत, कंटाळ्याचा व आळसाचा वेळ काढण्याला, हे चहा घेण्याचे कमरे उत्तम साधन आहेत. येथें अगदीं आधुनिक तऱ्हेचीं स्नानगृहें आहेत. त्यांच्यांत थंड व गरम पाण्याच्या तोटया आहेत. तसेंच चांगल्या पाकशाळा व प्रशस्त भोजनशाळाही आहेत. मेंबर लोकांसाठीं येथें इतक्या व अशा कांहीं उत्तम सोई केलेल्या आहेत कीं, त्यांच्यावरून ' ब्रिटिश पार्लमेंट' ह्मणजे युरोपांतील एक अत्युत्कृष्ट क्लब, अशी फारां दिवसांपासून तिची ख्याति आहे.

येथील विस्तीर्ण ' टेरेस ' किंवा गच्ची ' सीझन'मध्यें समाजांतील प्रमुख स्त्रीपुरुषांचें आवडतें व रम्य स्थान

असतें. उन्हाळ्यांत दिनमान वाढलेलें, हवेंत उष्णता आलेली, व अप्रतिम ' स्ट्रॉबेरी ' फळांचा सुकाळ, अशा वेळीं हे 'सीझन'चे दिवस ऐन बहारीला पोहोंचलेले असतात. तेव्हां अत्यंत नाजूक, सुरेख व प्रेक्षणीय कपडे केलेल्या सुंदर व तरुण सभ्य रमणींनीं हा रमणीय गच्चीचा भाग, गजबजलेला असतो. त्या तेथें सभासद मंडळीबरोबर तिसरे प्रहरचा चहा घेतात. तेथून जवळच वहात असलेल्या टेम्स नदीचा उत्कृष्ट देखावा दिसत असतो. या सुप्रसिद्ध जलमार्गानें जाणाऱ्या आगबोटींमुळें त्या देखाव्यांत सुरेखसें चांचल्य येत असतें. त्यांतच भव्य व प्रचंड अशा ' वेस्टमिन्स्टर'-च्या पुलावरून चाललेल्या लंडनच्या अखंड रहदारीच्या मधुर ध्वनीच्या लहरी, ग्रीष्मवायूच्या मंदप्रवाहाबरोबर येत असलेल्या, एखाद्या मोठ्या धबधब्याच्या दुरून ऐकूं येणाऱ्या प्रचंड व गंभीर नादाप्रमाणें कर्णविवरावर आघात करीत असतात.

# भाग अकरावा.

## केंब्रिज व एक 'कंट्री मॅनशन्' किंवा सरदार व श्रीमान् लोकांची त्यांच्या जमीनदारीवरील एक हवेली.

'इंडिया आफिसा'नें मेहेरबानी करून मिस्टर ई.ए. बेनियन्स, 'सेंट जॉन्स कालज' चे 'फेलो' आणि हिंदी विद्यार्थ्यांचे स्थानिक सल्लागार, यांच्या मार्फत आह्मांला 'केंब्रिज' येथील प्रमुख संस्था पाहतां येण्याची व्यवस्था करविली होती. 'ऑक्सफर्ड'प्रमाणेंच तेथील कॉलेजांनाही पुष्कळशा स्थावर देणग्या–हिंदुस्थानांत देवस्थानांना संस्थापकांनीं दिलेल्या असतात त्याप्रमाणें–मिळालेल्या आहेत. त्यामुळें या कॉलेजांना चांगला स्थायिकपणा येऊन, स्वावलंबी व स्वतंत्र होतां येतें. मिस्टर बेनियन्स यांनीं कृपा करून आमच्या बरोबर फिरून या युनिव्हर्सिटींतील प्रेक्षणीय स्थळें वगैरे दाखविलीं. प्रत्येक कॉलेजामध्यें पृथक् पृथक् प्रार्थनागृह असल्याचें आमच्या निदर्शनास आलें. हीं कॉलेजें आज किती तरी शतकें सारखीं चालत आलेलीं, त्यांच्या भोंवतीं पुष्कळच उत्तमोत्तम व यशस्कर दंतकथा जुळलेल्या. त्यांची योग्यता केवढी तरी

त्यांच्यांतून तयार होऊन निघालेल्या शेंकडो विद्वान् व विख्यात गृहस्थांनीं, इंग्लंडालाच काय, पण साऱ्या जगताला शोभा आणिलेली आहे. अशीं हीं कॉलेजें प्रत्यक्ष पाहण्याचा प्रसंग मला फारच आनंदाचा वाटला. प्रत्येक कॉलेजाला स्वतंत्र क्रीडाभुवनें व मैदानें आहेत. त्यांच्यांत जागजागीं मोठमोठे व शानदार वृक्ष लागलेले आहेत. त्यामुळें तेथील देखावा फार रमणीय वाटतो.

प्रत्येक विद्यार्थ्याला पृथक् कोठड्या मिळतात. त्या फारच शानदार व आरामाच्या असतात. त्या डामरथ् येथील 'रॉयल नेव्हल कॉलेज' किंवा क्यांबलें येथील 'सांडहर्स्ट कॉलेजा'तल्या पेक्षां पुष्कळ चांगल्या आहेत. हिंदुस्थानांत मुंबई-सारख्या शहरांत राहणाऱ्या वाढत्या अमलदाराला सुद्धां त्या सुखाच्या व सोईच्या वाटतील. त्यांची तऱ्हा हिंदुस्थानांतील मध्यम स्थितींतल्या लोकांच्या शक्तीबाहेर आहे. केंब्रिज येथील कॉलेजांतला विद्यार्थी होणें ह्मणजे, त्या विवक्षित कॉलेजांत, राहण्याची जागा व खाण्यापिण्याची सोय होणें, आणि केंब्रिज येथील शिक्षण देणाऱ्या युनिव्हर्सिटीचा एक मेंबर—सभासद—होणें, इतकेंच. ती युनिव्हर्सिटी, निरनिराळ्या फ्याकल्टी—विषयां—वर व्याख्यानें देवविण्याची तजवीज करिते. सर्व कॉलेजांतील विद्यार्थी एकत्र जमून, आपणाला हव्या त्या त्या व्याख्यानमालेंतील व्याख्यानें ऐकतात. प्रत्येक व्याख्यानाची पृथक् पृथक् फी ठरलेली आहे. विद्यार्थी आपापल्या

'ट्यूटर्स'–उपशिक्षकां–नीं शिफारस केलेल्या व्याख्यानालाच जातात. आम्ही गेलों तेव्हां 'लॉंग व्हेकेशन'–मोठी सुट्टी–असल्यामुळें कॉलेजें बंद होतीं.तरी पण तेथें जें कांहीं पाहण्यांत आलें, त्यानें मला फार आनंद झाला. तेथील राहणीविषयीं मीं पूर्वींच जें कांहीं ऐकिलें व वाचलें होतें, त्यावरून मला तेथील आयुष्यक्रमाची चांगली कल्पना आली. मिस्टर बेनियन्स यांनीं तसदी घेऊन मला तेथील 'युनिव्हर्सिटी लायब्ररी'ही दाखविली. ती फार मोठी असून, तिच्यांत सर्व विषयांवरील पुस्तकांचा मोठाच भरणा आहे.

एका लहानशा बोटीमध्यें बसून, आम्ही स्वस्थपणें क्याम नदीवर गमतीनें फिरून आलों.तिच्या त्या दोहों बाजूच्या चित्रविचित्र तीरांमधील संथ पात्रावर आम्ही चाललों होतों, तो प्रसंग आम्हांला फारच मनोहर वाटत होता. एकीकडे हिरवीं चार शेतें, व दुसऱ्या तीरावर भव्य इमारती असून या दोहोंना जोडणारे असे मध्यंतरीं सुंदर व लहान लहान पूल लागले. या भागांत ही नदी फारच रम्य वाटते. या नदीचें पात्र जरी अगदीं उथळ असलें तरी, 'लॉक्स'–पात्रांतील उंचसखल भागांतून खालीं वर जातां येण्यासाठीं केलेल्या पाण्याच्या कवाडदार खोल्या–आणि 'वेअर्स'–बांध–यांच्या योगानें, लहान लहान होड्यांना सुद्धां, त्यांतून प्रशस्तपणें फिरण्याची सोई केलेली आहे.

इंग्लंडांतील एखादा 'कंट्री मॅनूशन्' किंवा श्रीमान् व सरदार लोकांच्या जमीनदारीवरील हवेली पाहण्याची मला फार इच्छा

होती.लॉर्ड व लेडी आयव्हे यांच्या आदरपूर्वक निमंत्रणावरून त्यांची ' एल्व्हडन् हॉल ' नांवाची हवेली पाहून येण्याची आम्हांला संधी मिळाली. हें ठिकाण थेट्फर्ड जवळ असून केंब्रिजपासून अदमासें तीस मैलांवर, आहे. तें मूळ पंजाबचे महाराज रणजीत सिंग, यांचे चिरंजीव महाराज धुलीपसिंग, यांच्यासाठीं सरकारानें विकत घेतलें होतें. पुढें लॉर्ड आयव्हे यांनीं ती हवेली विकत घेतली. त्याच्या भोंवतीं एक मनोहर राई व जंगल असून, तेथील रानांत शिकारी सावजांचा पुष्कळसा भरणा आहे. या मिळकतीचा विस्तार बराच मोठा आहे. तिच्यांत तीन खेडीं व पुष्कळशा शेतवाड्या आहेत. तेथील बागबगीचे फार शानदार व चतुराईनें तक्ते पाडून लावलेले आहेत. त्यांतील फुलें उमललेलीं असतांना त्यांचा देखावा फारच मजेदार व सुंदर दिसतो. तेथें जणों उत्तमोत्तम व गहिऱ्या रंगाचे झुबके किंवा पुंजच लागलेले भासतात. तेथें पक्षिगृह आहे तें, साऱ्या विलायतेमधील सुप्रसिद्ध खाजगी पक्षिगृहांपैकीं एक ह्मणून नांवाजलेलें आहे. तसेंच तेथें पृष्ठभागावर ' वॉटर लिलीज '—प्रफुल्ल कुमुदिनी—तरंगत असलेलें एक सरोवर असून, तें या महालाच्या आसमंतांतल्या भूभागामध्यें एक फारच रमणीय भाग आहे.

ही हवेली फार मोठी आहे. तेथें उत्तमोत्तम तसबिरी व चित्रें यांचा भारी मोठा संग्रह आहे. त्यांच्या किमतीच्या मानानें तो एक निधीच समजला पाहिजे. लॉर्ड आयव्हे यांना हरतऱ्हेच्या

दुर्मिळ व मौल्यवान कारागिरीच्या वस्तूंचा संग्रह करण्याचा मोठा शोक आहे. लंडनमधील त्यांचा वाडाही आह्मीं जाऊन पाहिला. त्यांत देखील प्राचीन चित्रकलापटूंच्या हातच्या कांहीं अत्युत्तम तसबिरी व चित्रें आहेत. एल्व्हडन् येथील लायब्ररी-मधील ग्रंथसग्रंह मोठा व सुरेखसा आहे. तेथील पाकशाळा, नोकरांच्या जागा व मद्य ठेवण्याचीं तळघरेंही आह्मीं पाहिलीं. या इमारतींतील सामानसुमानाची मांडणावळ प्रशंसा करण्या-सारखी असून तिची शृंगाररचना फार चतुराईनें केलेली आहे. इकडील पुष्कळ सुरेख व शानदार इमारती मीं पाहिल्या; पण या हवेलीच्या मालकानें तेथें एक नवा व मोठा दिवाणखाना बांध-विला आहे, त्याच्यांत उभा असतांना, माझ्या मनावर जसा परिणाम झाला, तसा इतर कोठेंही झाला नाहीं. त्या दिवाणखा-न्याचें काम शुद्ध संगमरवराचें व फारच नामी असून त्याच्यांत मला हिंदी व मुसलमानी अशा दोन्ही तऱ्हेच्या शिल्पकलेची बरीच झाक मिसळलेली आहे असें वाटलें, व आपण विलायतेंत नसून, आग्रा किंवा अहमदाबाद, येथील एखाद्या भव्य व बादशाही महालामध्यें आहों, अशी कल्पना सहज करतां येती. या महा-लाची बांधणूक, त्या दोन्ही शहरांतील प्राचीन इमारातींचे नमुन्यावरच रचलेली वाटते. कारण, तिच्यांत अहमदाबाद येथील बारीक व नाजूक कोरीव काम आणि आग्रा येथील भव्य व उठावदार काम, या दोहोंचाही सुरेख मिलाफ झालेला दिसतो.

लॉर्ड आयव्हे यांनीं कृपा करून आह्मांला सर्व महाल व बागबगीचा वगैरे नीट फिरून दाखविण्यासाठीं आपल्या सेक्रेटरीला सांगितलें होतें.त्यांनीं व त्यांच्या मनोहर कुटुंबानें आह्मांला सर्व तऱ्हेनें आराम मिळण्याविषयीं तसदी घेतली, आणि हा भव्य महाल व आसपासचा भाग यांचे फोटो दिले. या सफरीपासून आह्मांला अधिक आनंद वाटला; आणि माझे मित्र व सोबती क्याप्टन् ल्यांग यांच्या लेडी आयव्हे या आप्त असल्याच्या योगानें या ठिकाणीं आम्हीं जें कांहीं पाहिलें त्यापासून आमच्या अंतःकरणांत एक प्रकारच्या अभिमानाची स्फुर्तीही उत्पन्न झाली.

या व अशाच इतर भागांत मीं बऱ्याचशा सफरी केल्या व फिरलों. त्यांच्यांत विलायतेंतील बहुतेक जमीन खाजगी लोकांच्या मालकीची आहे, सरकारची नव्हे, ही गोष्ट माझ्या मनांत विशेष ठसली. हिंदुस्थानांतील बहुतेक भागांत याच्या उलट स्थिति आहे. इकडे या जमीनीच्या प्रत्येक तुकड्याभोंवतीं, बहुतकरून मालकांनीं कुंपण घातलेलें असतें. गांवच्या लोकांना खेळण्याकारितां व आराम घेण्यासाठीं उपयोगांत येणारी गांवठाणाची जमीन सुद्धां, गांवच्या लोकांच्या मालकीची असते. शेतीलायक जमिनीचा एवढासा तुकडासुद्धां कुंपणाशिवाय सांपडत नाहीं. खेड्यापाड्यांतील प्रत्येक गल्लीच्या दोन्ही बाजूंला हिरवींगार कुंपणें लागतात. तींही ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत. ज्या ठिकाणीं अशा प्रकारचीं

वाढतीं कुंपणें नाहींत, त्या ठिकाणीं त्यांच्याऐवजीं नुसत्या दग-डांचे गराडे घालतात. घोडे व इतर जनावरें, शेतामध्यें अगदीं मोकळेपणीं चरत असतात, यामुळें कुंपणें व 'स्टाईल्स'–कुंपणावरून येण्याजाण्याचे लांकडी मार्ग–यांची आवश्यकता असते. हिंदुस्थानांतील जमिनीची इतकी किंमत असती, किंवा शेतकरी व जमीनदार इकडच्याप्रमाणें आपल्या मिळकतीची काळजी घेणारे असते तर हीच तऱ्हा तिकडेही हल्लींपेक्षां अधिक प्रचारांत आली असती.

विलायतेंतील कांहीं थोर व ऐतिहासिक घराण्यांशीं माझा जो सहवास घडला, तेव्हांपासून वडिलार्जित स्थावर मिळकतीचे हिस्से होण्याची हिंदुस्थानांत कायद्यानें सवड ठेविली आहे, याच्या विरुद्ध माझा ग्रह असलेला दृढतर झाला आहे. राज्याचे ( संस्थानाचे ) हिस्से सरकार होऊं देत नाहीं, हें खरें. पण या वर्गांत येणारीं घराणीं फारच थोडीं. 'एन्टेल' किंवा मिळकत वारसा हक्कानें जाण्याबद्दलचा कायद्याचा नियम व तदनुरूप व्यवस्था व वहिवाट पूर्वीपासून तिकडेही चालू असती तर, मुबलक सामानसुमानानें सजविलेल्या अशा इतिहास-प्रसिद्ध हवेल्या आणि पूर्वजांच्या तसबिरी व कुटुंबांतील परंपरागत व अमोल वस्तूंचे संग्रह असणाऱ्या जमीनदारीवरील घरांनीं युक्त अशा मोठमोठ्या स्थावर मिळकतींची वाढ आमच्यांतही झाली असती. इतकेंच नव्हे तर, आमच्या देशांतही सरकारच्या व जनतेच्या सेवेला उपयोगी पडणारीं अशीं पुष्क-

ळशीं प्राचीन, श्रीमान् व वजनदार घराणीं कायम राहतीं. माझ्या सफरीमध्यें इतकीं कांहीं ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचीं व शेंकडो वर्षांचीं जुनीं घराणीं माझ्या पाहण्यांत आलीं कीं, यासंबंधांत तिकडील घराणदार व सरदार मंडळीचा मला हेवा वाटूं लागला. या पाश्चात्य दिग्भागांत येण्यापूर्वीं कांहीं इंग्रजी चालीरीतींविषयीं मला विशेष आदर वाटत नव्हता. पण त्यांच्या स्वाभाविक परिस्थितीमध्यें त्यांचा निकट परिचय झाल्यापासून मला त्या जास्त चांगल्या रीतीनें समजल्या व त्यांचें महत्त्व आणि उपयोग कळून येऊं लागले आहेत.

# भाग बारावा.

## सुंदर ' डेव्हन ' मध्यें.

ब्रिटिश बेटांतील इतर थोड्याच शहरांमध्यें टार्के-पेक्षां जास्त मोहकपणा आढळून येतो. साऱ्या इंग्लंडामध्यें पुष्कळचशा बाबतींत त्याची बरोबरी करणारें असें कांहीं नाहीं. डेव्हनशायरच्या किनाऱ्यावर दूर आंत गेलेल्या अनेक खाड्या आहेत. त्यांत विशेष आंत घुसलेल्या अशा एका खाडीवर अगदीं टोंकाला हें शहर झोंकदार वसलेलें असून, तेथें तें चित्रासारखें सुंदर दिसतें. उष्ण कटिबंधाकडून येणारा गरम वारा, अफाट अशा अटलांटिक महासागरावरून त्याच्यावर वाहात असतो. आणि या ठिकाणीं वाढणाऱ्या उष्ण कटिबंधांतील वनस्पतीवरून तेथील हवेचा सौम्यपणा व निरोगीपणा व्यक्त होतो. जवळचे आरक्तवर्ण भव्य पर्वत-भाग, समुद्रकांठचीं शानदार व विस्तीर्ण वाळवंटें, सुवर्णवर्ण सूर्यप्रकाशानें प्रकाशित अशा पांढऱ्या शुभ्र गच्च्यांचें सौंदर्य, मनोहर टेकडीच्या चकचकीत व हिरव्यागार अशा उतारावर

कोंदणांत जडलेल्या रत्नांसारख्या उपवनवाटिका व वसतिगृहें, आणि या सर्वांवर ताण करणारें समुद्र व आकाश यांचें अप्रतिम व अवर्णनीय वर्णवैचित्र्य, या सर्वांपासून माझ्या मनावर सृष्टिदेवतेच्या अद्वितीय रचनाचातुर्यासंबंधानें तत्काळ व उत्कृष्ट परिणाम झाला.

मी या विस्तीर्ण व उल्हासजनक देखाव्याचें निरीक्षण करीत होतों. पक्षिगणाच्या मधुर गीतांच्या ध्वनीची बहार माझ्या कानांवर पडत होती,—त्यांना हें स्थळ प्रतिनंदनवनच भासत असावें,—त्यावेळीं माझ्या मनानें आपोआप माझ्या स्वदेशाकडे भरारी मारली. मला माझ्या संस्थानांतील 'हिलस्टेशन'—उष्णकाळामधील हवा खाण्याच्या डोंगरावरील स्थळा—चें स्मरण देणारें असें सर्व इंग्लंडांत हें एकच ठिकाण होय. रस्किननें टार्के व आसपासचा भाग ह्मणजे, इंग्लंडांतील इटली, असें ह्मटलें आहे. व टेनिसननें त्याचे अंतःकरणपूर्वक गोडवे गाइले आहेत. पण टार्केच्या सौंदर्याच्या संबंधानें त्यास देण्यांत आलेल्या साऱ्या शिफारसपत्रांपैकीं एकही नेपोलियननें मनःपूर्वक काढलेल्या उद्गाराची बरोबरी करीत नाहीं. जें इंग्लंड पादाक्रांत करण्याची त्याची उमेद होती त्या देशांतील भूमीचें प्रथमदर्शन नेपोलियन यास झालें तें तो 'बेलारोफोन' जहाजावर कैदी असतांना याच भागाचें होय. टार्केचे हिरवेगार उतार या बंदिवान झालेल्या जुलमी राजानें आपल्या तीक्ष्ण दृष्टीनें न्याहाळून पाहात 'वाः, किती तरी शानदार व

रम्य स्थळ ! तेथें राहणें आपल्याला भारी प्रिय व आनंदाचें वाटेल.' असे उद्गार काढले होते, असें सांगतात.

हें शहर अलीकडेच वाढलेलें असून नाजूक प्रकृतीच्या लोकांना राहण्याला तें फार पसंत आहे. कारण, तेथील हवा-पाणी सौम्य व आरोग्यप्रद आहे. हिंवाळ्यांत उष्णतेचें मान ३६° अंशांखालीं जात नाहीं व उन्हाळ्यांत उष्णतेचें मान क्वचितच ७७° अंशांवर चढतें. समुद्रकांठची हवा खाण्याची जागा, व हिंदुस्थानांत उन्हाळ्यांत पहाडावर थंड हवेंत जाऊन राहण्याचीं स्थळें, या दोन्ही ठिकाणचे फायदे येथें एकत्र आढळतात. टार्के शहराची मांडणी मोठी मनोहर आहे. तेथें पुष्कळ सुंदर उपवनें असून त्यांतील मार्ग वृक्षच्छायेनें आच्छादित आहेत. तसेंच या बागांमध्यें चित्रविचित्र कुंड्या असून श्रांत मंडळीसाठीं बैठकीही ठेवलेल्या आहेत. ऐन समुद्रकांठीं असलेल्या कड्याच्या पायथ्याशीं एक उतारबंद मनोहर बगीचा आहे. तेथून समुद्राचा देखावा फारच शानदार दिसतो. आणि शांतपणें मनन करीत बसण्याला व कल्पनातुरंगांना मनसोक्त विहार करूं देण्याला येथें उत्तम सोय आहे. तसेंच तेथून खालच्या बाजूला रमणीय राजपथावर क्रीडा करणाऱ्या उल्हसित जनसमूहाचे स्वैरसंचार पाहण्याला सांपडतात. बंदरामध्यें किती तरी निरनिराळ्या तऱ्हेचीं तारवें दृष्टीस पडतात. तसेंच येथें दुसरें एक विशेष रमणीय असें स्थळ समुद्रतीरावर उत्तम जागीं बांधलेलें सुंदर क्रीडागृह हें होय. तेथें उत्तमोत्तम ह्मणून प्रसिद्धीस

आलेल्या नृत्यगायनपटु ' स्टार्स ' चे–तारागणांचे–जलसे वरचेवर होतात, व नाटकगृहांमध्यें सुप्रसिद्ध नाटकमंडळीकडून अगदीं नव्या नव्या नाटकांचे प्रयोग केले जातात.

ज्यांना स्वस्थपणा हवा, अशा शांत स्वभावाच्या मंडळीला मनोरंजन व ज्ञानप्राप्ति होण्याला येथील पदार्थसंग्रहालय चांगलें साधन आहे. त्याच्यांत पुष्कळशा वस्तू व्यवस्थित रीतीनें मांडून ठेविलेल्या आहेत. त्यांमध्यें केंटमधील गुंफेंत सांपडलेले 'फॉसिल्स'–अतिशय प्राचीन काळच्या प्राण्यांचे अश्मसार झालेले अवशेष–वगैरेही आहेत. तळमजल्यावर 'टार्के न्याचरल हिस्टरी सोसायटी'चें आफिस आणि लायब्ररी, हीं आहेत. इंग्लडामध्यें लहानसहान गांवांतून सुद्धां पुस्तकालयें व पदार्थसंग्रहालयें आहेत, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. प्राचीनवस्तु-विषयकज्ञानप्राप्तीसंबंधानें महत्त्वाच्या वस्तु जमवून, त्यांचें प्रदर्शन, त्यांच्या द्वारें स्थानिक ऐतिहासिक ज्ञानाचें संरक्षण, व त्याबरोबरच त्यांच्या विषयीं सार्वजनिक लोकमत व अभिरुचि यांना उत्तेजन देणें, या गोष्टींना अशा पदार्थ व पुस्तकसंग्रहा-लयांच्या द्वारें चांगली सवड होते.

मिस्टर अँड्रू कार्नेजी या कोट्याधीश गृहस्थाच्या औदार्यानें पुष्कळचशा गांवांना सुरेखशीं पुस्तकालयें मोफत मिळालीं आहेत. त्यांतच ही उदार देणगी टार्केच्या वांट्यालाही

आली आहे. येथील पुस्तकालयाची टापटीप व व्यवस्था फार चांगली आहे. ती पाहून माझ्या मनावर भारी चांगला परिणाम झाला. तेथील पुस्तकें 'कार्ड क्याटलाग'च्या तऱ्हेवर, सोईवार, व्यवस्थित व सुरेख रीतीनें लावून ठेवलेलीं आहेत. वर्तमानपत्रें ठेवण्याचीं मेजें उपयोग करणाऱ्यांना फार सोईचीं पडतात. अशा संस्थांची आवश्यकता हिंदुस्थानांतील लक्ष्मीपुत्रांच्या लक्षांत भरून, त्यांनीं आपल्या औदार्याचा ओघ देवालयें, घाट, अन्नछत्रें, यांच्याकडून फिरवून, अशा संस्थांकडे वळविला असता, तर आज आम्हां हिंदी लोकांनाही अशा पुस्तकालयांसंबंधानें फुशारकी मारतां आली असती. देवालयें, घाट वगैरेंचाही आपआपल्यापरी पुस्तकालयांइतकाच उपयोग आहे, नाहीं असें नाहीं. ऐहिक धर्मकृत्यांच्या कामीं हिंदुस्थान पूर्वीपासून मागसलेलें होतें व आहे. पण हल्लीं अशी वेळ आली आहे कीं, श्रीमान् लोकांचें औदार्य व सार्वजनिक हितासंबंधाची कळकळ यांच्यावर अशा प्रकारच्या शारीरिक व मानसिक उन्नति देणाऱ्या संस्थांचा दिवसेंदिवस अधिक हक्क पोंचत जावा, असें माझें आग्रहाचें ह्मणणें आहे.

माझ्या या सफरीमध्यें मला सर्व तऱ्हेचें साहाय्य करण्याला तयार व उत्सुक असे पुष्कळ गृहस्थ मिळत गेले, ही या माझ्या प्रवासांतील इतर अशाच आनंददायक अनुभवांपैकीं एक गोष्ट होय. परकी गृहस्थांना लागेल ती माहिती व मदत देण्याला, ते लोक तयार व उत्सुक असत. मी टार्के येथें

थोडेच दिवस राहिलों. तेवढ्यांतसुद्धां, सर्व तऱ्हेनें मदत देण्याला तयार अशा पुष्कळशा सद्‌गृहस्थांचा सुदैवानें मला परिचय झाला. तेथील ' असिस्टंट टौन क्लार्क' व सॉलिसिटर मिस्टर आल्मी हे माझ्याशीं विशेष सौजन्यानें वागले. इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या संबंधीं अनेक विचारार्ह विषयांवर भाषण करीत मीं त्यांच्याबरोबर अनेकदां तिसरे प्रहरचा वेळ मजेनें घालविला. ' बरो 'च्या स्थानिक कामाकाजाच्या व्यवस्थे-संबंधानें पक्कीशी माहिती हवी असल्याचें मीं त्यांना कळविलें, तसें त्यांनीं त्याबद्दलचा तपशीलवार गोषवारा—टाइपांनीं लिहिलेला—मजकडे पाठविण्याची तसदी घेतली. टार्के येथें आमचे दिवस आनंदांत व उपयुक्त माहिती मिळविण्यांत जावे, याविषयीं त्यांनीं शक्य तितकी तजवीज केली. त्यांच्या या साऱ्या परिश्रमांबद्दल मी येथें त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. तसेंच या बाबतींत मी ज्या दुसऱ्या एका गृहस्थाचा ऋणी आहें, त्याचें नांव मिस्तर रॉबर्ट्स् हें होय. त्यांनीं कृपा करून मला तेथील एका शाळेंत नेलें. तेथें आमचा काळ फारच मजेंत व फायद्याचा गेला. इकडील प्राथमिक शाळेंतील शिक्षणक्रमाची व्यवस्था तेथें त्यांनीं मला समजावून दिली व तेथें विद्यार्थी उपयोगांत आणीत असलेल्यापैकीं कांहीं पुस्तकें, शिक्षण-क्रमाच्या नमुन्यादाखल, त्यांनीं मला देऊन, स्वतःला अस-लेली व प्राप्त होण्याजोगी सारी माहितीही मिळवून दिली. या त्यांच्या मदतीचें मला फार महत्त्व वाटतें. सर्वच प्रेमानें वागून

मदत करीत होते, तेथें कांहींचींच नांवें घेणें ठीक नव्हे. तरी पण मुख्यत्वें या दोघांनीं जी विशेष मदत दिली व माझ्याशीं जें सौजन्याचें वर्तन केलें, त्यांबद्दल त्यांचे नामनिर्देशपूर्वक आभार न मानणें कृतज्ञतेला अनुसरून होणार नाहीं.

'समरी ज्यूरिस्डिक्शन'—संक्षिप्त चौकशीच्या पद्धती—नें निकाल करण्याचा अधिकार असलेल्या 'प्राव्हिन्शियल' कोर्टांतील काम पाहण्याची माझी इच्छा होती. मिस्टर आल्मी यांनीं मेहेरबानगी करून मला टार्के येथील 'बरो' कोर्टांत नेलें. तेथें 'जस्टिसेस् ऑफ् धि पीस' यांच्या पुढें मुकदम्यांची सुनावणी होत होती. ते लोक धंदेवाले कायदेपंडित नसून, हिंदुस्थानांतील 'ऑनररी म्याजिस्ट्रेटां'सारखे होते. जबान्या घेणें व भानगडीच्या कायद्याच्या प्रश्नासंबंधानें न्यायाधीशांना सल्ला देणें यासाठीं कोर्टांत पगारी कामदार होते. म्याजिस्ट्रेटांचा कल कायदेकानूच्या क्लिष्ट कोट्या व कूटें यांचा खल करण्याऐवजीं, खरी हकीकत कळवून घेण्याकडे अधिक होता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ज्याच्यामुळें सत्यान्वेषण बहुशः कठिण होतें, अशा कायद्याच्या लाक्षणिक शब्दावरच अधिक दृष्टि देण्याकडे हिंदुस्थानांतील कोर्टांचा झोंक असतो किंवा कसें, हें सांगण्यासारख्या स्थितींत मी नाहीं. येथें न्यायाधीश, वकील व साक्षीदार यांचा प्रयत्न, घडलेल्या गोष्टीची खरी माहिती मिळविण्याचाच दिसत होता. आणि कायद्यांतील तजविजी म्हणजे सत्यान्वेषणाचें साधन आहेत, त्याच साध्य

वस्तु नव्हेत, हें पुर्तेपणीं लक्षांत ठेवून कोर्ट वागत होतें; हें स्पष्ट दिसत होतें. कोर्टांतून आह्मी कच्च्या कैद्यांच्या कारागृहाकडे गेलों. तेथील व्यवस्था व सफाई हिंदुस्थानांतील मोठ्या शहरांतील तुरुंगांतल्या इतपत चांगली होती. त्यावेळीं तेथें चौकशी व्हावयाचा एकच कैदी होता. त्याच्यावर एक बायको जिवंत असून दुसरी केल्याचा आरोप होता.

इंग्रजी प्राथमिक शाळा मीं प्रथम येथेंच पाहिली. तेव्हां अंत:स्थ व्यवस्था व सामानसुमान, यांच्या संबंधांत या शाळेची स्थिति, हिंदुस्थानांतील राजकुमार कॉलेज्यांतल्यापेक्षांही चांगली होती ,असें माझ्या तात्काल नजरेस आलें. मुलांना पुस्तकें, पेन्सिली, कागद, इत्यादि हव्या त्या वस्तू पुरविल्या जात होत्या. हिंदुस्थानांत या बाबतींत भारी उणीव दिसून येते. शिक्षक लोक मुलांना धडे समजावून देण्यांत विशेष काळजी व कळकळ दाखवीत होते. त्याचा माझ्या मनावर चांगला परिणाम झाला. तेथील उत्साहयुक्त व कळकळीची परिस्थिति पाहून मला चमत्कार वाटला, आणि समाधान झालें. प्रश्नांचीं उत्तरें देण्याची पाळी येण्याची, विद्यार्थी उत्सुकतेनें वाट पहात होते. तें पाहून मला संतोष वाटला. हिंदुस्थानांत मुलांच्या मनांत पंतोजीविषयीं भारी भीति असते. तिचा येथें मागमूस नव्हता. शाळेची जागा शक्य तेवढी आनंददायक व मनोहर केलेली असून, मुलांच्या उल्हसित चर्येवरून त्यांना शाळेंत राहण्यांत आनंद वाटत होता, असें

स्पष्ट दिसत होतें. त्यांना व्यावहारिक विषयांसंबंधानें सर्वसाधारण दिलें जाणाऱ्या शिक्षणाचें प्रमाण आश्चर्यकारक होतें. त्याच्या मनांत स्वदेशप्रीति, उत्तम नागरिकपणा, राजभक्ति व सेवा, यांचीं मूलतत्त्वें भरून दिलीं जात होतीं. तसेंच त्यांचे हक्क व त्यांचीं कर्तव्यकर्मे यांची जाणीवही करून दिली जात होती. येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, ही शाळा साऱ्या इंग्लंडांतील नांवाजलेल्या शाळांपैकींही एक असल्याबद्दल तिची प्रसिद्धि आहे.

ब्रिटिश आरमारांतील लढाऊ गलबतांना नांगर टाकण्याची टार्के ही एक आवडती जागा आहे. त्याच्या खाडींत मोठमोठीं लढाऊ गलबतें, क्रूझरें, बुडून चालणाऱ्या बोटी, एकेक दोनदोन दिवस पडून राहिलेल्या दिसून येतात. एकदां आम्ही ‘ सफोक् ’ नांवाची ध्वजनौका पाहण्यास गेलों होतों. त्यावरील अडमिरल् लंडनला गेलेले होते. तरी सारें गलबत आह्मांला मोठ्या सभ्य रीतीनें व नीट फिरवून दाखविण्यांत आलें. तें खरोखरच एक तरता जलदुर्ग होतें. आम्हीं मुंबईस ‘ गनबोटी’—लहानशीं लढाऊ गलबतें—पाहिलीं होतीं.सबब, येथील प्रकार आम्हांला अगदींच नवा होता असें नाहीं. आह्मीं त्यांच्यांतील निरनिराळ्या ‘केबिनी’ व ‘सलून्स’—खोल्या व दिवाणखाने—खुद्द ॲडमिरलच्या सलूनसुद्धां पाहिल्या. तसेंच तोफा व त्या किती सहजपणें सज्ज करून डागल्या जाऊं शकतात, तेंही आह्मांला दाखविण्यांत आलें. या तोफा पुष्क-

ळच मोठ्या होत्या तरी, त्या आरमारांतील सर्वांत मोठ्या तोफांच्या निदर्शक होत्या असें नाहीं. तसेंच आह्मी 'हिज् म्याजेस्टीज स्टीमशिप' 'मेडस्टन' व त्याच्या पोटांतील एक 'सबमरीन'–बुडून चालणारी बोट–पाहिली. आह्मीं आजवर, अलीकडील 'सबमरीन' पाहिली नव्हती. यामुळें या सफरीचें पुष्कळच कौतुक वाटलें. या जहाजाचा त्याच्या पोटांतील सात 'सबमरीन'वर ताबा असून त्याच्या वरचीं सारीं माणसें तेथें राहण्याची सोय असते. तसेंच या गलबताच्या ताब्यांत असणाऱ्या बोटींच्या दुरुस्तीला लागणाऱ्या सर्व सामानसुमानानें सज्ज असा कारखाना या तरत्या जहाजावर असून या घातक यंत्रांना लागणारा दारूगोळा आणि सर्वांसाठीं खाण्यापिण्याचे जिन्नस, यांचा भरपूर पुरवठा, केलेला असतो. यंत्रें व तत्संबंधीं इतर सामान यांची 'सबमरीन' मध्यें इतकी कांहीं खेंचाखेंच असते कीं, तेथें काम करणाऱ्यांना हातपाय पसरण्यास किंवा ताठ उभे राहून चालण्यापुरतीसुद्धां जागा नसते. 'टार्पेडो' बसविण्याची व ती बाहेर उडविण्याची जागाही आह्मीं पाहिली. ती बोट पाण्यांत बुडून चाललेली असतांना, दूरवरचा भाग स्पष्ट पाहतां येण्यासाठीं एक दुर्बीण असते, तीही आह्मीं पाहिली. खरोखर या ठिकाणीं रचनाचातुर्यानें जेवढ्या ह्मणून सुधारणा आधुनिक यंत्रशास्त्रामध्यें घडवून आणलेल्या आहेत, त्या सर्व एका लहानशा बोटींत एकवटलेल्या दृष्टीस पडतात व त्यांच्या साहाय्यानें समुद्रावर फिरत रहाणारें केवढेंही मोठें गलबत क्षणार्धांत रसातळास पोहोंचवितां येतें.

आजकाल प्राणघात करण्याच्या कामीं येणाऱ्या हरतऱ्हेच्या साधनांवर किती तरी चातुर्य व परिश्रम खर्च होताहेत, याचा विचार मनांत येऊन, भारी वाईट वाटतें. पण सध्यांच्या परिस्थितींत असें होणें अपरिहार्य आहे. कारण, या कामीं अतोनात खस्त खावी लागत आहे, हें खरें. तरी या सर्व नाशकारक शस्त्रांच्या तयारीचा अंतिम हेतु शांतता व स्वस्थता कायम राखण्याचा असल्यानें, राष्ट्रीय संरक्षणाला त्यांची अत्यंत आवश्यकता आहे. मनुष्यस्वभावच असा आहे कीं, प्रसंग पडल्यास दोन हात करण्याची तयारी असल्याशिवाय कोणत्याही मोठ्या राष्ट्राला शांतता राखण्याची आशा करणें व्यर्थ आहे.

टॉर्कच्या जवळपासच्या कांहीं शेतवाड्या व मळे पाहून येण्यामध्यें एके दिवशीं तिसऱ्या प्रहराचा काळ आम्हीं मोठ्या मजेनें काढला. इकडील शेतकरी–जमीनदार–चांगले सधन, हिंदुस्थानांतील लहानसहान इनामदारांसारखे आहेत. ते नियमानें वर्तमानपत्रें वाचतात, आणि साऱ्या देशभर शेतकीमध्यें चाललेल्या सुधारणासंबंधानें चांगली माहिती करून घेतात. ते आसपासच्या भागांतील निवडणुकीमध्येंही भाग घेतात, व राजकीय बाबतींत स्वतंत्रपणें आपलीं मतें ठरवूं शकतात. त्यांची लोकांमध्यें चांगली मान्यता असते. निवळ व्यापारधंदा करणारांपेक्षां सामाजिक बाबतींत त्यांची योग्यता बरीच वरिष्ठ प्रतीची समजली जाते.

आह्मीं पाहिलेल्यांपैकी एक शेतवाडी सुमारें दोनशें एकरांची होती. आम्हांला प्रथमच मालकाचें घर, मेहेरबानगी करून, फिरवून दाखविण्यांत आलें. त्यांतील प्रत्येक वस्तु ठाकठिकीची व साफ होती; आणि सामानसुमान व शोभेच्या वस्तू, यांच्या संबंधांत, हें साधारण प्रतीचें घरसुद्धां, हिंदुस्थानांतील पुष्कळशा श्रीमंत लोकांच्या वाडयांपेक्षां अधिक चांगलें होतें. शेतावर काम करणाऱ्या मजुरांची सुद्धां येथेंच चांगली राहण्यासवरण्याची सोई केलेली आहे. शेतांत निरनिराळ्या भागांत फिरून येत असतांना मालकानें आम्हांला, इकडील शेतीभातीविषयीं पुष्कळ उपयुक्त व मनोरंजक माहिती सांगितली. इकडे अर्ध्या जमिनींतून पिकें घेतात व अर्ध्यांत गुरें चारतात, आणि हिंवाळ्यांत गुरांना लागणारा चारा पैदा करितात. हा जमीनदार तीन वर्षांच्या फेरपालटीनें पिकें घेण्याची तऱ्हा पसंत करितो. गहूं किंवा 'ओट्स,' 'बार्ली'-जव—आणि 'म्यांगोल्डस्' अथवा 'टर्निप्स्' आणि चारा अशीं तीन पिकें फेरपाळीनें घेत असतो. इकडे जमिनींत खत फारच घालतात. एकरामागें गोठ्यांतलें खत २०टन (सुमारें४०गाडया) इतकें सुद्धां आणि सुपीकता आणणारें चुना किंवा हाडाचें खत दीडपासून अडीच टन ( सुमारें तीनपासून पांच गाड्या ) पर्यंत घालतात. हिंदुस्थानांत गोठ्यांतलें खत उपयोगांत आणण्यापूर्वी वर्षभर किंवा अधिकच कुजवावें लागतें; पण इकडील जमिनीच्या स्थितीमुळें, तें एकदम शेतांत टाकून, नांगरून

मातींत मिसळवितां येतें. बहुतेक शेतकरी, गाई, डुकरें, कोंबडीं बाळगितात व तीं पुष्ट करून विकतात. त्यांच्यापासून त्यांना चांगलाच नफा होतो. डुकरें व कोंबडीं पाळण्याला विशेष खर्च पडत नाहीं. इकडील गाई विशेष मोठ्या आहेत, असें नाहीं; तरी त्या रोज सरासरीनें पंधरा वीस पौंड (साडेसात ते दहा शेर) दूध देतात. या शेतकऱ्याच्या सुमारें २५ गाई आहेत. त्यांच्यापासून निघालेल्या दुधाची साय व लोणी, शक्य तितकें विकून, बाकीचें दूध तो डुकरांना घालतो. डेव्हनशायरमधील गाई दुधाला फार चांगल्या, अशी प्रसिद्धि आहे. तिकडील 'क्रीम'—साय—साऱ्या इंग्लंडांत अति उत्तम असल्याबद्दल ख्याति आहे. ती आपल्याकडील मलईसारखी असते.

त्याच दिवशीं आह्मी एका गुरें पैदा करण्याच्या शेतवाडीलाही जाऊन आलों. तेथें इंग्लंडांतील अतिउत्तम जातवंत पैकीं ४२ गाई होत्या. त्या पूर्वी पाहिलेल्यापेक्षां पुष्कळच मोठ्या असून, रोज सुमारें तीसपासून पन्नास पौंड (पंधरापासून पंचवीस शेर) व कांहीं तर सत्तर पौंड (पस्तीस शेर) दूध देतात! त्यांचा खुराक प्रत्यहीं पांच पौंड दाणा व खातील तितकें वाळलेलें गवत. येथील पैदायषीचा खोंड ह्मणजे एक अजस्त्र मांसपिंडच. त्याच्या त्या भारीच पुष्ट शरीराला त्याचे लहानसे चार पाय, कांठ्या टोंचल्यासारखे दिसत होते. त्याची लांबी बारा फूट व वजन दीड टन (दोन खंडी) होतें ह्मणतात. त्याला रोज शंभर पौंड (पन्नास शेर) 'म्यांगोल्ड' लागत. हीं जनावरें

फारच उग्र व तापट असतात; म्हणून त्यांना स्वतंत्र वाडग्यांत एकीकडे ठेवतात. खोंड अकरा वर्षांचा होईपर्यंतच त्याचा उपयोग करितात व त्यांना कमी वयांतच कामीं आणतात, असें या शेतकऱ्यानें सांगितलें. जनावरें विकावयाला पाठविण्यापूर्वी त्यांना पुष्ट करण्याची जागाही आह्मीं पाहिली. यांत पुष्ट करण्याला चार महिने लागतात व प्रत्येक गुरामागें सुमारें एक पौंड महिना खर्च पडतो. सुमारें अठरा हंड्रेडवेट वजन (चोवीस मण) असलेलें गुरूं चांगलें पोसलें तर, बाहेर पडतांना सुमारें ३१ हंड्रेडवेट (बेचाळीस मण) भरतें.

नंतर आह्मीं याहून एक मोठी शेतवाडी आश्बर्टनजवळ पाहिली. शेतकीसंबंधीं सर्व माहिती तेथील मालकाच्या जिव्हाग्रीं होती. त्याच्या सहवासांत आमचा वेळ मजेदार व आनंदांत गेला. त्यानें, शेतांतील लहानसहान दगड (गुंड) वेचून काढवूं नयेत, कारण त्याच्या योगानें जमिनींत ओलावा राहण्याला मदत होते, हा एक उपयुक्त माहितीचा चुटका आम्हांला सांगितला. 'ओटस्'च्या पिकाला तो दर एकरीं सारें पंधरा टन गोठ्यांतलें खत घालतो, व 'म्यांगोल्ड्स्' साठीं हाडाचें खत अर्धे टन. तेंच गवती जमिनीला पांचपासून दहा टन खत लागतें. साध्या गवतापेक्षां हाडांचें खत घातलेल्या कुरणांतील गवतावर पोसलेलीं गुरें अधिक मजबूत असतात, असा त्याचा अनुभव आहे. एकाच खोंडापासून झालेल्या पैदासींत पुन्हां त्याच्याच प्रजोत्पादनाचा उप-

योग न व्हावा म्हणून एकच खोंड तो तीन वर्षांवर कामीं आणीत नाहीं. त्या शेताच्या निरनिराळ्या भागांत आह्मी फिरून आलों; व शेतकीचीं अवजारें वगैरे ठेवलेलीं 'शेड्स'–छपरें–पाहिलीं; आणि सर्व अवजारें, गाड्या, घोडे व एक ' ऑइल एन्जिन ' वगैरे सुद्धां, अशा तऱ्हेची शेतवाडी नवी चालू करण्याला, एकंदर खर्च काय पडेल, ह्मणून त्याला आह्मीं विचारिलें. तेव्हां सुमारें अडीचशें एकरांच्या शेतवाडीला घोड्यांशिवाय तीनशें व घोड्यांसुद्धां पांचशें पौंड ( सुमारें चार हजार पांचशें व साडेसात हजार रुपये ) खर्च यावा, असें त्यानें सांगितलें. यापूर्वी आह्मीं दुसऱ्या एका शेतकऱ्याला हाच प्रश्न केला होता. त्यानें सुमारें सहाशें एकरांची नवी शेतवाडी चालू करण्याला, नऊशें पासून हजार पौंड ( साडेतेरा ते पंधरा हजार रुपये)खर्च पडेल, असें सांगितलें होतें. आह्मीं पाहिलेल्या प्रत्येक शेतवाडीमध्यें, कुत्रे काळजीपूर्वक पाळलेले असून त्यांची आपल्या धन्यांवर फार प्रीति असल्याचें दिसलें. हे प्राणी फार इमानी असून घरादाराच्या आसपास ते खरोखर चांगलीच राखण करितात.

या शेतवाडींतील दुसरी एक गोष्ट आमच्या लक्षांत विशेषेंकरून आल्याशिवाय राहिली नाहीं. ती ही कीं, या शेतवाडींत शेतकरी लोकांच्या बायकांचें महत्त्व विशेष आहे. त्यांच्याकडून त्यांना घरचें व शेतीवाडीचें विशेषतः हिशेब ठेवण्याचे व इतर लिहिण्याचे कामांत किती तरी

उपयोग होतो. कारण, त्या सुशिक्षित असल्यामुळें त्यांना हें काम सहज व चांगलें करतां येतें. हिंदी शेतकऱ्यांच्या बायका शेतात हलकें सलकें अगर मेहनतीचें काम करून मदत करितात; पण लिहिण्यासवरण्याच्या कामीं त्याची मदत होत नाहीं. येथें नवरा-बायको दोघेंही उद्योगधंदा व व्यवहार यामध्यें अत्यंत हुषार व दक्ष असल्यामुळें, श्रमविभाग सुरेख व फायदेशीर होतो; आणि घरदार व गृहकृत्यें यांची देखरेख व शेतवाडीचें कारकुनी काम बायकांकडे सोंपविलेलें असतें. स्त्री पुरुष, दोघांच्याही शिक्षणासंबंधानें समता राखल्याचा हा एक चांगला परिणाम आहे.

टार्के येथें असतांना मी कांहीं गृहस्थांच्या घरीं भेटीला गेलों होतों. त्यावेळीं पाहण्यांत आलेल्या परिस्थितीवरून, इंग्रज लोकांच्या कौटुंबिक स्थितीसंबंधीं मला अधिक स्पष्ट कल्पना आली. समाजामध्यें पुरुषांपेक्षां स्त्रियांकडेच अधिक महत्वाचा कार्यभाग असतो, हें माझ्या ध्यानांत आलें. तेथें स्त्रिया व पुरुष एकमेकांत मोकळेपणीं मिसळतात आणि उभयतांचें शिक्षण व ज्ञान, बहुतेक सारखेंच असल्यानें, कौटुंबिक व सामाजिक जीवन हिंदुस्थानांतल्यापेक्षां किती तरी सुखासमाधानाचें व उपभोगक्षम असतें. इंग्लिश स्त्रियांची ज्ञानसंपन्नता व तदनुरूप वर्तन प्राच्य देशीयांच्या मनांत विशेष जोरानें भरतें. त्या स्त्रिया संभाषण चालविण्याच्या कामीं विशेष चतुर असतात. नित्याच्या व्यवहाराच्या बाबतींत, त्यांचें परि-

ज्ञान, आस्था व विचार, चांगले असतात. त्यांना गातां येतें. पियानो वाजवून मनोरंजन करतां येतें. शिवाय, पुष्कळशा बायका चित्रें काढणें वगैरे कलांमध्येंही निपुण असतात. त्यांच्या या गुणांच्या योगानें कौटुंबिक सुस्थिति व गृहसुख यांमध्यें पुष्कळच भर पडते.

टार्के येथें मीं थोडे दिवस 'म्यासेज' ( मालीश )–अंग रगडून घेण्याचा डॉक्तरी उपचार–चा अनुभव घेतला. त्याचें आजकाल एक शास्त्रच बनलें आहे. दुखण्यांतून नुकत्याच उठलेल्या, व्यायाम करण्याला असमर्थ, अशा अशक्त लोकांना तो फायदेशीर होतो. हा उपचार ठरलेल्या जागींच दिला जातो. त्याचें उत्तम शिक्षण पावून 'डिप्लोमा' ( सर्टिफिकीटें ) मिळालेल्या स्त्रिया, त्या जागीं हजर असतात. आजाऱ्याच्या घरीं जाऊनही हवा तर हा उपचार करतात. ही कला आपल्या प्राच्य देशांत बहुतेक पूर्णावस्थेला पोहोंचली आहे, आणि या बाबतींत प्राच्य देशीयांकडून आपण पुष्कळ शिकलों आहों, असें इकडील इंग्रज लोक कबूल करितात.

टार्केपासून दीड मैलावर 'धि केंट केव्ह' नांवाची एक चुनखडीच्या दगडांतील गुहा आहे. ती अवश्य पाहण्याजोगी आहे. तिची लांबी पाव मैलाहून थोडी अधिक, व उंची पांचपासून वीस फुटांपर्यंत आहे. तेथें असलेला वाटाड्या पाहणारांना गुहेचा आंतील भाग चांगला दिसावा म्हणून मेणबत्त्या आणून लावून देतो, व महत्त्वाचीं स्थळें दाखवून त्यांच्या विषयीं

माहिती सांगतो. भूगर्भशास्त्रज्ञ व इतर शास्त्रवेत्ते, यांनीं या गुहेंत काळजीपूर्वक खोदवून पाहिलें आहे. तिच्यांतील 'स्टालाग्माइट्'–चुन्याचें पाणी पडून, वाळून, चुनखडीचे पुष्कळच जाड थर बसून झालेली जमीन–इच्या खालीं आस्वलें, सिंह, गेंडे, इत्यादिकांचे अवशेष, आणि अगदीं प्राथमिक काळीं वापरण्यांत असलेलीं गारेचीं हत्यारें, व लांकडी कोळसा, वगैरे जिन्नस आढळून आले आहेत. त्यांच्यावरून मनुष्याच्या प्राचीनत्वाची साक्ष पटते. असल्या गुहांपासून शास्त्रज्ञ मंडळींच्या शोधाला किती उपयोग होतो, हें समजून घेणें गमतीचें असतें. अनेक युगांपूर्वींच्या माणसांनीं हत्यारें म्हणून उपयोगांत आणलेल्या गारेच्या तुकड्यांवरून, ते त्यांनीं केव्हां कामीं आणले असतील, हें ठरविण्याला साधन होतें. तसेंच त्या 'स्टालागमाइट्'च्या स्तंभाच्या वाढीवरून तज्ञ गृहस्थांना, मनुष्यप्राण्याचा इतिहास व त्याच्या चालीरीती, यांचें ज्ञान होण्याला मदत होते आणि असल्या गुहांमध्यें मनुष्यप्राणी किती काळापूर्वीं राहत होता, तें बहुतेक नक्की ठरविण्याला सांपडतें. या गुहेंतील 'स्टालागमाईट्' च्या स्तंभाइतका मोठा स्तंभ साऱ्या दुनियेंत इतर कोठें नाहीं, असें समजलें जातें. या स्तंभावर विवक्षित स्थळीं एक खूण करतात. पुढें कांहीं ठरीव काल–उदाहरणार्थ दहा वर्षें–गेल्यानंतर, त्याच्यांत झालेली वाढ पाहून, तिच्यावरून, तो हल्लीं आहे तितका उंच होण्याला किती शतकें लागलीं असतील, त्याचा हिशेब बसवितात.

अशा तऱ्हेच्या शास्त्रीय शोधांचे निर्णय प्रत्यक्ष पाहून, ज्ञानार्जन, तसेंच करमणूक, करून घेण्याची सुलभ संधी बहुजनसमाजाला मिळते, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. अशीं स्थळें पाहण्याला मोकळीं ठेवल्यानें व तेथील माहिती करून देण्याला मार्गदर्शक नेमल्यानें, एकाद्या वाटसराला सुद्धां त्यांचा उपयोग करून, त्यांच्यांतील तत्त्वें सहज समजून घेण्याला व त्यापासून मिळणारें शिक्षण प्राप्त करून घेण्याला सवड सांपडते. हिंदुस्थानांत अशा गुहा पुष्कळशा आहेत. त्यांच्यापासून किती तरी नवीन शोध लागण्यासारखे आहेत. पण तज्ञ व नवीन शोध लावणाऱ्या मंडळीचें तिकडे लक्ष जात नाहीं, हें आमचें कमनशीब होय. अद्यापि अशा गुहांचें संशोधन झालेलें नाहीं. याविषयींचा दोष तरी, पुष्कळ अंशीं आमच्यावरच आहे. या आमच्या गुहांची सुद्धां शास्त्रीय रीत्या तपासणी केली गेली तर, त्यांच्यापासून सृष्टिसंबंधाच्या वास्तविक ज्ञानामध्यें पुष्कळच भर पडेल, अशी मला खात्री वाटते.

टार्कपासून जवळपासच्या रम्य स्थळांचें दर्शन घेऊन येण्यासाठीं पुष्कळशा सफरी करतां येण्यासारख्या आहेत. अशी एक मोटारमधून करतां येण्याजोगी मजेदार, व रमणीय, आणि त्यापासून होणारा त्रास व परिश्रम यांची पुर्ती भरपाई करणारी सफर ‘ टिनमथ् ’ व पुढें ‘ एक्झीटर ’ पर्यंत जाऊन येण्याची आहे. ‘ बॅबकोंब ’ जवळ समुद्राचें एक सुरेखसें वळण आलेलें आहे. तेथील देखावा उग्र व अधिक

जंगली तऱ्हेचा असून तो मनाला हवा तसा पसंत पडण्याजोगा आहे. समुद्रकांठचें पांढरें फटफटीत वाळवंट, निळें पाणी, पहाडांचे ताम्रवर्ण कडपे, व हिरवेगर्द वृक्षगण, असे अनेक रंगांचें युगपत् मिश्रण होऊन झालेला देखावा, मोठा बहारीचा असतो. येथूनच ऑडिकोंब्च्या समुद्रतीरच्या वाळवंटावर जाण्याचा भारी सुरेख नागमोडी रस्त्याचा मजेदार देखावा दृष्टीस पडतो. पुढील वाट टेंकड्या व खोरीं यांच्या मधून जाते. त्यावरून जागजागीं समुद्राचा विस्तीर्ण देखावाही दुरून दिसत राहतो, तो अवर्णनीय—केवळ चित्रासारखा—भासतो. टिनमथ् हें एक सुंदर व आरोग्यवृद्धि करणाऱ्या पाण्याचें स्थळ आहे. उन्हाळ्यांत दुसरीकडे राहण्यास जाणाऱ्या बऱ्याच लोकांना तें फार प्रिय आहे. डॉलिश् हें लहानसें गांव जवळच आहे. तेथें समुद्रस्नानाची व्यवस्था चांगली असते. येथून पुढें कांहीं मैलांवर एक्झीटर आहे.

हें फार प्राचीन शहर रोमन लोकांच्या वेळीं वसलेलें असून, तें डेव्हनशायरचें मुख्य ठाणें आहे. येथील गिल्डहॉलची इमारत साऱ्या ग्रेट ब्रिटन मधील प्राचीन म्युनिसिपल इमारतींपैकीं एक आहे. ती अवश्य पाहावी. तेथील ‘ सिटि आर्म्स, ’ ‘ मेयर ’चे पोषाख, भालदारकाठी व इतर सुरेख व चमत्कारिक चिजा, एका तावदानें लावलेल्या कपाटांत ठेवलेल्या आहेत. दरवाजा ओक लांकडाचा असून, त्याच्यावर सुरेख कोरीव काम केलेलें आहे व ती इमारत दाखविणारा तो दरवाजा

मोठ्या अभिमानपूर्वक दाखवितो. तेथील 'क्याथीड्रल' बाराव्या शतकांतलें आहे. त्याचा पश्चिमेकडील मोहरा फारच भव्य व अप्रतिम सुरेख, ह्मणून प्रसिद्ध आहे. त्या शहरांत कॉलेजें, लायब्रऱ्या, चित्रकलाप्रदर्शनें, पदार्थसंग्रहालयें इत्यादिकांची चांगली समृद्धि आहे. तेथील बगीचे फारच शानदार स्थितींत ठेवले आहेत. शिवाय, तेथें असलेल्या जुन्या व पडक्या किल्ल्याच्या अवशिष्ट भागांमुळें या शहराला बराच मनोहरपणा आला आहे.

येथून प्रिन्सटौन्‌ची सफर सहज व चांगली करून येतां येते. तिकडे जाण्याचा रस्ता पाणथळ व जंगली प्रदेशांतून असून, तेथें विलायतेंतील मुख्य सदर तुरुंग आहे. तो त्या पाणथळ रानाच्या मध्यभागीं एका टेकडीवर बांधलेला आहे. त्याच्या आंत पाहण्यास जाण्याला कोणालाही परवानगी मिळत नाहीं. सबब, या उग्रस्वरूपी इमारतीला गाडींतूनच एक प्रदक्षिणा घालून परत यावें लागलें. जवळच्या शेतजमीनींत कांहीं कैदी काम करीत होते, ते आह्मीं पाहिले. त्यांच्यावर पाहारेवाले, भरलेल्या बंदुका घेऊन खडा पाहरा करीत होते. त्या कैद्यांचे केस डोईबरोबर कापलेले होते, व त्यांच्या अंगावर तीराच्या टोकांचे छाप असलेले विवक्षित तऱ्हेचे कपडे होते. ते आह्मांला भारी विलक्षण दिसले. येथून कैदी निसटून जाणें फारच कठिण व धोक्याचें आहे. या तुरुंगाभोंवतीं टेहळणीसाठीं बुरूज बांधलेले असून, त्यांच्यावरून दूरवर नजर पोहों-

चते. यामुळें येथून पळून जाण्याचा धोका अधिकच वाढलेला आहे. येथून कैदी पार निसटून गेल्याचीं उदाहरणें फारच क्वचित् आहेत, हें निराळें सांगावयाला नकोच.

आणखी एके दिवशीं तिसरे प्रहरीं आह्मी पेंटन्‌ला जाऊन आलों. ही सफरही मोठी मजेची झाली. त्या दिवशीं तेथें कांहीं मनोहर उत्सव सुरू होता. असे उत्सव इकडे बहुतेक सर्व ठिकाणीं उन्हाळ्यामध्यें होत असतात. हिंदुस्थानांत वेळोवेळीं यात्रा व मेळे भरतात, त्या व या उत्सवांमध्यें बरेंचसें साम्य नसतें असें नाहीं. त्यांच्यांत सर्व तऱ्हेच्या खेळतमाशांची व्यवस्था असते, व तेथें मजा मारण्यास येणाऱ्या हौशी लोकांच्या करमणुकीसाठीं अनेक तऱ्हेच्या किरकोळ गोष्टीही असतात. तेथील चैनी व मजेनें फिरत राहणारा जनसम्मर्द फारच प्रेक्षणीय वाटतो. अशा प्रसंगीं पार्लमेंटचे मेंबर मतदारांचा विशेष परिचय करून घेण्याची संधि साधतात. येथील मेळ्यामध्यें 'युनियनिस्ट' पक्षानें त्या दिवशीं एक जलसा केला होता. त्यांत क्याप्टन क्रेग, एम्. पी. व कर्नल बर्न, एम्. पी., यांनीं 'आयरिश् होमरूल'—आयर्लंडांतील स्वराज्या—वर व्याख्यानें दिलीं. आजकाल या अतिशय महत्त्वाच्या प्रश्नाकडे सर्वांचें लक्ष प्रमुखतेनें वेधलेलें आहे. त्यांचीं भाषणें फारच जोरदार होतीं. त्यांनीं वापरलेली भाषा हिंदुस्थानांतील 'एक्स्ट्रीमिस्ट'—जहाल—पक्षाचे लोक स्वप्नांतसुद्धां बहुधा उपयोगांत आणणार नाहींत, इतकी कडक होती. तथापि श्रोतृसमाज

असलीं भाषणें ऐकण्याला पुरा निर्ढावलेला होता, असें दिसलें; आणि तीं भाषणें त्यांच्या नित्यपरिचयांतलीं असल्यामुळें त्यांतील शब्द अतिशय जोरदार होते तरी, ते योजण्याचा वक्त्याचा उद्देश, व त्यांचा तीक्ष्णपणा, पुष्कळ अंशानें वायफळ समजला जात होता, हें स्पष्ट दिसत होतें. कर्नल बर्न हिंदुस्थानांत जाऊन आलेले असल्यानें त्यांनीं मला पाहातांच, मी तिकडचा आहें, असें चटदिशीं ताडलें, व ते मेहरबानगी करून स्वतःच मजकडे येऊन कांहीं वेळ बोलत राहिले होते.

टॉट्नेला डार्ट नदीच्या मार्गानें आगबोटींतून जाऊन येण्याची सफरही, मला फार पसंत वाटली. ही नदी इंग्लंडांतील ऱ्हाईन अशी संबोधिली जात असून, ती सुरेख हिरव्या गर्द टेंकड्या व छायादार वनभूमी यांच्या मधून वाहते. तिच्या त्या शांत व रमणीय पृष्ठभागावर गेलेला काळ फारच मजेदार वाटला. तरी पण माझ्या पूर्वजांच्या जन्मभूमींतील—कोंकणांतील—सृष्टिसौंदर्य, तेथील आंबा, फणस वगैरे सुंदर झाडें, व जागजागीं थाटदार ताडमाड वगैरे झाडांनीं भूषित केलेले खडबडीत समुद्राचे कांठ, इत्यादिकांच्या अप्रतिम देखाव्याबद्दल मला अधिक पक्षपात वाटतो. याबद्दल मला माझे विलायतेंतील मित्र क्षमा करतील अशी उमेद आहे.

डारमथ् येथील रॉयल नेव्हल् कॉलेज तेथील अधिकाऱ्यांच्या दाक्षिण्यसंपन्नतेमुळें मला जाऊन पाहतां आलें, ही

संतोषाची गोष्ट होय. कारण, अप्रतिहत दर्यावर्दी बलासंबंधानें साऱ्या दुनियेंत इंग्लंड अव्वल दर्जाचें असून, आरमारी खात्यांतील योध्याविषयीं इंग्लंडाला मोठा अभिमान व पूज्यभाव वाटतो. ड्रेक, फ्रोबिशर, ग्याले, नेलसन, हीं नांवें प्रत्येक इंग्रजाच्या मनामध्यें अत्युच्च ध्येय व वरिष्ठ प्रतीच्या उमेदी उत्पन्न करितात. हिंदुस्थानाजवळच्या दर्यामध्यें कधीं कधीं आम्हांला लढाऊ गलबतें पाहण्याची संधि सांपडते. अशा लढाऊ गलबतांवर हिंदुस्थानचें संरक्षण व इंग्लंडचा अभिमान अवलंबून असल्यानें, त्या गलबतांवर अधिकारी होणाऱ्या तरुण इंग्रजांना ज्या संस्थेमध्यें त्यासंबंधीं पुरें शिक्षण मिळतें, ती संस्था समक्ष पाहण्याची मला फार दिवसांपासून स्वाभाविक इच्छा होती. ग्रेट ब्रिटनची फौज भारी, मोठी व जय्यत आहे, हें खरें. पण त्याचा बिनतोड वरिष्ठपणा त्याच्या अप्रतिहत दर्यायी बलावरच आहे. म्हणून या सफरीसंबंधानें मी फार उत्कंठित होतों व ती संस्था पाहण्याचा माझा हेतु पुर्तेपणीं सफल झालेला पाहून, मला भारी संतोष वाटला.

रायल नेव्हल् कालेजच्या उत्तम इमारती एका बऱ्याचशा मोठ्या उचंवट्यावर बांधलेल्या आहेत. त्या तांबड्या रंगाच्या असून तेथून भोंवतालच्या सुंदर टेंकड्या, खोरीं, नदी, समुद्र, वगैरेचे देखावे, फारच सुरेख दिसतात. या कॉलेजांत 'क्याडेट्स'—तरुण होतकरू अंमलदार—यांना शेवटच्या वरिष्ठ

दर्जापर्यंतचें शिक्षण दिलें जातें. तेथील तरुण व जोमदार विद्यार्थी उदात्त महत्त्वाकांक्षेनें प्रेरित झालेले असून, भविष्य-काळीं त्यांना ज्या जबाबदारीच्या अधिकारावर नेमलें जावयाचें होतें, त्या अधिकाराच्या जागेची पात्रता अंगीं येण्यास आवश्यक असणारें शिक्षण ते आस्थेनें ग्रहण करीत होते, हें पाहून आह्मांला आनंद झाला. त्यांनीं पहिलीं दोन वर्षें आस्बोर्न् येथें घालविल्यानंतरच त्यांचा या कॉलेजांत प्रवेश होतो. येथें दोन वर्षें शिक्षण झाल्यावर, त्यांना एका 'क्रूझर' वर पाठविण्यांत येतें. तेथें त्यांना 'सब-लेफ्टेनेंट'चा हुद्दा मिळवि-ण्याची योग्यता संपादन करावी लागते. या नेव्हल् कॉले-जांत शिक्षण पुरें होण्याला, प्रत्येक 'क्याडेट्'ला प्रतिवर्षी सुमारें शंभर पौंड व 'सब-लेफ्टेनंट'च्या पायरीपर्यंत पोहों-चण्याला एकंदर एक हजार पौंड (१५००० रु०) खर्च येतो.

या 'क्याडेट्स' ना स्वतंत्र कोठड्या नसतात. त्यांना एका 'डामिर्टरी'-निजण्याच्या कमऱ्या-मध्यें निजावें लागतें. सामान ठेवण्याला प्रत्येकाच्या वेगळाल्या पेट्या अस-तात त्याही तेथेंच ठेवतात. कॉलेजांत लिहिण्यावाचण्याच्या सर्वो-त्कृष्ट जागा असून भरपूर लायब्ररीही आहे. तेथील दिवाणखान्याला 'क्वार्टर डेक्' म्हणतात. या ठिकाणीं या विद्यार्थ्यांची परीक्षा घेतात. त्याच्या सभोंवार शिक्षणाचे वर्ग आहेत. तेथें 'केमिस्ट्री (रसायनशास्त्र), 'डायनामिक्स्' (गतिशास्त्र), 'स्टॅटिक्स' (स्थितिशास्त्र), गणित, खगोलविद्या, 'इंजिनियरिंग'

( शिल्पशास्त्र ) व नौस्तरणविद्या, इत्यादि विषय पढवितात. एका कमऱ्यामध्यें आह्मीं निरनिराळ्या तऱ्हेचीं जहाजें व गलबतें यांचे नमूने ठेवलेले पाहिले. दुसऱ्या एकामध्यें नौकानयनविषयक शिक्षण देण्याला लागणारीं यंत्रें लावून ठेवलेलीं होतीं.

तेथील पाकशाळा व भोजनशाळा आह्मीं पाहिल्या. तेथें काम करण्याला सोपें जाण्यासाठीं बशा घासण्यापासून तो सफरचंद व बटाटे यांच्या साली काढण्यापर्यंत योजिल्या जाणाऱ्या सर्व आधुनिक क्लृप्ती व साधनें वापरांत होतीं. अंमलदार लोकांनीं सोईनें व आरामांत एकत्र भोजन करणें, बिलियर्ड खेळणें, पोहणें, बाहेर मोकळेपणीं व्यवस्थेनें टेनिस खेळणें, इत्यादिकांसाठीं पृथक् व सोईवार जागा होत्या. टेंकडीवरून खालीं नदीवर जातांना, आम्हीं तेथील वर्कशॉप पाहिलें. तेथें ‘ क्याडेट्स ’ लोकांना जहाजाचा प्रत्येक भाग तयार करणें व दुरुस्त करणें, हीं कामें शिकावीं लागतात. तेथें विद्युच्छास्त्राची शाखाही आहे. तिच्यांत ते आपापलीं यंत्रें, मोटार्स, डायन्यामो, वगैरे तयार करितात. ‘क्याडेट्स’ लोक जहाजाचे निरनिराळे भाग तयार करीत होते, त्याचें आम्हांला पुष्कळच कौतुक वाटलें. कांहीं ‘ क्याडेट्स’ एका मोठ्या जहाजाचा मोडलेला ‘ प्रोपेल्लर ’ स्क्रू—गति देणारा पंखा—नीट करीत होते. येथें विश्रांति व आराम यांच्या आवश्यकतेकडेही दुर्लक्ष केलें जातें असें नाहीं. कांहीं

' क्याडेट्स ' एका बोटींत बसून हवा खाण्याला गेलेलेही आम्हीं पाहिले. शिक्षण, व्यायाम व आराम, या सर्वांसाठीं ही बोट त्यांना उपयोगांत आणतां येते.

आह्मी तेथून परत आल्यावर आगबोटींतून डार्ट नदीच्या वरच्या भागांत सहल करण्याला जाण्यापूर्वी वेळांत वेळ काढून ' बटरवॉक् ' पाहून आलों. जुन्या इंग्रजी तऱ्हेच्या गल्लीचा तो एक मासलेवाईक नमूना असून त्याच्या बाजूला असलेल्या तऱ्हेदार घरांना विलक्षण कोरीव काम केलेल्या लांकडी ग्यालऱ्या—सज्जे—आहेत. नंतर आह्मी लांच—आगबोटी—वर चढलों. तिच्यावरूनच आह्मीं ब्रिटानिया नांवाचें ट्रेनिंग क्रूझर—शिक्षण देण्याचें गलबत—पाहिलें. तें फार दिवसांपासून लढाऊ कामाला निरुपयोगी झालेलें आहे. त्याच्या डेक्वरील भागावर गवती छपरें घातलेलीं आहेत. त्यामुळें तें नदींतील समर हौस—हौसेनें उन्हाळ्यांत राहण्याच्या तरत्या घरा—सारखें दिसत होतें. हल्लीं निरुपयोगी झालेलें हें गलबत पूर्वी एक वेळ, ब्रिटिश आरमारामध्यें अत्युत्तम लढाऊ गलबत समजलें जात होतें, हा विचार मनांत येऊन आजकालच्या नव्या लढाऊ क्रूझरमध्यें त्याच्या मानानें ज्या सुधारणा झालेल्या आहेत, त्या पाहून मी चकित झालों.

# भाग तेरावा.

## सरकारी मदत व दानधर्म.

'त्याचीं हाडें दगडावर खडबडवा. तो एक कंगाल भिकारी. त्याला आपला असें ह्मणणारा कोणी नाहीं.' **'टामस् हूड.'**

इंग्लडांतील सुमारें पन्नास वर्षांपूर्वींच्या स्थितीला या ओळी अन्वर्थक लागू असल्या तरी, त्या आजकालच्या स्थितीला लावतां येण्याजोग्या नाहींत. कारण, हल्लीं गरीब लोकांची चांगली काळजीपूर्वक जोपासना होते. त्यांना पोटभर खाण्याला व बऱ्याच आरामांत राहण्याला मिळतें. इतकेंच नव्हे, तर मेल्या-वर त्यांचीं प्रेतयात्राही नीटपणें केली जाते. म्हणून हूडनें वरील व्याजोक्ति, ज्या लज्जास्पद प्रसंगाला अनुलक्षून लिहिली आहे, तो येण्याची स्थिति आतां बहुतेक राहिलीच नाहीं, असें ह्मणतां येईल. न्यूटन ॲबट् येथील वर्क हौस—गरीब-खान्या—चे व्यवस्थापक यांनीं कृपा करून आह्मांला तेथील व्यवस्था नीटपणें बरोबर फिरून दाखविली. त्यामुळें आम्हांला इंग्लंडांतील 'पूअर लॉ सिस्टिम'—गरीब लोकांच्या

संबंधाच्या कायद्या—ची चांगली माहिती करून घेतां आली. अशा संस्थांची व्यवस्था ग्रामसंघांच्या अधिकाऱ्यांच्या स्वाधीन असते. त्यांना 'बोर्ड ऑफ् गार्डियन्स्'—पालक मंडळी— म्हणतात. त्यांना 'पूअर लॉ'च्या अन्वयें बसविलेल्या करांच्या उत्पन्नांतून द्रव्यसाहाय्य मिळतें. या 'पूअर हौस' मध्यें, सुमारें ९७००० वस्तीच्या ग्रामसंघांतील गरीब लोकांची सोय होण्याची व्यवस्था केलेली आहे. अगदींच कंगाल स्थितीला पोहोंचलेल्या माणसाला, अशा संस्थांमध्यें जाऊन, तेथें अन्न-आच्छादनाची व रहाण्याची तजवीज, सार्वजनिक खर्चानें करवून घेतां येते. ही गोष्ट, इंग्रज लोकांच्या इतिहासाशीं परिचय असलेल्या सर्व लोकांना माहीत आहे. यासंबंधाचे उल्लेख अनेक कादंबऱ्यांमध्यें, विशेषतः डिकेन्सकृत 'आलिव्हर ट्विस्ट्' या कादंबरींमध्यें, केलेले आहेत. या कादंबरींत वर्क हौसमधील गरीब लोकांचे जे हाल होत असत आणि प्रसंग-विशेषीं त्यांना ज्या क्रूरपणानें वागवीत, त्याचें वर्णन केलेलें आढळतें. पण डिकेन्सनें आपल्या वेळीं प्रचलित असलेल्या वर्क हौसमधील अव्यवस्था व अयोग्य प्रकार उघडकीस आणल्यापासून, अलीकडे त्यांची स्थिति सारखी सुधारत चालली आहे. अगदीं अलीकडे पर्यंत सुद्धां वर्क हौस मध्यें जाणें लोकांना भीतिप्रद, लाजिरवाणें, व हीनता आणणारें वाटत असे. पण आतांशा या संस्था इतक्या सदयतेनें चालविल्या जात आहेत कीं, त्यामुळें पुष्कळ अंशीं त्यांची पूर्वीची बदनामी

नष्ट होत चालली आहे. इंग्रज लोकांना स्वावलंबनाचा धडा उपजतच मिळालेला असतो; तसें नसतें तर गरीब लोक या संस्थांचा सहज व अधिकाधिक उपयोग करून घेऊं लागते.

न्यूटन् आबट्ट् येथील वर्क हौस हा, अशा संस्थांचा एक बराच चांगला मासला आहे. त्याच्यांत पुरुष, बायका व मुलें मिळून ४५० लोकांची सोय आहे. तेथील मोठ्या भोजनशाळेंत एकदम २०० पात्रें बसूं शकतात. प्रत्येक माणसाला दररोज ठराविक २६ औंस--सुमारें ६५ तोळे--अन्न देतात. याचा दर माणशीं आठवड्याला पावणेपांच ते साडेसात शिलिंग खर्च पडतो. गरीब लोकांची प्रतवारी लावण्या-साठीं या संस्थेंत निरनिराळ्या शाखा आहेत. एका मुकरर जागेंत रिकामटेकडे व अल्पकाळ बेकार असलेले, अशा लोकांना अन्न व राहण्याला जागा मिळते. पण नेमून दिलेलें काम पुरें केल्याशिवाय, त्यांना तेथून निघून जाऊन स्वतंत्रता संपादन करतां येत नाहीं. दगड फोडणें, लांकडें कापणें, अशांतली कामें, त्यांना दिलीं जातात. येथें लोक स्वतःच्या पोटापुरती मजुरी कमवितील तोंवर, त्यांना पोटाला दिलें जात असल्यानें, संस्थेच्या या भागाला वर्क हाऊस--रोजगार करण्याची जागा--हें अन्वर्थक नांव देतां येईल. ही व्यवस्था उडाणटप्पू फिरत्या लोकांसाठींच योजिलेली आहे. तिच्या योगानें धट्टेकट्टे लोक भीक मागत फिरतात, त्याला आळा पडतो.

दुसऱ्या एका शाखेंत वृद्ध व अशक्त लोकांच्या खाण्यापिण्याची व राहण्याची सोय करून, त्यांच्याकडून डॉक्टर सांगतील तीं व तितकींच, कमी श्रमाचीं कामें म्हणजे बशा, कांटे, सुऱ्या, वगैरे घासणें, कपडे धुण्याचें यंत्र चालविणें, व त्या संस्थेंत लागणारे भाजीपाला व इतर सामान नीट तयार करणें, अशीं करविलीं जातात. आजारी व काम करण्याला अगदींच असमर्थ अशा लोकांसाठीं स्वतंत्र व्यवस्था केलेली असून या खात्याला एक नवें इस्पितळ जोडलेलें आहे. त्यांत १६० बिछाने आहेत, व त्याकडे बारा 'नर्सेस' किंवा दाया नेमलेल्या आहेत. मनाची चलबिचल झालेल्या लोकांना इतरांपासून अलग ठेवतात. त्यांतही हीं चलबिचल सौम्य असेल त्यांनाच या संस्थेंत ठेवतात. दांडगे, उन्मत्त व त्रासदायक, अशा वेड्यांना 'ल्यूनॅटिक् असायलम्'—वेड्यांच्या इस्पितळां—मध्यें पाठवितात. आणखी एका शाखेमध्यें तीन वर्षांखालच्या मुलांचें संगोपन, त्यांना सुशिक्षित दायांच्या ताब्यांत ठेवून करविलें जातें. तेथील पाकशाळा व कोठारें, नीट, स्वच्छ व मोठ्या टापटिपीनें ठेवलेलीं आहेत. तीं आम्हीं पाहिलीं. नंतर कमेटी व नेहमींच्या सभा यांच्या बैठकीची 'बोर्डरूम' पाहिली. तसेंच तेथील साधेंसें 'चापेल्'—प्रार्थनामंदिर—व तेथें राहणाऱ्या लोकांकडून आसपासच्या जमीनींत बागबगीच्याचें व शेतीचें काम करविलें जातें, त्या जागाही पाहिल्या. दुसरें उपयुक्त काम 'ब्राबेझॉन् सोसाइटी'कडून पुरविलें जातें.

ही 'सोसाइटी' वृद्ध माणसांना, त्यांच्या दिनक्रमाचा कंटाळवाणेपणा कमी करण्याकरितां, शिवणकाम व इतर हस्तकौशल्याचें काम करण्याला उत्तेजन देते. अशा कामाचे बरेचसे नमूने तेथें ठेवलेले आहेत. त्यांतून कांहीं आह्मीं खरेदी केले.

या ठिकाणींच दुसरी एक संस्था आहे. तिच्यांत तीन वर्षांवरच्या पोरक्या मुलांचें संगोपन केलें जातें. या मुलांना स्वयंपाकाशिवाय सर्व कामें स्वतःच करण्याला शिकविलें जातें. स्वयंपाक मात्र नोकर लोक करितात. हीं मुलें योग्य वयाचीं झाल्यावर, त्यांना धंदा शिकण्यासाठीं ' अप्रेंटिस् '—उमेदवार —म्हणून, किंवा एखाद्या लष्करी अथवा आरमारसंबंधी शाळेंत,शिकण्याला पाठवितात.त्या संस्थेची 'मेट्रन'—व्यवस्थापक बाई—त्या मुलांशीं पुढेंही पत्रव्यवहार चालू ठेवते. त्या योगानें त्यांचा या संस्थेशीं संबंध कायम राहतो. तीं मुलें ख्रिस्तमसच्या दिवसांत परत येतात, त्यावेळीं, तीच संस्था त्यांना स्वगृहाच्या जागीं होते. या संस्थेंत दर मुलामागें आठवड्याला सरासरी खर्च साडेसहा ते साडेनऊ शिलिंग लागतो.

या संस्थांची व्यवस्था व तेथील रेखलेली टापटीप, यांचा माझ्या मनावर चांगला ठसा उमटला आणि या संस्थांचें कार्य किती काळजीपूर्वक व सत्यनिष्ठेनें केलें जातें, हें पाहून खरोखर मला फार समाधान वाटलें. युरोपांतील सफरीमध्यें एखाद्या गोष्टीचा माझ्या मनावर विशेषसा ठसा उमटला असेल,

तर तो या संस्थासंबंधाचा. कारण, वृद्ध व गरीब लोकांना दुर्दैव किंवा निरुपाय यामुळें, सार्वजनिक साहाय्य मिळविणें भाग पडतें तेव्हां, त्यांचें तेथें संगोपन होतें. इंग्लंडांत भीक मागण्याची कायद्यानें मनाई आहे, हें प्रसिद्धच आहे. दूरच्या नातेवाइकाकडे कायमचें राहण्याची इकडे चाल नाहीं. काम करण्याला अशक्त झाल्यावर आप्त इष्टांकडून त्यांची जोपासना होण्याचाही प्रघात नाहीं. यामुळें ही ' वर्क हौसेस'ची संस्था अगदीं अवश्य आहे. त्या संस्था ज्या उद्देशानें स्थापन केल्या जातात, तो उद्देश पूर्णपणें सफल होत आहे. गरीब लोकांच्या संगोपनासंबंधी या सरकारी व्यवस्थेला इतर अनेक तऱ्हेचे खाजगी प्रयत्न व संस्था, यांच्या द्वारेंही पुष्कळ मदत होत आहे. त्यांपैकीं पुष्कळसे प्रयत्न धार्मिक संस्थांच्या द्वारें होताहेत. तेव्हां त्यांच्याविषयीं जास्त लिहिण्यापूर्वीं ' इंग्लिश ख्रिश्चियानिटी'—इंग्रज लोकांचा ख्रिस्ती धर्म—संबंधानें माझ्या मनावर जो ग्रह झाला, त्याचें दिग्दर्शन करणें इष्ट आहे.

हिंदुस्थानांत सणाचे दिवस नियमित ठरलेले आहेत. कांहीं ना कांहीं धार्मिक उत्सवाशीं त्यांचा संबंध असतो. त्याच्यांत मुख्य हेतु पूजा अर्चेचा. गंमत व तमाशे, हे आनुषंगिक. तथापि त्यांच्यामुळेंही लोकांचें चित्ताकर्षण होतें. स्थानिक देवतेच्या यात्रेला लोक जातात. तेथील मंदिरांत पूजा अर्चा व इतर धार्मिक विधि आटोपल्यावर, लोक यात्रेंत भरलेल्या बाजारांत जिनसांची खरेदी करतात व मजा मारतात. इंग्लंडांत अशा

तऱ्हेचे उत्सव पाहण्यांत येत नाहींत. अगदीं दूरच्या खेडवळशा भागांत, प्राचीन रोमन लोकांच्या काळांतल्या कांहीं कांहीं धार्मिक उत्सवसंस्कारांचा थोडासा अवशेष, पाहण्यांत येतो. अशांपैकीं हल्लीं सुद्धां दृष्टीस पडणारा उत्सव, गावाजवळच्या हिरव्यागार मैदानांत एखाद्या कुमारिकेला 'मे क्वीन'—मे महिन्याची राणी—म्हणून पट्टाभिषेक करितात, तो होय. हा सुरेखसा समारंभ आटपल्यावर त्या राणीचें तरुण दरबारी मंडळ, अथवा सन्मान्य सख्या, पुष्पमाला धारण करून, 'मे पोल' च्या भोंवतीं नृत्यगीतादिकांच्या द्वारें, वसंताच्या पुनरागमनाचा उत्सव आणि पुष्पदेवता 'फ्लोरा' इच्या आराधनेचा समारंभ साजरा करितात. या चाली इंग्लंडांत बहुतेक नामशेषच झाल्या आहेत. आणि यात्रादिक आनंदमहोत्सवाच्या प्रसंगांचा धर्माशीं आतां अर्थाअर्थीं संबंध उरलेला नाहीं.

मीं विलायतेंत पुष्कळसा फिरलों व बऱ्याच गोष्टी पाहिल्या. त्यांचा माझ्या मनावर जो कांहीं परिणाम झाला त्यावरून माझी अशी समजूत झाली आहे कीं, तेथें धार्मिक आचाराची विशेष गडबड नाहीं. तरी स्वतःची व्यक्तिविषयक जबाबदारी व सामाजिक कर्तव्यपरता, यासंबंधीं लोकांमध्यें उत्कट जाणीव स्पष्ट दिसते. मी हिंदुस्थानांतून आलेला, तेव्हां तेथें धर्मविषयक कल्पनेबरोबर तितक्याच महत्त्वाची नैतिककार्यपरतेची जबाबदारी आजकाल दृष्टीस पडत नसल्यानें वरील गोष्टीचा माझ्या मनावर विशेष परिणाम झाला. प्राच्य देशांत लोक सत्कर्में

कारितात, तीं केवळ कोणाला साहाय्य करण्यास्तव ह्मणून केलीं जात नसून, तीं करणाराला पुण्य लागतें व परलोकीं फायदा होतो, या कल्पनेमुळेंच होय. हिंदुस्थानामध्यें लोकांची दृष्टी व साऱ्या जीवनक्रमाचें अनुसंधान नेहमीं पारलौकिक विचाराला धरून असतें. हिंदूधर्माच्या मुख्य तत्त्वाचा पाया वैय्यक्तिक जीवात्म्याला मुक्ति मिळविण्याच्या कल्पनेवर रचलेला आहे. पण वरील तत्त्वाखेरीज इंग्रज लोकांच्या ख्रिस्ती धर्मांत भूतदया विशेष असून तो खरोखर उपयुक्त अशा परोपकाराच्या तत्त्वांनीं ओतप्रोत भरलेला आहे.

इकडील प्रार्थनामंदिरें हिंदुस्थानांतील देवालयांइतकीं सुगम नसतात. तेथें कोणी तितके वरचेवर जातही नाहींत. इंग्रज लोक मांदिरांत प्रार्थनेला कदाचित् आठवड्यांतून फक्त एक दिवसच जात असतील व बाह्यतः रविवारच्या पोषाखाबरोबरच त्यांनीं आपला धर्मही इतर दिवशीं खुंटीवर ठेवल्यासारखा दिसत असेल. तरी नैतिक आचरणासंबंधींचे निर्बंध ते फार कडक रीतीनें पाळतात. ब्रिटिश लोकांमध्यें 'सेन्स आफ् आनर'—सभ्यपणाची कल्पना व विचार—पाहिल्या दर्जाचा असतो. हिंदुस्थानांत सुजनत्वाच्या कल्पनांची वाढ जरी वरील इतकी झाली नसली, तथापि हिंदी लोकांत धर्म व औदार्य यांचें तत्त्व, सर्वातिशायी असतें. यामुळें हिंदी लोक आपल्या जातीचा कोणीही उपाशी सोडून कधींही जेवणार नाहींत. अडचणींत असलेल्या अतिथीला त्यांचें दार नेहमीं उघडें

असतें. ब्रिटिश लोकांचा दुसरा एक उपजत गुण त्यांच्या व्यावहारिक नीतीमध्यें आढळून येतो. धर्माच्या योगानें खरोखर त्यांच्या साऱ्याच चारित्र्याला उच्चपणा येतो. आणि सर्वसाधारणपणें त्यांची प्रत्येक क्रिया धर्मतत्त्वांनीं अनुशासित (नियमित) झालेली असते. त्यांना लहानपणीं रविवारच्या शाळेंत मिळालेल्या शिक्षणाचा व साऱ्या शिक्षणक्रमामध्यें त्यांना जें धर्मविषयक शिक्षण मिळतें, त्याचा, कदाचित् हा परिणाम असेल.

इंग्लंडामध्यें पुष्कळसे धर्मपंथ आहेत. विचार व वर्तन यांचें स्वातंत्र्य सर्वमान्य असलेल्या या देशामध्यें ही गोष्ट कांहीं आश्चर्यकारक नाहीं. 'चर्च ऑफ् इंग्लंड' या पंथाचे सर्वांहून अधिक अनुयायी असून त्या 'चर्च'चें असें ह्मणणें आहे कीं, त्याच्यांतील 'बिशप, प्रीस्ट, व डीकन' यांनीं घटित अशी त्रिविध धर्मोपाध्यायांची तऱ्हा व परंपरा ही 'अपॉसल्स'—प्रेषितां—च्या वेळच्या 'चर्च'च्या नियमाला अनुसरून आहे. इतकेंच नव्हे, तर 'बिशप' लोकांना त्यांचा धार्मिक अधिकार, खुद्द 'अपॉसल्स'पासून सारखा परंपरेनें प्राप्त झालेला आहे, व हल्लीं होतो आहे. त्याच्या शेंकडो वर्षांच्या इतिहासांत त्या 'चर्च'नें 'क्याथलिक चर्च'च्या पोटामध्यें राष्ट्रीय 'चर्च' कायम ठेवण्याचें ध्येय राखलें आहे. तसेंच "केवळ मानवी अधिकारावर चालू असलेले 'चर्च' संबंधी विधि व संस्कार रद्द करण्याचा, किंवा त्यांच्यांत फेरफार करण्याचा प्रत्येक विवक्षित किंवा

राष्ट्रीय 'चर्च'चा'' हक्क, अबाधित कायम राखला आहे. ( कलम ३४ ). राजाच्या हातीं ''या राज्यांतील सर्व सामाजिक किंवा धार्मिक इस्टेटींचा ताबा, व त्यांची व्यवस्था लावण्याची सत्ता आहे,'' हेंही तत्त्व त्यांनीं स्थापित केलें आहे. तसेंच ''रोमचा बिशप–'पोप'–याची इंग्लंडच्या राज्यामध्यें कोणतीही हुकुमत,'' नाहीं असेंही त्यांनीं स्पष्टपणें जाहीर केलें. (कलम ३७ ). निस्संशय 'इंग्लिश चर्च'नें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या महत्त्वाच्या प्रश्नाच्या बाबतींत फारच मोठा कार्यभाग केला आहे.

'प्रेस्बिटेरियन्' पंथवाल्यांना धर्मोपदेशक व उपाध्ये यांची नेमणूक व अधिकार दैवी असल्याचें कबूल आहे. पण खरी 'अपास्लिक्' प्रेषितांची परंपरा 'प्रेस्बिटर' मंडळामध्येंच असून, धर्मगुरू नेमण्याचा अधिकार 'बिशप' लोकांनीं केवळ आपल्याच हातीं असल्याचें ठरविलें आहे, तें अयोग्य व अधिकाराबाहेरचें आहे, असें ते मानतात. 'कांग्रिगेशनलिस्ट्स' यांची स्थिती व मत याच्या अगदीं उलट आहे. ख्रिस्तीधर्माच्या तत्त्वांवर विश्वास ठेवणाऱ्या प्रत्येक संघाला आपापल्या पुरतें पूर्ण व्यवस्थास्वातंत्र्य आहे व असलें पाहिजे, असें त्यांचें म्हणणें आहे. 'क्रीड्स'–धर्मसूत्रें व धर्मसंबंधी कलमबंद्या–अनावश्यक असून, 'ख्रिश्चियन चर्च'चा अधिकार, केवळ धार्मिक संबंधापुर्ता आहे, सबब त्याला ऐहिक किंवा सामाजिक सत्तेचा संपर्क लावून भ्रष्टपणा येऊं देणें ठीक नाहीं, असेंही ते म्हणतात.

' धि वेस्लेयन् मेथॉडिस्ट्स ' हा पंथ जॉन वेस्ले यानें स्थापन केला. तो ' आक्सफर्ड ' येथें असतांना तेथील 'चर्च'चें धार्मिक बाबतींतील उदासीन वर्तन पाहून त्याला प्रेरणा झाली व त्यानें तेथें शिकत असलेल्या कांहीं ' अंडर–ग्राज्युएट ' मंडळीचा एक लहानसा संघ स्थापित केला. प्रार्थनेच्या पुस्तकाप्रमाणें अधिक काळजीनें वागणें, त्यांत सांगितलेले उपवासादिक नेमधर्म जास्त नेमानें पाळणें, ' साक्रमेंट्स '–प्रभुभोजन–च्या वेळीं अवश्य व नियमानें हजर राहणें, व सारा वेळ विशेष व्यवस्थेनें व नियमितपणानें खर्च करणें,अशाप्रकारें वागण्याविषयीं त्यानें नियम केले. यावरून या पंथाला ' मेथॉडिस्ट्स ' असें नांव पडलें. सारें जग माझें ' पारिश'–धार्मिक हुकमतीचें क्षेत्र–आहे. " अशी ' वेस्ले 'ची उक्ति सार्थ झालेली आहे, कारण, ' मेथॉडिजम् ' व त्याचे अवांतर भेद, यांचे अनुयायी, जगांतील दूरदूरच्या कोन्याकोपऱ्यांमध्येंही आढळून येत आहेत. असाच दुसरा एक धर्मपंथ ' बॅप्टिस्ट ' हा होय. अल्पवयी बालकांना ' बाप्तिस्मा' देतात व त्यावेळीं त्यांच्यावर पवित्र जलाचें नुसतें मार्जन केलें जातें. तें या पंथांतील लोकांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें,या ऐवजीं ख्रिस्तीधर्म मानणाऱ्याला तो पक्का वयांत आल्यावर 'बाप्तिस्मा' द्यावा व त्यावेळीं त्याला पूर्णपणें पाण्यांत बुचकळणेंच अधिक श्रेयस्कर आहे. त्याचप्रमाणें ' ज्यू ' किंवा यहूदी पंथाचे लोक त्यांच्या धर्मांतील 'मसीहा'ची–प्रेषिताच्या अवताराची–वाट पाहत असून आपल्या जातीच्या लोकांची पुनरपि पालेस्टाईन्-

मध्यें स्थापना होणार आहे, आणि जरूसलेम येथील भग्न मंदिर पुनः बांधलें जाणार आहे, असें मानतात. परलोकवासी जनरल बूथ यांनीं स्थापलेली ' साल्व्हेशन् आर्मी '– मुक्तिफौज–हा आणखी एक धर्मपंथ होय. ख्रिस्ती धर्माचें मुख्य कार्य समाजबहिष्कृत लोकांच्या उद्धाराकरितांच आहे, ह्या नेहमीं विसरलें जात असलेल्या तत्त्वांचे या मुक्तिफौजेंतील लोक पुरस्कर्ते आहेत.

यांतील प्रत्येक पंथ व्यवस्थित रीतीनें परोपकार करण्याच्या प्रयत्नाचें मुख्य स्थान आहे. गरीब व गरजू लोकांच्या पोटापाण्याची व वस्त्रप्रावरणाची व्यवस्था करणें, तरुण मंडळीला करमणूक करणाऱ्या व स्वयंशिक्षण देणाऱ्या संस्था स्थापना करणें, परस्परहितवर्धिष्णु मंडळ्या व ' पेनी बँक्स ' यांची स्थापना करून त्यांच्या द्वारें लोकांना काटकसरीनें वागण्याला उत्तजन देणें, इत्यादि नानादिशांनीं या धार्मिक पंथाचे प्रयत्न सुरू आहेत. हिंदुस्थानांतल्यापेक्षां इंग्लंडामध्यें परोपकारबुद्धि व दानधर्म, अधिक प्रमाणावर आढळून येतात. प्रार्थनामंदिरें बांधणें, किंवा धार्मिक संस्थांच्या खर्चाची कायम व्यवस्था करणें, येवढ्यांतच आपल्या परोपकारबुद्धीचें कार्यक्षेत्र मर्यादित न करतां त्याखेरीज ' आर्फनेजेस '–अनाथबालकाश्रम,–'कन्व्हलसंट होम्स '–आजारांतून नुकत्याच उठलेल्या रोग्यांच्या शुश्रूषेसाठीं वसतिगृहें–,इस्पितळें, गरजू सभ्य स्त्रियांसाठीं कामधंद्याची सोय करून देणें, अंध, पंगु, मुके, बहिरे, अशा अपंग

व दुर्बळ लोकांसाठीं वसतिगृहें स्थापन करणें, इत्यादि गोष्टी करण्याकडे आपल्या परोपकारबुद्धीचा ते अधिक उपयोग करीत असतात.

अशा तऱ्हेच्या बऱ्याचशा संस्था पाहण्याचा मान मला मिळाला. उदाहरणार्थ, लंडनमध्यें असतांना स्टेपने काझवे-वरील ' डॉक्टर बर्नार्डोज् होम्स्, ' ही संस्था मीं पाहिली. ती साऱ्या दुनियेंत सर्वांत मोठा असा अनाथबालकाश्रम असून, तेथें ६००० वर मुलें आहेत. तिच्या शाखा साऱ्या देशभर पसरलेल्या आहेत व तेथील काम राष्ट्रीय स्वरूपाचें आहे. निराश्रित, पोरकीं व आईबापांनीं टाकलेलीं, अशा मुलांना आश्रय देण्यासाठीं या संस्थेचीं द्वारें रात्रंदिवस उघडीं असतात. त्या मुलांना शिक्षण देऊन तयार केल्यावर, त्यांना कारागीर लोकांकडे किंवा कारखान्यामध्यें काम शिकण्याला ठेवतात. अगर क्यानडा देशांत पाठवितात. तेथें त्यांचा स्वीकार करण्याला तिकडील शेतकरी व जमीनदार फार उत्सुक असतात. त्या मुलांपैकीं शेंकडा पंचाण्णव स्वतःच्या मालकीचे शेतकरी बनतात. यावरून तिकडे तीं पहिल्या प्रतीचीं कामकरी निपजतात, असें सिद्ध होतें. हिंदुस्थानांत आमच्याकडेही अनाथबालकाश्रम आहेत. पण ते या वसतिगृहांच्या मानानें कांहींच नव्हेत. हीं वसतिगृहें किती तरी व्यवस्थित व खरोखर समाजहितकारक अशीं बिनमोल कामगिरी बजावणारीं आहेत.

दुसऱ्या एका प्रसंगीं कर्नल व मिसेस रे यांनीं मला कॉव्हाम येथील ' कन्व्हलसंट होम ' मध्यें नेऊन, तें नीटपणें फिरवून दाखविलें. ही आमची सफर चांगली मजेदार झाली. या संस्थेची इमारत स्वतःच्या मालकीच्या जमिनीवर बांधलेली आहे. लंडन येथील इस्पितळांमधील औषधोपचारानंतर किंवा तेथें शस्त्रक्रिया करवून घेतल्यावर आजारी लोक येथें घेतले जातात. त्यांना आपलें शरीरस्वास्थ्य पूर्ववत् कसें संपादन करून घेतां येतें तें आह्मांला येथेंच नीटपणें दृष्टीस पडलें. येथील व्यवस्था प्रत्येक बाबतींत सर्वोत्कृष्ट असून ही संस्था ज्या उद्देशानें स्थापन झालेली आहे, तो ती उत्तम रीतीनें सफल करीत आहे. इच्या आवारांत कांहीं उत्तमोत्तम गाई व कोंबडीं पाहण्यांत आलीं. हें 'होम 'निवळ खाजगी देणग्यांवर चालविलेलें आहे अशी माझी समजूत आहे आणि कर्नल रे यांचा या संस्थेशीं संबंध जडल्यापासून तिच्यासाठीं त्यांनीं पुष्कळ उपयोगी व फायद्याचीं कामें केलीं आहेत.

अशा नाना तऱ्हेच्या परोपकारी संस्था व्यवस्थित रीतीनें चाललेल्या पाहून, व इंग्लंडांतील समाजानें असल्या संस्थांच्या व्यवस्थेच्या बाबतींत बहुतेक पूर्णावस्था प्राप्त करून घेतलेली लक्षांत आणून, मला भारी आश्चर्य वाटलें. हिंदुस्थानांत आमच्यामध्येंही दानधर्म व परोपकार यांविषयींची बुद्धि उपजत आहे. पण आमचा परोपकार व औदार्य युक्तायुक्तविचारविरहित व सरसकट असल्यानें, बरेच वेळां त्याचा

परिणाम, राष्ट्रीय चारित्र्याला हानिकर सुद्धां होतो. आमच्यामधील जाति, धर्म, पंथ, यांचे भेद एकजुटीनें सामाजिक कार्य करण्याच्या आड येतात. त्यांचा परिणाम इंग्लंडांतही थोडाबहुत वाईट होतो, नाहीं असें नाहीं. तरी पण त्या लोकांची दृढ देशभक्ति व व्यवहारज्ञान, यांच्यामुळें तो अत्यल्पसा होतो. आह्मींही हिंदुस्थानवासी लोकांनीं स्वतःच्या हिंदीत्वाची खरी जाणीव बाळगिली, तर धर्मसंबंधी भेदभाव आमच्याही प्रगतीला आड येणें बंद होईल. आमच्यांतील परोपकारबुद्धि व औदार्य, यांचे विवेकशून्य व संकुचित मार्ग पुष्कळ प्रसंगीं त्रासाला व कटकटीला कारण होतात. विशेषतः तीर्थयात्रेच्या ठिकाणीं लोकांना निष्कारण भारी त्रास व अपमान सोसावा लागतो. ही स्थिति सुधारून, हा प्रकार बंद करण्याचें काम, सरकार व समाजधुरीण यांनीं करावयाचें आहे. आमचा दानधर्म व परोपकार यांना इंग्लंडांतल्यासारख्या संस्था स्थापन करण्याचें वळण लागेल, व आमचे परोपकारविषयक प्रयत्न सुव्यवस्थित होऊन, ते भक्कम व खात्रीलायक पायावर उभारले जातील, तर आमच्या साऱ्या देशाला फारच हितावह व सर्वांनाच अतिशय फायद्याचें होईल.

# भाग चौदावा.

## ब्रिस्टल शहर आणि तेथील राजाश्रित प्रदर्शन.

मी ब्रिस्टलला गेलों तेव्हां तें ऐतिहासिक शहर ध्वजपताकादिकांनीं श्रृंगारलेलें व उत्सवप्रमोदयुक्त दिसत होतें. तेथील वार्षिक शेतकीचें प्रदर्शन पाहण्यासाठीं बादशहा यावयाचे असल्यानें त्यांच्या सन्मानार्थ हा समारंभ होता. या देशांत शेतकीसंबंधी दरसाल अवश्य घडून येणाऱ्या गोष्टींपैकीं, हें प्रदर्शन अव्वल प्रतीचें असतें. हें प्रदर्शन निवळ ग्रेट ब्रिटन पुरतेंच असतें, असें नाहीं. समुद्रपारच्या वसाहती व राज्यविभागही त्याच्यांत सामिल होतात. यामुळें त्याला साम्राज्यद्योतक बादशाही स्वरूप येतें.

या प्रदर्शनांतील समुद्रपारच्या भागांत ज्या निरनिराळ्या देशांतून प्रेक्षणीय वस्तू पाठविण्यांत आलेल्या होत्या त्यांत मलाया द्वीपकल्पांतील संरक्षित संस्थानें, आस्ट्रेलियांतील स्वराज्य उपभोगणारे व्हिक्टोरिया, सौथ आस्ट्रेलिया, वेस्ट आस्ट्रेलिया, व क्वीन्सल्यांड, हे भाग, तसेंच दक्षिण आफ्रिका,





ऱ्होडेशिया, आणि क्यानडा यांचा समावेश होतो. बंगाल्यांतील शेतकी खातें व ' वेस्ट इंडिया कमेटी ' यांनींही कांहीं वस्तू व नमूने पाठविले होते. तरी येथें हिंदुस्थानातर्फे योग्य निदर्शन झालेलें नव्हतें, हें पाहून माझी नाउमेद झाली. पुढें तरी अशा प्रसंगीं साधेल तोंवर, ही उणीव भरून काढली जाणें अवश्य आहे. या जगत्प्रसिद्ध प्रदर्शनांत आपापल्यातर्फे चांगलें निदर्शन व्हावें ह्मणून, इतर मोठमोठ्या राज्यविभागांतील स्थानिक सरकारांनीं फारच अगत्य व उत्सुकता दाखविली होती; व पुष्कळ परिश्रम केले होते. या बाबतींत होणारा परिश्रम व खर्च यांचा उत्तम मोबदला मिळतो. कारण, त्या योगानें त्यांच्याकडे पैदा होणारे कच्चे पदार्थ व तयार माल यांची प्रसिद्धि होते, व त्याच्या खपासाटीं नवें नवें गिऱ्हाईक मिळतें. या प्रदर्शनांतील वस्तूंची शिक्षणसंबंधांतही भारी किंमत आहे. तें पाहण्यास येणाऱ्या लोकांना, त्या त्या देशांत उत्पन्न होणाऱ्या वस्तूंचें प्रत्यक्ष ज्ञान होतें व त्यांच्या मनांत तिकडे वसाहतीला जाण्याची प्रेरणा होण्याला साधन होतें. तिकडील सरकारांतून आपापल्या भागांतील हवा, पाणी, जमीन, पीक वगैरेसंबंधी तपशीलवार माहितीचीं लहान लहान छापील पुस्तकें वाटलीं जात होतीं आणि ह्मणून प्रदर्शनाचा हा भाग जरी लहानसा असला, तथापि तो स्वतःच प्रेक्षणीय व प्रतिष्ठित अशा स्वतंत्र प्रदर्शनाचें काम करीत होता. येथें सुरुवातीपासून अखेरीपर्यंत सर्व व्यवस्था, वस्तू पाठविणारेच

करीत असतात. पण हिंदुस्थानांत ती प्रदर्शनाच्या पुरस्कर्त्यांना करावी लागते, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

हा 'रॉयल ॲग्रिकलचरल शो' फिरता असून तो दरसाल आळीपाळीनें निरनिराळ्या शहरीं भरतो. तो सुरू होऊन सत्तर वर्षें झालीं. येवढ्या मुदतींत तो ब्रिस्टल येथें भरण्याची ही तिसरी पाळी आहे. प्रत्येक प्रसंगीं या शहरीं राज्यकर्ते हजर राहिल्यानें त्याला शोभा आलेली होती. प्रदर्शनाची जागा उंचशा माळावर होती. त्याला 'डौन्स' ह्मणतात. तेथून शहर व आसपासचा प्रदेश, यांचा देखावा पुष्कळच विस्तीर्ण व रम्य दिसतो. जवळच ॲव्हन् नदीवर बांधलेला 'क्लिफ्टन्'चा तारेचा झुलता पूल आहे. या उंचवट्यावरून एकीकडे सुसमृद्ध कुरणें व उंचसखल टेंकड्या व दुसऱ्या बाजूला शहानशहांनीं नुकतीच चालू केलेली 'ॲव्हन मौथ'ची नवीन गोदी, व पलीकडे दूरवर महासागराच्या सदाचंचल व प्रचंड लाटा दृष्टीस पडतात. शेंकडो फूट खालीं नदीवर चालणाऱ्या आगबोटी 'लिलिपटियन' आकाराच्या,—भातुकलींतल्या सारख्या—व डोंगराच्या खोऱ्यांतील बोगद्यांतून आंत बाहेर जात असलेल्या आगगाड्या, मुलांच्या कळीच्या खेळण्यासारख्या वाटत होत्या. पठार, टेंकड्या व खोरीं, यांच्यावर तृणलतावृक्षादिक उद्भिज संपत्तीची समृद्धि होती. हें सर्व पाहून मला आमच्या देशांतील नर्मदा व तुंगभद्रा नद्यांच्या





प्रांतभागांतील, खडबडीत व भीषण, पण रम्य अशा देखाव्यांचें स्मरण झालें.

हें प्रदर्शन फारच भारी प्रमाणावर होतें. तेथें आलेलीं गुरेंच तीन हजारांवर होतीं. परंतु येथील सारी व्यवस्था इतकी अप्रतिम होती कीं, गोंधळ किंवा गडबड, यांचा कोठें मागमूस सुद्धां दृष्टीस पडला नाहीं. सर्व व्यवस्था निवळ यंत्रासारखी, टापटिपीनें व सुरळीत चालली होती. येथील बंदोबस्ताची जी पूर्णता व सफाई दिसून येत होती तिच्यावरून, प्राच्य व ब्रिटन यांच्यामधील पूर्ण व्यवस्थितपणा व बंदोबस्त, याविषयींच्या बुद्धिवैभवांतील विलक्षण फरकाची अद्वितीय साक्ष पटत होती. मी या गुरांच्या प्रदर्शनाला गेलों, तो, त्याच्या प्रेक्षणीयपणाविषयीं थोडाबहुत साशंक होत्साताच, हें मी कबूल करितों. प्राच्य देशांतून आलेल्यांना ब्रिटिश गाई बैलांमध्यें, त्यांच्या नित्य पाहण्यांत येणाऱ्या गुरांचा अप्रतिम आकार व रूप, यांच्या मानानें सुरेखपणा वाटण्याजोगें फारच थोडें असणार असें वाटतें. शिवाय, डेव्हनशायरमध्यें साऱ्या इंग्लंडांत अत्युत्तम म्हणून नांवाजलेल्यापैकीं कांहीं गाई व बैल मीं पूर्वींच पाहिलेले होते. त्या गाई फार दूध देतात, हा त्यांचा गुण माझ्या लक्षांत होता. पण त्यांचीं तीं अजस्र धुडें पाहून, मला तितकें समाधान वाटलें नाहीं. मात्र त्यांची निपज व अवलाद सुधारण्यासाठीं केलेले प्रयत्न व परिश्रम मला अर्थांतच पसंत होते.

पण हें ब्रिस्टल येथील प्रदर्शन मला नेत्रांजनासारखें झालें. तेथील असंख्यात वस्तुसंग्रहाचें मीं जें निरीक्षण केलें,त्यावरून या प्रदर्शनाचा सर्वसामान्य अत्युत्तमपणा माझ्या मनांत भरला आणि असें हें प्रदर्शन पाहण्यास सांपडलें हें आपलें भाग्य होय असें वाटलें. घोडे, बैल व गाई यांच्यामधील जणों अव्वल प्रतीचीं निवडक जनावरें तेथें आलेलीं होतीं. शिवाय, सर्वांत अतिशय प्रमुख व थोर धंदा जो शेतकीचा, त्याच्या सुधारणेसाठीं तयार केलेल्या व अगदीं आजतागायत योजिलेल्या क्लृप्त्या, आणि अगदीं ताज्या सुधारणांनीं युक्त यंत्रें व अवजारें तेथें मांडलेलीं होतीं. इकडील शेतकीमध्यें जी विलक्षण सुधारणा झालेली आहे, ती अशा संस्था व प्रदर्शनें यांच्या द्वारें मिळणारें उत्तेजन नसतें तर खचित झाली नसती. या सुधारणारूपी परिणामावरूनच अशा संस्था व प्रदर्शनें यांची आवश्यकता व महत्त्व उत्तम तऱ्हेनें सिद्ध होतें. अलीकडे हिंदुस्थानांत बरींच नवीन जागृती उत्पन्न झाली आहे. तिच्यामुळें इतउत्तर तिकडे शेतकी व तत्समान इतर धंदे यांची सुधारणा व अभिवृद्धि यांविषयीं प्रयत्न करण्याला अधिकाधिक उत्तेजन दिलें जाईल, अशी उमेद वाटते.

या प्रदर्शनामध्यें प्रमुख व अव्वल प्रतीच्या पेक्षणीय वस्तूंमध्यें गाई, बैल, बकरीं, मेंढरें व डुकरें, यांचे समूह हे होते. शिवाय, कोंबडीं, बदकें व खबुतरें यांचें प्रदर्शनही सुरेख होतें. बागाइताचें प्रदर्शन बरेंच मोठेंसें होतें व कुत्र्यांच्या प्रद-

र्शनाचीही एक शाखा होती. लोणी तयार करणें, मधमाशा पाळणें व इतर अशा प्रकारचे खेड्यांत चालणारे धंदे, यांचे रोज सामने होत, व त्यांची प्रत्यक्षतः कृति करून दाखविली जात असे. यांची शिक्षणाच्या दृष्टीनें थोडी किंमत होती, असें नाहीं. शेतकीपासून पैदा होणारे निरनिराळ्या तऱ्हेचे जिन्नस दाखविले जात होते. तेथें खेड्यापाड्यांतील शिक्षणपद्धतीचीही हेळसांड केली जात होती असें नाहीं. जंगलखातें, ज्याच्याकडे विलायतेमध्यें फार दिवसांपासून दुर्लक्ष झालेलें होतें, त्यालाही या कार्यक्रमामध्यें स्थळ मिळालेलें होतें. हा कार्यक्रम जणों सर्वव्यापी असा होता. प्रदर्शनांत आलेल्या सर्व वस्तूंचा तपशीलवार क्याटलाग विकत मिळत होता. हिंदुस्थानांत प्रदर्शनांत आलेल्या वस्तूंची यादी प्रदर्शन संपेपर्यंत सुद्धां तयार होण्याची मुष्कील.

घोड्यांच्या विभागांत आलेले घोडे चांगले नांवाजण्यासारखे होते. आजकालचें युग शास्त्रीय प्रगतीचें. मोटार गाड्या व यांत्रिक शक्तीनें चालणारीं इतर प्रवहणें यांची त्वरेनें भरभराट होऊन, तीं इतर वाहनें नामशेष करणार, असें दिसतें. तरी पण या प्रदर्शनावरून अश्वयानें हार जातीलसें दिसलें नाहीं. येथें आलेले ' शायर ' घोडे पाहून मला समाधान व आश्चर्य वाटलें. त्यांतही त्यांच्यांतल्या वळू घोड्यांचें रूप, बांधा व मजबूती, चित्रासारखी होती. अव्वल प्रतीच्या उत्तमोत्तम जोड्या, चौकड्या, वगैरे मीं लंडनमध्यें पूर्वींच पाहिल्या होत्या. यामुळें

त्यांचें मला येथें विशेष वाटलें नाहीं. एकंदरींत पाहतां येथें आलेले घोडे विशेषतः मेहनतीच्या व शेतकामाच्याच उपयोगाचे होते. 'हंटर्स' किंवा शिकारीच्या कामाच्या घोड्यांची, तसेंच 'शेटलंड' व 'पोलो पोनीज' ची संख्या पुष्कळशी होती असें नाहीं. तरी त्यांच्या अंगच्या गुणामुळें ती लोकांना फारच पसंत होती. त्यांचा अप्रतिम डौल प्रेक्षकांना आश्चर्यचकित करून टाकीत होता. येथें एक गोष्ट माझ्या विशेष लक्षांत आली, ती ही कीं, घोड्यांच्या शेपट्या कांपून टाकलेल्या होत्या. हिंदुस्थानांत याचा रिवाज नाहीं. 'अवर डंब फ्रेंड्स लीग'—मुक्या मित्रांचा साहाय्यकारी संघ—या उपयुक्त संस्थेच्याच मुख्यत्वें प्रयत्नामुळें ही चाल अलीकडे, इंग्लडांत बंद होत चालली आहे. हें ऐकून मला आनंद झाला. मुक्या जनावरांवर सक्ती व क्रूरपणा न व्हावा एतदर्थ ही संस्था अनेक प्रकारें झटत असते.

प्राच्य देशांत बैलांना वशिंड असतें. तें पाहण्याची आम्हांला नेहमींची संवय. त्यांचा इकडे अगदीं अभाव. यामुळें इकडील गुरें पाहतांना चुकल्यासारखें वाटत होतें. इकडील गुरें भारीच बोजड. हाही एक त्यांच्यामध्यें विशेष अवगुण आहे. येथील डेव्हनच्या विभागामध्यें हत्तीसारखीं गुरें पाहण्यांत येत होतीं. इकडे अशीं अजस्र गुरें असतात हें ज्यांना माहीत नाहीं, त्यांना इतकीं भारी व मोठीं गुरें इंग्लंडांत असतील, अशी कल्पना स्वप्नांत सुद्धां होणार नाहीं.

त्यांच्यामधील खोंड व पुष्कळसे बैल, फार भयंकर दिसतात. जर्सीचीं गुरें यांच्या अगदीं उलट गरीब व सौम्य अशीं होतीं. तीं दिसण्यांत कृश,तरी दुधाला फार चांगलीं असतात. अलीकडे कांहीं वर्षांपासून जर्सी व ग्वर्नसीचीं गुरें लोकांना फारच आवडूं लागलीं आहेत. याच जातीचीं गुरें विशेषत: अमेरिकेला पाठविण्यासाठीं खरेदी केलीं जातात. केरीचीं ठेंगणीं गुरेंही मीं पाहिलीं. तेव्हां मला दक्षिणेंत पंढरपुराजवळ आढळून येणाऱ्या वामनमूर्ती गाईंचें स्मरण झालें. पंढरपुराकडील गाई अगदींच दुध देत नाहींत परंतु या केरी येथील गाई, त्यांच्या आकाराच्या मानानें दुभत्याला चांगल्या असतात.

मेंढरें व बकरीं किती तरी प्रकारचीं आलेलीं होतीं.त्यांतील शिंगाडी बकरें विशेषत: उत्तम होतीं. त्यांची लोंकर चित्रविचित्र रंगविलेली असल्यानें त्या भागांतील देखावा मनोरम व मजेदार दिसत होता. साऱ्या प्रदर्शनांत यांपैकी प्रमुख जात केंट कौंटी मधील मोठी व लांब लोंकरीची होय. येथें आलेल्या कालवडी व डुकरें आकारानें फारच मोठीं होतीं. तीं इतकी कीं, या त्यांच्या अवजड अंगामुळें त्या डुकरांना नीट उभें सुद्धां राहतां येत नव्हतें आणि 'पिक्‌विक् पेपर्स' मध्यें वर्णन केलेल्या लठ्ठ पोराप्रमाणें नेहमीं निजलेलीं, अशी त्यांची स्थिति होती.

कोंबडीं व बदकें यांच्या शाखेमध्यें जवळ जवळ पंधराशें संख्या झालेली होती. त्याचें गुणमानही एकसहा चांगल्यांतलें होतें. विशेष काळजी घेऊन व बीजाचा फेरपालट करून वस्तुतः किती निरनिराळ्या तऱ्हा तयार करतां येतात, तें येथें स्पष्ट दिसत होतें. त्याचें मला फार आश्चर्य वाटलें. आकार, पिसारा, 'कोंब'–तुरा–, यांचे अनेक रंग व चमत्कारिक तऱ्हा, यामुळें ही शाखा या प्रदर्शनामध्यें, एक महत्त्वाचें व प्रेक्षणीय अंग बनलेली होती.

प्रदर्शनार्थ आलेल्या बागायती चिजांचें दर्शन ही एक नेत्रांना अप्रतिम मेजवानीच होती. अशीं बहारदार व सुंदर फुलें पूर्वीं कधीं माझ्या पाहण्यांत आलीं नव्हतीं. एवढ्याशा नियमित प्राकारांत असा अवर्णनीय सौंदर्याचा भपका आजवर कधीं अन्यत्र एकत्र केला गेला असेल किंवा नाहीं, याची शंकाच वाटते. लाल 'कारनेशन्'चीं फुलें अतिशय मजेदार गुलाबांशीं स्पर्धा करीत होतीं.सौम्यशीं 'स्वीट पीज' भव्य 'फुस-चियास'शीं नेटानें टक्कर देत होतीं आणि लाल शेंदरी 'जिरे-नियम्स' व पांढरीं तांबडीं 'पेलारगोनियम्स,' आपापल्या अप्रतिम रंगाच्या दंगलींत जणों मग्न झालेलीं होतीं. तसेंच तेथें शीत अशा 'फर्न्स', लहान लहान खडकाळ बगीच्यांमध्यें चतुराईनें लावलेल्या होत्या. या खडकाळ बगीच्यांतील रमणीय पुष्करण्यांच्या निश्चल जलावर शुभ्र वर्णाच्या पूर्णावस्थेला पावलेलीं 'वाटर लिलीज'–कमलें–वैभवश्रीनें ओथंबलेलीं दिसत

होतीं. प्रदर्शनार्थ आलेलीं फळें फारच रसाळ, लुसलुशित—एकदम तोंडांत टाकावीं इतकीं—व मनोहर होतीं. स्ट्रॉबेरी,' 'पीचेस,' 'नेक्टराइन्स' व द्राक्षें-पाहतांच तोंडाला पाणी सुटे. शाकभाज्या तरी कमी मनोहर होत्या असें नाहीं. 'टमाटे,' 'पीज,' बटाटे, 'बीन्स,' कोबीं, सर्वच इतकें कांहीं सुरेख व अप्रतिम होतें कीं, अशा भाज्या नेहमींच मिळाव्या अशी आह्मांपैकीं कांहींना लालसा वाटली.

यांत्रिक व व्यापारधंद्यासंबंधाच्या वस्तूंची एक मोठी व महत्त्वाची शाखा होती. तिच्या निरीक्षणापासून चांगलाच उपयोग व फायदा होण्यासारखा होता. शास्त्रीय प्रगति व तिचा शेतकीच्या गरजा भागविण्याला उपयोग कांहीं विलक्षण यंत्रकलांच्या द्वारें निदर्शनास येत होता. अशा कामासंबंधानें मोटारनें केलेलें आक्रमण पाहून, त्याच्या पुढें टिकाव लागणें अशक्य वाटूं लागतें. इकडे घोड्यांकडून जमीन नांगरण्याला दर एकरीं दहा शिलिंग—साडेसात रुपये—लागतात. तेंच काम मोटारनें साडेतीन रुपयांत होतें. यंत्रानें गाईची धार काढलेली पाहून किंवा ऐकून पूर्वज मंडळी—असतील तेथें—खचित विस्मयचकित होतील. या यंत्राची कल्पना अशी आहे कीं, गाईच्या भोंवतीं दोन रुंदट पट्टे बांधलेलें व त्यांना एक विलक्षणसें यंत्र लटकावलेलें असतें. तेंच धार काढतें, व दूध धरण्याची चरवीही त्यांतच. जवळच असलेल्या एका इंजिनापासून त्याला गती



१३

मिळते. युगानुयुगें पिढीजाद चालत आलेल्या रीतीऐवजीं ही चमत्कारिक पद्धत सुरू झालेली पाहूनही गाई स्वस्थ व बेदरकार उभ्या असतात.

पाणी काढणें, सामान वाहून नेणें, कापणी व मळणी करणें, वगैरे सर्व कामांचीं यंत्रें होतीं. पवनचक्क्या बागेंत पाणी देण्याचे कापडी व चामडयाचे नळ, व इतर पुष्कळच क्लृप्त्याही तेथें होत्या. विहिरीकरितां जमीनींत भोंक पाडण्याचें यंत्रही होतें. तें आपणा हिंदी लोकांना विशेष विचार करण्यासारखें आहे. त्यानें बरेंच खोल भोंक पाडतां येत होतें, असें ह्मणतात. तरी तें अद्यापि पुर्तेपणीं अजमावलेलें दिसत नाहीं. बेताच्या खर्चानें, पाण्याचा पत्ता लावून तें वर आणण्याजोगें एखादें यंत्र किंवा क्लृप्ती, कोणीं शोधून काढली तर, त्याचे हिंदुस्थानावर भारी उपकार होतील. निरनिराळ्या तऱ्हेचे पंप व विहिरींतून पाणी काढणें, धान्य दळणें वगैरे किरकोळ कामाला उपयोगीं पडणारीं लहानसर यंत्रें—इंजनें—ही माझ्या पाहण्यांत आलीं.

या प्रदर्शनांत शिक्षणाची बाजूही सुटलेली नव्हती. लोणी व चीज तयार करणें, व मधमाशा पाळणें, हीं कामें वरचेवर प्रत्यक्ष करून दाखविलीं जात होतीं. त्यामुळें प्रदर्शन विशेष मनोरंजक होत होतें. इतकेंच नव्हे, तर त्याची उपयुक्तताही वाढत होती. मधमाशा पाळण्याचें काम, विशेषतः हिंदुस्थानांत

फायदेशीर व्हावें; कारण, तिकडे सर्वत्र, त्यांतही, पहाडाजवळच्या भागांत फुलें हवीं तितकीं सांपडतात. उत्तरेकडील भागांतील ऋतुपालट या बाबतींत अवश्य लक्षांत घ्यावा लागेल. तथापि एकंदरींत हा धंदा विचार करण्याजोगा आहे. ब्रिटिश प्रदर्शनाचे उपयुक्त व कार्यक्षम उद्देश यांचें, हिंदुस्थानांतील प्रदर्शनें चांगलें लक्षपूर्वक अनुकरण करूं लागतील, तो दिवस हिंदुस्थानाला खचित मोठा भाग्याचा होईल. हल्लीं तिकडील प्रदर्शनें निव्वळ तमाशे. त्यांच्यापासून उपयोग थोडाच—मुळींच नाहीं म्हणण्यासारखा—होतो. इंग्लंडांत याच्या अगदीं उलट प्रकार आहे. येथील लोकांच्या अंगीं व्यापारधंद्याला अवश्य असे गुण उपजतच असतात. या गोष्टीचा पाहणाऱ्याच्या मनावर ठसा उमटल्याखेरीज राहात नाहीं. शेतकरी लोक अशीं प्रदर्शनें व तमाशे पाहण्यास जातात ते, केवळ चैनीखातर व मजा मारण्यालाच नव्हे; पण तेथें पिकाला व गुरें पैदा करण्याला काय केल्यानें फायदा होईल व त्यांच्यांत सुधारणा होईल, हें शोधून काढण्याकडे त्यांचें लक्ष राहतें. विलायतचे शेतकरी बियांच्या निवडीविषयीं काळजी घेतात ती पाहून, मला भारी आश्चर्य व कौतुक वाटलें. तेथें सर्व तऱ्हेचीं बीजें आलेलीं होतीं. शिवाय, तीं लहान लहान वाफ्यांमध्यें पेरून त्यांचा फायदा व विशिष्ट खतें घातल्यानें होणारे उपयोग, प्रत्यक्ष दाखविले जात होते. हिंदी शेतकरीही बियांची काळजी घेतात. पण या कामीं ते त्यांच्या विलायती व्यवसायबंधूंइतके प्रागतिक व उत्साहयुक्त

नाहींत. विलायती शेतकरी स्वतःची गरज उत्तम रीतीनें भागविणारें बीं शोधून काढण्याकरितां दूरवर जातात.

इंग्लिश प्रदर्शनांत कोणा शेतकऱ्याला इनाम मिळालें तर लोक त्याला धुंडीत राहतात. कारण, त्याच्याकडील माल जातिवंत असतो, हें त्यांना माहीत असतें. इनाम मिळणें हीच त्या उत्तमपणाची सनद समजली जाते. लोक त्याजकडून बीं खरेदी करून त्यास मदत करितात व उत्तेजन देतात. पण हिंदुस्थानांत अशांची कोणी पर्वा करीत नाहीं. त्याच्याकडे दुर्लक्ष होतें. ब्रिस्टल येथें प्रदर्शनांत आलेल्या नगांची तपासणी चाललेली होती. ती लोकांना मोकळेपणीं पाहण्याला मिळावी ह्मणून मोठमोठे ‘स्टँड्स’—चबुत्रे—केलेले होते. जमलेले लोक, चाललेलें तपासणीचें काम, उत्सुकतेनें, समजुतीनें, व लक्षपूर्वक पाहात व तपाशीत असत. एखाद्या वस्तूला पहिल्या प्रतीचें इनाम मिळालें तर तें कां? हा अभिलाष उत्पन्न करणारा बहुमान त्याला कोणच्या गुणामुळें देण्यांत आला? याची लोक चौकशी करीत. हिंदुस्थानामध्यें उत्साहयुक्त कार्यकर्तृत्व व विश्वास दोहोंचीही लोकांमध्यें उणीव आहे. ब्रिस्टल येथें आणखी एक विशेष गोष्ट माझ्या ध्यानांत आली. ती ही कीं, मामूली शेतकऱ्यांशिवाय चांगले संपन्न व सरदारी थाटानें राहणारे, अशा पुष्कळशा लोकांनीं येथें प्रदर्शनासाठीं तयार केलेल्या वस्तू पाठविल्या होत्या. अशा बड्या लोकांना देखील प्रदर्शनामध्यें इनाम मिळविण्याचा मोठा अभिमान वाटतो.

खुद्द शहानशहा, डयूक ऑफ् वेस्टमिन्स्टर, डयूक ऑफ् डेव्हनशायर, लॉर्ड राथ्सचाइल्ड आणि सर वाल्टर गिल्बे, अशा सारख्यांनाही इनामें मिळाली होतीं. शहानशहाला एका आंखूडशिंगी कालवडीबद्दल पहिल्या प्रतीचें व एका हरफर्डशायरच्या खोंडासाठीं दुसऱ्या प्रतीचें अशीं इनामें मिळालीं होतीं व आंखूडशिंगी खोंडाच्या वर्गामध्यें त्यांना शिफारसपत्र मिळालेलें होतें.

न्याायाधीशाचें काम करणारी मंडळी भीड, मुरवत, भय, कांहीं एक मनांत न आणितां ताबडतोब निकाल देतात. त्यांच्यावर व त्यांनीं दिलेल्या निकालावर, सर्व लोकांचा पूर्ण विश्वास असतो. अशी ही महनीय स्थिति आम्हांलाही प्राप्त करून घेतां येईल, तर हिंदुस्थानाचें कल्याण होईल. तेथें एक घडलेली मजेदार गोष्ट मला सांगण्यांत आली. त्यावरून ब्रिटिश रीतरिवाजाची सत्यप्रियता व स्वतंत्रपणा, यांचा उत्तम दाखला मिळतो. कांहीं वर्षांखालीं इराणचे परलोकवासी शहा विलायतेस गेल्यावेळीं एक प्रदर्शन पाहण्यास गेले होते. त्या प्रदर्शनांत परलोकवासी बादशहा सातवे एड्वर्ड—त्यावेळीं ते प्रिन्स् ऑफ् वेल्स होते—यांना कांहीं इनामें मिळालीं; पण तीं कांहीं सारींच पहिल्या प्रतीचीं नव्हतीं. तेव्हां युवराजाला इतरांहून कमी दर्जाचीं इनामें देणारे न्यायाधीश, आणि त्यांच्यापेक्षां अधिक दर्जाचीं बक्षिसें मिळून स्वस्थ बसणारे लोक, यांच्या राजद्रोही वर्तनाविषयीं वाटलेला उद्वेग व भीति शहांनीं व्यक्त केली. त्यांतही त्या हरामखोरांना देहांत प्रायश्चित्त दिलें जाणार नाहीं,

हें ऐकून तर त्यांना भारीच आश्चर्य वाटलें व त्यांच्या मनाला कांहींसा धक्काही बसला होता असें म्हणतात.

येथें अन्नमय प्राणात्म्याची तृप्ति होण्यासाठीं केलेल्या व्यवस्थांचेंही वर्णन केल्याशिवाय हें प्रदर्शनाचें वर्णन पुरें होणार नाहीं. लहान लहान पण सुरेखशा मंडपांमध्यें सर्व तऱ्हेच्या उपाहारांची सोय केलेली होती. तेथें 'लंचेस्'–भोजनें–व फराळ, प्रत्येकीं अर्धा क्रौन–दोन रुपयां–पासून दहा शिलिंग–साडेसात रुपयां–पर्यंत मिळत होते. इंग्लंडांतील बहुतेक साऱ्या सार्वजनिक प्रसंगीं अशीच व्यवस्था केली जाते. तिकडे घर सोडून बाहेर व परक्याबरोबरही खानपान करण्याचा सार्वत्रिक प्रचार आहे. तो हिंदुस्थानांतील चालीरीतीच्या उलट आहे. तिकडील हवेमुळें भूक विशेष लागते. घराबाहेर कांहीं काळ घालविल्यानंतर थकवा आलासें वाटतें.

स्थळविशेष व सुरेखशी बांधणुकीची तऱ्हा, या बाबतींत विलायतेंतील इतर थोडींच शहरें बाथ शहराची बरोबरी करितात. तें समुद्रापासून दूर आहे. तेथें 'स्पा' किंवा औषधिगुणांनीं युक्त अशा जलाचे झरे आहेत. जवळच एक तऱ्हेच्या दगडाच्या खाणी आहेत. तेथील घरें त्याच दगडाचीं बांधलेलीं आहेत. घरांच्या सुंदर गच्च्या, चौक, 'क्रिसेंटस्,'–चंद्रकोरीच्या आकाराचीं स्थळें–व सुंदर बागबगीचे, यांच्या मुळें तेथील देखावा मोठा रमणीय चित्रासारखा दिसतो. तेथें

उन्हाळ्याचीं स्नानगृहें आहेत, त्यांवरून त्याला हें नांव पडलें आहे. हीं उन्हाळीं व औषधिक्षारयुक्त जलाचे झरे, यांच्या योगानें या शहराला जलरूपी औषधोपचार घेण्याची फ्याशने-बल जागा ह्मणून रोमन लोकांच्या वेळेपासून आजतागायत महत्त्व प्राप्त झालें आहे. तें स्थळ पाहून माझें मन फार रमलें. व त्यावरून तें इतकें लोकप्रिय कां व कशासाठीं आहे, तें मला कळून आलें. येथील औषधिजलाचें सेवन करण्यासाठीं एलिझाबेथ राणी नेहमीं जात असे, असें मला सांगण्यांत आलें. यांच्या औषधिगुणांपासून फायदा करून घेण्यास येणाऱ्या लोकांच्या आरोग्यवृद्धीपुरताच नव्हे, तर साऱ्या शहराच्या फायद्यासाठींही या झऱ्यांचा उपयोग केला जात आहे, हें पाहून मला बरेंच आश्चर्य वाटलें. त्या शहराला त्यांच्यापासून कमी उत्पन्न होतें असें नाहीं. तेथील लोकांचें आरोग्य व आराम, यांच्यासाठीं केलेल्या साऱ्या सोई मीं पाहिल्या. त्यावरून तेथील स्थानिक अधिकारी लोकांच्या फायदेशीर व धंदेवाईक धोरणाची साक्ष पटत होती.

लंडन शहरांतील ' सीझन '—ठरीव चैनीच्या दिवसांतील मजा मारणें—आपटल्यावर, तेथील वरिष्ठ दर्जाचे लोक बाथकडे धांव घेतात. विशेष धनाढ्य मंडळी ' कांटिनेंट' वर—युरोपांत—फेर फटक्याला जातात. आणि तिकडे आरोग्य संपादन करून ते पुनः त्याच चैनीच्या व मजा मारण्याच्या धुमश्चक्रींत घुसण्याला योग्य होऊन परत येतात. यांतील कांहीं

लोकांना—त्यांतही विशेषत: तरुण मंडळीला—हीं आरोग्य-प्राप्तीचीं स्थळें निव्वळ चैनबाजी व मजा मारणें, यांचे अड्डे होतात. अशा लोकांच्या गरजा भागविण्याकरितां तऱ्हे तऱ्हेचे चित्ताकर्षक प्रकार—बँड वादनाचे जलसे, गायन वादन, इतर गमती व खेळ, तमाशे, वगैरेंचा येथें मनमुराद पुरवठा असतो. हिंदुस्थानांतही—विशेषत: कोंकणांत—अशीं अप्रतिम स्थळें व उन्हाळीं असलेल्या जागा, पुष्कळशा आहेत. पण त्यांचा फायदेशीर रीतीनें उपयोग केला जात नाहीं, याचें वाईट वाटतें. इंग्लंडांतील 'स्पा'—औषधिगुणांनीं युक्त झरे—यांच्या तऱ्हेवर, हीं स्थळें उपयोगांत आणण्याचा उद्योग झाला तर, युरोपियन लोक, आरोग्यप्राप्तीसाठीं केरो वगैरेला जातात, त्याऐवजीं हिंदुस्थानाला जाण्यासाठीं त्यांचीं मनें वळवितां येतील, असें मला वाटलें. हीं स्थळें मुंबईपासून सहज पोहोंचतां येण्या-जोगीं असलीं तर जास्तच सोईचें होईल. या बाबतींत जावानें सुद्धां हिंदुस्थानाला कित्ता घालून दिला आहे. गत-वर्षीं मी तेथें गेलों होतों तेव्हां, हीं सुंदर व रमणीय स्थळें व झरे, यांचा पुष्कळच उपयोग करून घेतला जात होता, हें मीं प्रत्यक्ष पाहिलें. हिंदुस्थानांतील श्रीमान् लोकांनीं आलेल्या संधीचा फायदा घेऊन या बाबतींत विचार करण्याजोगा आहे.

बाथ येथें थोडेच दिवस राहून मी आगगाडीनें निघालों. त्यावेळीं परत इंग्लंडांत शहराबाहेरच्या मोकळ्या प्रदेशां-तील संधिप्रकाशाचा अपूर्व देखावा पाहण्याची प्रथमच व

अमोल संधी मला त्या दिवशीं अवचित मिळाली. या देखाव्यासंबंधानें मीं पुष्कळचसें ऐकिलें होतें. तो प्रत्यक्ष पाहण्याची मला भारी इच्छा होती. लंडनमध्यें मीं तो पाहिला होता. पण तो या वेळीं पाहण्यांत आला त्या मानानें, कांहींच नव्हता. गाडी बाथहून सुटली त्यावेळीं अस्तोन्मुख सूर्याच्या प्रभेनें तें सारें शहर सुस्नात होऊन, त्या देखाव्याला नवीनच सौंदर्य आलें होतें. आकाशांत विलक्षण वर्णवैचित्र्याच्या रेखांचा समुदाय दिसत होता. त्याचें यथार्थ वर्णन किंवा चित्र, अप्रतिम लेखक अथवा कुशलतम चित्रकार, यांच्या शब्दांनीं किंवा कलमानें, पुर्तेपणीं होणें शक्य नव्हतें. रसरसित प्रभेच्या योगानें सारें आकाश जणों तुडुंब भरलेल्या दीप्तिमान् सागरासारखें भासत होतें. तथापि हा संधिप्रकाशाचा देखावा हिंदुस्थानांत जो वारंवार दृष्टीस पडतो तितका भपकेदार नव्हता. घरेंदारें व आसमंद्वात् भाग, अधिकाधिक अस्पष्टसे होऊं लागले. तरी एक तऱ्हेचा प्रकाश अवशिष्ट होता. अखेर तोही रात्रीच्या काळोखामध्यें लुप्त होऊन गेला. तो देखावा प्रशांत रमणीय वाटला. पुढें तोही बदलला व रजतकुंभसम रजनीकर नीलवर्ण गगनांतरांत उदयास आला. त्याचा फिक्कट प्रकाश टेंकड्यांवर व दऱ्याखोऱ्यांमध्यें पसरला. त्यावेळीं तो देखावा जास्तच सुंदर व शोभायमान दिसूं लागला.

# भाग पंधरावा.

## स्कॉटलंडची राजधानी.

'निसर्गदेवतेच्या एकाच स्पर्शमात्रानें सारें जग आप्त होतें.'

शेक्सपियर.

'वस्तुमात्राच्या प्रभेमध्यें पुढें सरा. निसर्गदेवता तुमची शिक्षक होऊं द्या.'

वर्डस्वर्थ.

स्कॉट व बर्न्स यांच्या भूमीमध्यें पोहोंचतांच, माझ्या मनामध्यें जी आनंदकलिका उत्पन्न झाली, तिचा मला सहसा विसर पडणार नाहीं. म्यान्चेस्टरहून निघाल्यावर उत्तरेकडील कोळशांच्या खाणी असलेल्या भागांतून जातांना, निबिड व कृष्णवर्ण धुरानें सारें आकाश अभ्राच्छादितसें झालेलें होतें. अशा स्थितींत एडिन्बरो शहराचा सुंदर देखावा पाहून, अंधारांतून निघतांच एकदम लख्ख प्रकाश दृष्टीस पडावा, तसा आनंद झाला. आम्ही तेथें प्रिन्सेस स्ट्रीट मधील 'रॉयल हाटेल' मध्यें उतरलों. खुद्द शहानशहा तेथें दोन वेळ उतरल्याचा बहुमान त्याला मिळालेला आहे. त्यांतून एकदां तर

'प्रिन्स् ऑफ् वेल्स्' असतांना, महाराणी मेरीशीं लग्न केल्या-वर लौकरच. साऱ्या दुनियेंतील अप्रतिम शोभिवंत राजमार्गां-पैकीं एक म्हणून या प्रिन्सेस स्ट्रीटची प्रसिद्धि आहे. या रस्त्यावरून सहल करतांना खरोखरीच भारी आनंद होतो. तो मैलभर लांब आहे. त्याच्यासमोर सुरेखसे बगीचे असून सर वॉल्टर स्कॉटचें प्रचंड स्मारक बांधलेलें आहे. तें दोनशें फूट उंच आहे व त्याच्यामुळें त्या राजमार्गाला चांगली शोभा आलेली आहे. त्याच्यावरून पलीकडे सुरेख हिरवींगार उतरतीं मैदानें, आणि एक खोल खोरें असून, त्याच्याही पुढें एकावर एक सुंदर व रम्य उंचवटे, चित्रासारखे दिसतात. तिकडेच शहराचे जुने भाग बरेच स्पष्ट व मजेदार पाहण्यांत येतात. त्या सर्वांच्या वर 'सेंट जाइल्स'चें भव्य 'क्याथीड्रल' व पलीकडे येथील इतिहासप्रसिद्ध किल्ला हीं आहेत.

एडिन्बरोचा किल्ला ब्रिटिश इतिहासामध्यें एक चिरस्मरणीय स्थळ आहे. इंग्लंड व स्कॉट्लंडचीं राज्यें एकत्र झालीं त्यावेळीं या दोन्ही राष्ट्रांच्या दरम्यान ठरलेल्या कराराअन्वयें हा किल्ला नेहमीं चांगला दुरुस्त व लढण्यास जय्यत राखला पाहिजे, असा ठराव आहे. सुमारें २०० वर्षां-पूर्वीं इंग्लंडांत आपापसांत यादवी चालू होती. तेव्हां एडिन्बरो शहर बंडखोरांच्या कबजांत आणि किल्ला तत्कालीन सरकारी फौजेच्या हातीं होता. या किल्ल्यांत शेंकडो वर्षें स्कॉटिश् राजांची राजधानी होती. तेथील

'क्रौनरूम'—राजमुकुटाच्या कमऱ्या—मध्यें स्कॉटिश् राजमुकुट, आणि इतर राजचिन्हें व जवाहीर वगैरे, आम्हीं पाहिलें. प्राचीन स्कॉटिश् राष्ट्रीयपणा व स्वातंत्र्य यांचीं हीं स्मारकें आहेत. जेम्स राजाला चोरून बाप्तिस्मा देण्यासाठीं एका झरोक्यांतून २०० फूट खालीं सोडलें होतें, तो झरोकाही आम्हीं पाहिला. त्या किल्ल्याभोंवतीं खूप खोल खंदक आहे व बुरूज उंच व खडे आहेत. रस्ते वळणावळणाचे असून त्यांच्यांत पायऱ्या आहेत. या सर्व प्रकारावरून मला प्राचीन रजपूत किल्ल्यांचें स्मरण झालें. ते यांच्याहून पुष्कळ मोठे, व एखाद्या गांवाप्रमाणें विस्तृत असतात. या किल्ल्यांतील शिबंदींत बरेचसे शिपाई हिंदुस्थानांत नोकरी करून आलेले होते. याचें मला कौतुक वाटलें. त्यांच्या मुख्य अंमलदारानें येऊन आमच्याशीं गप्पा गोष्टी केल्या. त्या शिपायांना सुद्धां, पुनः आह्मां हिंदी लोकांना पाहून आनंद वाटलासें दिसत होतें.

'सफ्रेजेट्'—मताभिलाषी—बायांचा आततायीपणा व दांडगाई, यांमुळें होली रूड राजवाडा बंद होता. तो पाहण्यासाठीं लंडनला तार पाठवून परवानगी आणविली. हा राजवाडा सुरेख आहे. पण तो विंड्सर किंवा फान्टेनूब्लोच्या तोडीचा नाहीं. फ्रान्स देशांत नेपोलियनचें नांव सदासर्वदा कानीं येतें. तद्वत् स्कॉट्लंडमध्यें जिकडे तिकडे 'मेरी क्वीन ऑफ् स्कॉट्स' (स्कॉट्लंडची राणी मेरी) इचें नांव ऐकूं येतें. या हत-

भागी राणीविषयीं इंग्लिश किंवा स्कॉट् लोकांच्या मनांत जो आदरभाव आहे, त्यांच्या मनोवृत्तीप्रमाणें मला आपली मनोवृत्ति करतां आली नाहीं. तिचे या राजवाड्यांतील कमरे अद्यापि चांगल्या स्थितींत ठेवलेले आहेत. तिचा बिछाना, हल्लीं त्याची आरास जीर्ण झालेली असली तरी, जपून ठेवला आहे. कशीद्याचें व जरतारी काम करणें तिला फार प्रिय असे व तिची ती मुख्य करमणूक होती. तेव्हां हें काम करतेवेळीं उपयोगी पडणारी अशी तिची कशीद्याच्या सामानाची पेटी व अशींच तिचीं दुसरीं स्मारकेंही ठेवलेलीं आहेत. तसबिरींच्या दालनांत शंभरांवर स्कॉटिश् राजांच्या तसबिरी टांगलेल्या आहेत. त्यांचें काम साधारण ओबडधोबडच आहे.तरी ते चित्रपट पाहून 'स्कॉटिश्' राजमुकुट धारण करणाऱ्यांवर ओढवलेल्या दैवाच्या चमत्कारिक फेऱ्यांचें स्मरण झाल्यावांचून राहात नाहीं. महाराणी व्हिक्टोरिया, किंग एडवर्ड, व हल्लींचे शहानशहा, या राजवाड्यांत थोडे दिवस राहून गेले आहेत. या राजवाड्याच्या जागीं पूर्वीं 'होली रूड'–पवित्र क्रास–ला समर्पण केलेला एक 'ॲबे'–मठ–होता, त्यावरून या राजवाड्याला हें नांव पडलें.

येथील 'पार्लमेंट हौस'च्या पुढें दुसऱ्या चार्लस राजाचा एक घोड्यावर बसलेला सुरेखसा पुतळा आहे. सन १७०७ सालीं दोन्ही राज्यें एक झालीं तोंवर, तेथें 'स्कॉटिश् पार्लिमेंट'

भरत असे. अलीकडे तेथें 'कोर्ट आफ् सेशन्स' भरतें. तेथें एक भारी मोठें पुस्तकालय आहे. त्याच्यांत ३२०००० वर छापील पुस्तकें, पुष्कळसे हस्तलिखित ग्रंथ, व वाङ्मयविषयक विलक्षण व प्रेक्षणीय वस्तू ठेवलेल्या आहेत.

तेथील पुष्कळशा पेढ्या व सराफी दुकानें, यांविषयीं या स्कॉटलंडच्या राजधानीची प्रसिद्धि आहे. त्यांच्यावरून या लोकांच्या काटकसरी स्वभावाची साक्ष पटते. येथें 'पीपल्स ब्यांक' नांवाची एक लहानशी व साधीच संस्था आहे. ती मीं पाहिली. ती पाहून मला मोठें समाधान झालें व आनंद वाटला. ती सहकारी पतपेढ्यांच्या तत्त्वावर काम करिते. तेथें मेंबर लोकांना हलक्या व्याजानें कर्ज मिळतें व त्या द्वारें त्यांना राहत्या घराचें मालक बनण्याला साधन होतें. विद्यालयें व विद्यापीठें यांना मिळालेल्या देणग्यांसंबंधानें, हें शहर भारी भाग्यवान् आहे. मुलांचें संगोपन व शिक्षण, यासाठींही येथें पुष्कळशीं इस्पितळें आहेत. त्यांच्यांत 'धी हेरियट्' व 'डोनाल्डसन् हॉस्पिटल,' हीं विशेष महशूर व महत्त्वाचीं आहेत.

येथील 'रॉयल इन्फर्मरी' ही अतिशय भव्य व भपकेदार इमारतींपैकी एक आहे. तिचें आवार बारा एकर आहे. तिला सुमारें पाऊणकोट रुपये खर्च आला. तिची बांधणी 'स्कॉटिश् बॅरोनियल् स्टाइल'ची आहे. त्याच्यांत 'पॅव्हिलियन् सिस्टिम'—

मंडपाची तऱ्हा—अमलांत आणिलेली आहे. तिच्यामुळें चोहीं-कडे मोकळी हवा खेळण्याला सवड राहते. तेथें सुमारें ९०० रोगी राहण्याची सोय आहे. शिवाय, प्रतिवर्षी स्कॉट्लंडच्या सर्व भागांतून ३०००० वर बाहेरचे रोगी औषधासाठीं येतात. लोकांनीं मृत्युपत्राअन्वयें दिलेल्या कायमच्या देणग्या आणि आपखुषीनें दिलेल्या वर्गण्या यांच्यावर याचा खर्च चालतो. तेथें १२० नर्सेस् किंवा दाया, यांची एक लहानशी फौजच कामा-वर आहे.

येथें आणखी एक इमारत मनांत भरण्यासारखी आहे. ती येथील युनिव्हार्सिटीची होय. तिच्यावर फारच डौलदार घुमट आहे. त्या घुमटावर, हातीं ज्ञानाची मशाल धरलेला युवकाचा पुतळा आहे. त्यामुळें ती इमारत फारच उठून दिसते. तेथील पुस्तकालयांत सुमारें दोन लक्ष पुस्तकें व सात हजार हस्तलि-खित ग्रंथ आहेत. त्या ग्रंथांपैकीं पुष्कळस ऐतिहासिक महत्त्वाचे आहेत. या युनिव्हर्सिटीच्या अध्यापक वर्गामध्यें धर्म व नीती, कायदेकानू, वैद्यक, वाङ्मय, गायन वादनादि ललितकला, आणि भौतिक शास्त्रें, अशा सहा शाखांमध्यें मिळून ४० प्रोफे-सर्स नेमलेले आहेत. तेथील 'फेलोशिप्स्'—पगारी उपशि-क्षकांच्या जागा,—'बर्सरीज्'—पारितोषकें,—आणि 'स्कॉलर-शिप्स्'—पगारी विद्यार्थ्यांच्या जागा,—मिळून दोनशेंच्या वर व सुमारें अकरा हजार पौंड वार्षिक किमतीच्या आहेत. तेथें प्रत्येक 'सीझन'—कार्यक्रम सुरू करण्याच्या नियमित

काळा—मध्यें सरासरी तीन हजारांवर विद्यार्थी, विशेषेंकरून वैद्यक-शाखेंत, भरती होतात. या युनिव्हर्सिटीमध्यें सुमारें दोनशें विद्यार्थिणी आहेत. ही गोष्ट, पाश्चिमात्य देशांतील स्त्रियांच्या प्रगतीची द्योतक म्हणून, लक्षांत ठेवण्यासारखी आहे. वैद्यक आणि शस्त्रक्रिया या संबंधांत एडिन्बरोची फारां दिवसांपासून प्रख्याती आहे. या शाखांमध्यें भराभर अतिशय वाढ झाल्यामुळें या युनिव्हर्सिटीमधील 'लॅबोर-टरीज्'—सप्रयोग शास्त्रीय शिक्षण देण्याच्या जागा—व वैद्यकीच्या वर्गांना शिक्षण देण्यासाठीं दालनें, यांच्या साठीं जवळच स्वतंत्र व प्रशस्त चाळी बांधाव्या लागल्या आहेत. येथील साऱ्या वैद्यकी कॉलेजांत मिळून सुमारें दोनशें 'एशियाटिक'—प्राच्य--विद्यार्थी आहेत. त्यांच्यांतील पुष्कळच मोठा भाग हिंदी विद्यार्थ्यांचा आहे. हें एकून मला कौतुक व समाधान वाटलें.

या शहरांतील इमारतीचें बांधकाम रेतीच्या दगडाचें आहे. तो दगड चांगला मजबूत व टिकाऊ आहे. त्यामुळें इमारतीचें बाह्य स्वरूप भक्कम दिसतें. या देशांतील बरीचशी जमीनदार व घराणदार मंडळी, एडिन्बरो मध्येंच राहते. शिवाय, तेथें शिक्षणसंबंधी सोई पुष्कळ असल्यामुळेंही बरीचशी मंडळी येथें येऊन राहते. या शहरांत अनेक सुंदर चौक, व प्रशस्त राज-मार्ग आहेत. तेथील बांधणुकीची तऱ्हा मात्र काहींशी एकच जातीची तरी पायाशुद्ध आहे.

फोर्थ नदीवरील पूल येथून जवळच आहे. तो पाहून आल्याशिवाय, एडिनबरोची सफर, खरी पुरती झाली, असें ह्मणतां येत नाहीं. साऱ्या दुनियेंतील शिल्पकलेच्या अद्भुत महत्कृत्यांपैकींच हा एक पूल आहे. लीथ येथील गोदींतून एका लहानशा आगबोटींत बसून आह्मी तो पाहण्यास निघालों. वाटेंत लॉर्ड रोजबरी यांची डलमेनी येथील सुरेख इस्टेट लागते. त्या इस्टेटीमध्यें एक अप्रतिम महाल आहे. त्याच्या पुढें थेट समुद्रकिनाऱ्यापर्यंत भव्य व रमणीय वृक्षराजी लागलेल्या आहेत. त्यांच्या गर्द पानांमधून, तो महाल किंचित् अस्पष्टसा दिसत होता. 'फोर्थ' पूल आठ हजार फुटांपेक्षां अधिक लांब, आणि तळच्या पायापासून साडेचारशें फूट उंच, आहे. त्या पुलाला 'क्यॉंटिलिव्हर' किंवा सारखे लांबच लांब लोखंडी 'गर्डर'—तुळई—दोन कंस एकत्र जोडून झालेल्या आकाराचे लावलेले आहेत. खालच्या भागाचा कंस नेहमींच्या स्थितींत असून तो रेल-वेचा भार दाबाच्या द्वारें आणि वरच्या भागाचा कंस उलट स्थितींत बसविला असून तो तणाव्याच्या द्वारें तोलतो. दोन्ही भाग एकमेकांत खूप मजबूत सांधलेले आहेत. सारें काम खरोखर कधींच धक्का न लागण्याजोगेंसें झालेलें दिसतें. या 'क्यॉंटिलि-व्हर्स,' बांधून काढलेल्या दगडी खांबांवर ठेवलेल्या आहेत. त्या खांबांचा पाया, पाण्याखालीं पन्नासपासून नव्वद फूट, इतका खोल नेलेला आहे. तळाशीं त्यांचा व्यास सत्तर फूट, व माथ्याला साठ फूट, आहे. या 'क्यॉंटिलिव्हर्स'चे मुख्य

'पियर्स'—खांब—बारा फूट व्यासाचे आहेत. ते पोलादी नळाचे असून त्यांची उंची तीनशें सत्तर फूट आहे. रेलवे लाईन, महापूराच्याही वर, एकशें साठ फूटांवरून नेली आहे. या अजस्र कामाला पन्नास हजार टन पोलाद लागलें. तें पक्कें जखडण्याला ऐशीं लक्ष, पच्ची केलेले 'रिव्हेट्स'—लोखंडी खिळे—ठोकलेले आहेत. 'क्यॅंटिलिव्हर'च्या नळांतील वांकविलेले पोलादी पत्रे, सारखे ओळीनें मांडले तर, त्यांची लांबी बत्तीस मैल होईल. या पुलामधील पोलादी कामाच्या सपाटीचा विस्तार पंचवीस एकर आहे. त्याला एकवार तेलिया रंगाचा हात देण्याला अडीचशें टन रंग व पस्तीस हजार ग्यालन अळशीचें तेल लागतें !

या स्कॉटलंडच्या राजधानींत नवीनच जाणाऱ्याच्या लक्षांत एक तऱ्हा अवश्य येते. तेथें पुष्कळशीं मुलें व मुली रस्त्यांत अनवाणी फिरत असतात. गरीब लोकांचीं बहुतेक मुलें, बुद्ध्या आवडीनें, किंवा निरुपायानें, हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत सुद्धां, पायांत कांहींच घालीत नाहींत, असें मला सांगण्यांत आलें. त्यावेळीं मी ब्रिटिश बूट वापरण्याची दुस्सह वेदना भोगीत होतों. त्या मुलांना पाहून मला वाटलें कीं, इकडील लोक 'फ्याशन' रूपी 'टायरंट'—जबरदस्ता—ला धाब्यावर बसवून, सरसकट हिंदुस्थानांतल्याप्रमाणें मोकळे व सैल जोडे वापरतील—निदान हिंवाळ्याशिवाय बुटांना बिलकुल फांटा देतील तर, त्यांना किती तरी सुख व आराम होईल. एडिनबरोमध्यें अनवाणी फिरणाऱ्या मुलांमुलींचा

देखावा माझ्या साध्या रहाणीच्या कल्पनेला अगदीं अनुरूप होता. त्यांनीं, याप्रमाणें जनरूढीला धाब्यावर बसविल्यामुळें, नुकसानाच्या ऐवजीं त्यांचा फायदाच होत असल्याचें दिसलें. कारण तीं बहुतेक लालबुंद, आरोग्याचीं मूर्तिमंत चित्रेंच दिसत होतीं. पहाडी प्रदेशांत राहणाऱ्या लोकांना शारीरिक व मानसिक आरोग्य पूर्णपणें मिळतें, अशी सामान्यतः कल्पना आहे. स्कॉटलंड मध्यें बहुतेक लोक त्या स्थितीचा उपभोग घेत असल्याचें प्रत्ययास येत होतें.

एडिनबरोमध्यें असतांना मी मोटारनें पीबल्स येथें गेलों. त्या वेळीं सुदैवानें तेथें 'इंटरन्याशनल समर स्कूल'चें वार्षिक सम्मेलन चाललें होतें. तें 'हैड्रोपाथिक हॉटेल' मध्यें भरलें होतें. त्यांतील प्रशस्त दालनें व आसपासचा रमणीय भूभाग, हे त्या संम्मेलनासाठीं अगदीं हवें तसें योग्य स्थळ होतें. खुद्द ग्रेटब्रिटन, अमेरिका व इतर पुष्कळसे देश, यांच्या मधून तेथें सुमारें दोनशें 'डेलिगेट्स'–प्रतिनिधी–आलेले होते. तेथें धर्म व नीती यांच्यासंबंधी सांप्रदायिक भेदाभेद लक्षांत न आणतां ऊहापोह चालला होता. प्रमुख मंडळी व्याख्यानें देत होती. धार्मिक विषयांतील महत्त्वाच्या प्रश्नांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं, प्रवचनें चाललीं होतीं. उघड्या जागेंत, मोकळ्या हवेंत, अनुपम सुंदर व मोहक वस्तूंनीं व्याप्त स्थळामध्यें, हिरण्मय सूर्यतेज सपाटून वर्षत असतांना, नितांत महत्त्वाच्या आत्मानात्मविषयक गूढ तत्त्वांकडे मन वळून, चित्तवृत्ती

आपोआपच उच्च ध्येयांमध्यें तन्मयशा होतात. हें सम्मेलन पाहून मला प्राचीन ऋषींच्या सत्रांचें स्मरण झालें. तीं सत्रें प्राचीन काळीं वनप्रदेशांतील प्रशांत व एकांत स्थळीं होत असत. तेथें मुमुक्षु लोक ज्ञानसंपादनासाठीं जात. त्या प्रसंगीं सत्याचें निरूपण आतुर श्रोतृवृंदाच्या कर्णरंध्रांवर पडत असे. या प्रसंगीं, बुद्धदेव मोकळ्या हवेंत मैदानांत उपदेश करीत असत, त्या दिवसांचेंही कोणाकोणाला स्मरण होण्याजोगें होतें.

अशा सम्मेलनामध्यें सर्व तऱ्हेच्या धर्मपंथांतल्या लोकांना एकत्र जमून, धार्मिक प्रश्नासंबंधीं विचारविनिमय करण्याला संधि मिळते इतकेंच नसून, त्याच्यापासून नैतिक व धार्मिक तत्त्वांच्या निरनिराळ्या रूपांवर लक्ष वेधण्याला व विचार केंद्रगत करण्याला स्फूर्ति येते. तसेंच नवीन शोध व सुशीलता यांना उत्तेजन मिळतें. सामान्यजनसमूहाच्या मनावरही अशा सम्मेलनाचा चांगला परिणाम घडल्याशिवाय राहात नाहीं. या जगांत धर्माची खरी किंमत काय आहे, याविषयीं सामान्यजनसमूहाला—त्यांतही पाश्चिमात्य जनसमूहाला—प्रसंगोपात्त जाणीव करून दिली जात राहणें, अगदीं अवश्य आहे. कारण, धर्माच्या व्यवहारावरील वजनाच्या बाबतींत आपण एक तऱ्हेची तद्ग्राह्य व तद्वरिष्ठ अशी वृत्ति ठेवतों, असें दाखविणारे सुशिक्षित व इतरही पुष्कळसे लोक त्या समाजामध्यें दृष्टीस पडतात.

डॉक्टर खेडकर यांच्यासारखे सुशिक्षित हिंदी गृहस्थ या ठिकाणीं आपल्या तत्त्वशास्त्रांतील अत्युच्च रहस्यांवर, सार्व-राष्ट्रीय श्रोतृसमाजापुढें, विशदपणें पाठ सांगत असलेले पाहून मला अभिमान वाटला व एक तऱ्हेचें स्फुरणही आलें. त्यांनीं 'सॉक्रेटिक्'–प्रश्नोत्तररूपाची–विवेचनपद्धति स्वीकारिली होती. तेथें 'सत्य म्हणजे काय' हा एक प्रश्न वादविवादाला निघालेला होता. त्याच्या उत्तरांत अनेक व्याख्या सांगण्यांत आल्या. त्यांतील कांहीं बऱ्याच मनोरंजक होत्या. त्या प्रश्नाचें एक उत्तर, 'घडणाऱ्या गोष्टींच्या परंपरेशीं विचारपरंपरेची जुळणी राहणें,' असें होतें. दुसरीं कांहीं उत्तरें, 'जें जे सुदर आहे तें तें सर्व सत्य आहे.' 'सत्य म्हणजे मेळ.' 'सत्य ह्मणजे ज्ञान, प्रेम, व बुद्धि.' 'कुरूपता ह्मणजे पूर्णतेला न पावलेलें सत्य.' 'सत्य म्हणजे सर्व कांहीं वस्तुमात्र.' अशीं होतीं. पुढें 'सत्य कोठें वास करितें,' हा प्रश्न विचारिला गेला. त्याला, 'सत्य आकाशामध्यें राहतें.' असें उत्तर मिळालें. 'आकाश ह्मणजे काय?' या प्रश्नाला, 'आकाश म्हणजे जाणीवपणाचा–अस्ति या ज्ञानाचा–गुण,' असा जबाब दिला गेला. नंतर 'सत्य मनामध्यें वास करितें,' असा खुलासा करून 'विचाराच्या क्रियेला व्यापून राहणारें तें मन,' अशी त्याची व्याख्या दिली गेली. या थोडक्याशा उल्लेखावरून, तेथें चाललेल्या कार्याची कांहींशी कल्पना येईल. तेथें ठाम निर्णय

असा कांहीं ठरविण्यांत आला नाहीं. केवळ विविध ठळक ठळक विचारांचा विनिमयसा चालला होता.

या व्याख्यानानंतर मलाही चार शब्द बोलण्याला सांगण्यांत आलें. त्याप्रमाणें मीं थोडेसें भाषण केलें. तें कौतुकानें, कृपादृष्टीनें व लक्षपूर्वक ऐकिलें गेलें. पुढें त्या शाळाकमेटीच्या सभासदांनीं माझी खात्री केली कीं, मीं उल्लेख केलेल्या प्रश्नांचा, ते लक्षपूर्वक विचार करीत आहेत. मीं सुव्यक्त केलेलीं कांहीं रहस्यें त्यांनीं पूर्वींच ग्रहण केलेलीं होतीं, आणि बाकीचीं समजून घेण्यासाठीं डॉक्टर खेडकरांच्या नेतृत्वाखालीं, ते होईल तितका प्रयत्न करीत होते.

# भाग सोळावा.

## ग्लास्गो व हायलंडस्.

एडिनबरो शहर 'बॉनी स्कॉटलंड'—सुरम्य स्कॉटलंड—देशामध्यें भारी सुंदर व मजेदार म्हणून प्रसिद्ध आहे. ह्याचप्रमाणें उत्तरेकडील भागांत उद्योगधंद्यासंबंधानें ग्लास्गो हें मुख्य शहर आहे असें ह्मणतां येईल. तेथील वस्ती गजबजलेली असून, लोकसंख्या साडेसात लाखांवर आहे. या लोकसंख्येच्या मानानें साऱ्या विलायतेंत तें दुसरें शहर (लंडनच्या नंतर) असण्याचा अभिनंदनीय बहुमान त्याला मिळतो. तें शहर क्लाईड नदीवर वसलेलें आहे. ती नदी, आसपासचा कोळशांच्या खाणीचा प्रदेश, व लोखंडाचे कारखाने, आणि तेथील लोकांचा दीर्घोद्योग व साहसी स्वभाव, इतक्यांवर त्या शहराचें व्यापारविषयक महत्त्व अवलंबून आहे. या कारखान्यांतून निघणाऱ्या अतोनात धुरामुळें, हें शहर काळ्या व कळकट धुळीचें अधिष्ठान झालेलें आहे. तेथील मुख्य धंदा नवीं जहाजें व गलबतें बांधण्याचा. तेथील एक

प्रमुख कारखानदार ' मेसर्स बार्ट्ले अँड कंपनी' यांचा भारी मोठा व अफाट कारखाना पाहून येण्याचा बहुमान मिळाल्याचा मला आनंद वाटला. त्या कारखान्यांत शेंकडो लोक काम करीत असतात. मिस्टर गिल्क्राइस्ट यांनीं कृपा करून बरोबर येऊन सर्व कारखाना फिरून दाखविला. तेव्हां तेथें बनत असलेल्या अजस्त्र जहाजांसंबंधीं तऱ्हेतऱ्हेचीं कामें पाहून, मोठी गंमत वाटली. तेथील लोक सभ्य व आदरातिथ्य करणारे असून त्यांनीं आम्हांला ' लंच '—फराळा—ला बोलाविलें.

या शहरा लगतच शेतकीचें कॉलेज व तत्संबंधीं ' एक्स्पेरिमेंटल् फार्म '—प्रयोग करून दाखविणारें शेत—आहे. तें दुसरे दिवशीं आम्हीं पाहून आलों. तेथें शेतकामाच्या निरनिराळ्या शाखेसंबंधीं अनुभव घेण्याचीं पुष्कळशीं कामें चालू होतीं. तीं आम्हीं पाहिलीं. त्यांत लोणी काढण्याचें व 'चीज'-पनीर-तयार करण्याचें, हीं कामें विशेष पाहण्याजोगीं होतीं. येथून हे जिन्नस, पृथ्वीवरील दूरदूरच्या भागांत पाठविले जातात असें कळलें. कृत्रिम तऱ्हेनें कोंबड्यांचीं अंडीं उबवून, 'फॉस्टर मदर'—दाई—ठेवून, आणि वरून खाऊं घालून, कोंबडीं तयार करण्याची रीतही आम्हीं पाहिलीं. हें कोंबड्यांचें खुराडें फारच प्रेक्षणीय होतें. कोंबड्यांच्या साऱ्या वेणी राखलेल्या होत्या. त्यांतील नरांचे नाना रंगांचे तुरे, फण्या, व पिसारे यांचा एक फार उमदा व अजब देखावा दिसत होता. आह्मी तेथें असतांना

त्यांना खाणें घालण्याची वेळ झाली.तसे,सारीं कोंबडीं त्याच्यासाठीं येत असलेल्या खाद्याच्या पाठोपाठ मोठ्या गडबडीनें व उत्सुकतेनें धांवलीं.तीं फारच गमतीचीं व मजेदार दिसलीं. दुसरीकडे शेतकीचीं यंत्रें ठेविलेलीं होतीं. कृत्रिम खताच्या द्वारें पिकाची सुधारणा, आणि त्यांना रोग न होण्याच्या उपायाचे अनुभव चालले होते. तेथें पाहिलेल्या व्यवस्थेवरून, हें कॉलेज उपयोगी व महत्त्वाचें काम करीत होतें हें स्पष्ट दिसत होतें. कोण्या ना कोण्या रीतीनें ही व्यवस्था हिंदुस्थानांतही अमलांत आणली गेली तर फायदाच होईल. गेल्या थोड्या वर्षांमध्यें, शास्त्रीय पद्धतीच्या शेतकीचें शिक्षण, व त्या कामाला उत्तेजन देण्याचा, तिकडील सरकार, पुष्कळ प्रयत्न करीत आहे. ही सुदैवाची गोष्ट होय.

ग्लास्गोजवळच लहानशा खेड्यामध्यें एक कोळशाची खाण आहे. तिच्यांत उतरून, ती आह्मीं नीट फिरून पाहिली. हा अनुभव चमत्कारिकच. तरी तो आह्मांला आवडला. एका मोठ्याशा पिंजऱ्यांत उभे राहून, आह्मी दिवसा, खालीं अंधेरांत उतरलों. भूगर्भांतील ते रस्ते घाणेरडे व निरुंद होते व तेथें फारच काळोख होता. ते भाग नीट पाहतां यावे म्हणून आह्मांला एकेक 'डेव्हीस् ल्यांप' दिलेला होता. खाणींत जागजागीं खोदलेला कोळसा लहानशा गाड्यांत घालून, तट्टांकरवीं खड्डयाच्या तळाशीं नेला जात होता; व तेथून तो वर ओढून

वेत होते. याप्रमाणें जमिनीच्या पोटांत काम करीत कैदेंत राहिल्यानें त्या तट्टांना कांहीं विशेष त्रास किंवा इजा होत असलेली दिसली नाहीं. त्यांची चांगली काळजी घेतात. त्यांच्यावर सरकारी अंमलदारांची देखरेख असते. पूर्वी हें काम लहान मुलें व मुली करीत. पण परलोकवासी लॉर्ड शाफ्ट्सबरी यांच्या खटपटीनें याविषयीं कायद्यानें मनाई झाली आहे. या कामीं त्यांना लोकमताचेंही पाठबळ होतें. तेव्हांपासून तट्टें उपयोगांत आलीं.

कोळशांचे मोठमोठे थर किंवा पडदे असतात. त्यांच्यांतून तो वजनदार कुदळींनीं खोदून काढतात. त्यांतील एक कुदळ मलाही अजमावून पाहण्यासाठीं पुढें केली गेली. पण आपल्या इतर कर्तबगारीमध्यें कोळसा खोदण्याचीही भर टाकण्याविषयीं मी साशंक झालों. तेथील कोळशाचे बरेचसे नमूने मला नजर मिळाले. सृष्टिदेवतेचीं किती तरी विचित्र भांडारें आहेत. त्यांपैकीं या एकांत शिरून येण्याच्या या प्रसंगाचें योग्य स्मारक म्हणून, ते नमूने मी आस्थापूर्वक जपून ठेवणार आहें. आजचा हा अनुभव अनेक रीतींनीं अपूर्व व आनंददायकसा होता. आम्ही खाणींत उतरलों त्या दिवशीं सुट्टी होती. सर्व शाळा बंद होत्या. आह्मी तेथें गेल्याची बातमी त्या खेड्यांत तेव्हांच पसरली. तिच्यामुळें तेथें एकच गडबड उडाली. आमच्या मोटारभोंवतीं मुलांमुलींची गर्दी जमली. घरांचीं दारें व खिडक्या

यांच्यामध्यें बायकांची दाटी झाली होती. पुरुष मंडळी सुद्धां आह्मांला निदान ओझरतें पाहण्यासाठीं रस्त्यांत उभी राहिली होती. तेथील सर्वांत वृद्ध माणसाच्या देखील आठवणींत, कोणी हिंदी सरदार सहकुटुंब त्या स्थळीं पूर्वी कधीं आले नव्हते, असें त्याचें ह्मणणें होतें. अशा बाबतींत तें तेथें अर्थातच वेद-वाक्यतुल्य समजलें जावयाचें.

स्कॉटलंड मध्यें पुष्कळच सरोवरें आहेत. त्या सर्वांमध्यें लॅाक् ऑ हें फार मोठें, चित्रासारखें सुरेख, व प्रेक्षणीय आहे. त्याची लांबी तेरा मैल असून, रुंदी क्वचित् स्थळींच पाऊण मैलावर आहे. त्याच्या चौफेर भव्य पर्वतांचा गराडा आहे. त्या पर्वतांमध्यें बेन् क्रुशॉन् हा सर्वांत उंच—३६८९ फूट—आहे. या सरोवरामध्यें जागजागीं लहान लहान व सुंदर बेटें आहेत. दोन्ही टोंकांला आगगाडी व टप्प्याच्या गाड्या चालतात. त्या सरोवरांत आगबोटी चालतात त्यांतून मजेदार व मनोहर सफर करितां येते. पाण्याचा पृष्ठभाग स्वच्छ व संथ असतो. त्याच्या-वरून सरपटत जातांना, दुतर्फा या देशांतील अत्युत्तम प्रेक्ष-णीय व रमणीय वनश्री, अप्रतिम हिरवींगार कुरणें, त्यांच्यांतील गगनचुंबी शोभायमान वृक्षराजी, इत्यादिकांमुळें मनोरम वाटणारे दोन्हींकडचे प्रांतभाग, दृष्टीस पडतात. हा देखावा चांगलाच मनोवेधक आहे. तरी पण, त्याला हिंदुस्थानांतल्या बऱ्याच ठिकाणच्या उज्ज्वल सृष्टिसौंदर्याची सर क्वचितच येते.

'लॉक ऑ हॉटेल' पासून सुमारें दीड मैलावर, त्या सरोवरावर 'किल्चर्न क्यासल्'चा उध्वस्त भाग दृष्टीस पडतो. त्यांतील अगदीं जुना भाग सर जॉन क्यांपबेल यांनीं इ. स. १४४० मध्यें बांधला, असें सांगतात. सुप्रसिद्ध व अढळकीर्ति सर वॉल्टर स्कॉट यांनीं 'लीजेंड ऑफ् मॉंट्रोज' कादंबरीमध्यें या किल्ल्याचा उल्लेख केलेला आहे. पहिले सर जॉन क्यांपबेल यांच्याविषयीं एक मनोवेधक कथा उपलब्ध आहे. 'क्रॉस'ची शपथ घेऊन ते 'होली क्रूसेड'—धर्मयुद्धा—साठीं निघून गेले. पुढें सात वर्षें त्यांच्या पत्नीनें त्यांची वाट पाहिली. ते लढाईंत पडल्याचें तिला कळलें. नंतर कांहीं काळानें, तिनें, भीड व खोट्या थापा, यांच्यामुळें दुसऱ्या एका लॉर्ड मॅक्कॉर्कोडेल नांवाच्या भावी वराची मागणी कबूल केली. लग्नाचा दिवसही ठरला. त्याच दिवशीं सुदैवानें सर जॉन किल्ल्यावर परत आले. तेव्हां त्या हतभागी वराखेरीज सर्वांना भारी आनंद झाला. सर जॉननीं बायकोच्या नांवें पाठविलेलीं पत्रें त्यानें मध्येंच दाबून, ते मेल्याचें तिला भासविलें होतें.

आणखी एका मनोहर सफरीमध्यें, आह्मी क्रुशॉनच्या धबधब्याला गेलों. तेथें पडणारा पाण्याचा झोत—विशेषेंकरून उंच अशा जागेवरून पाहिल्यास फारच—प्रेक्षणीय दिसे. इकडे एक विशेष गोष्ट आमच्या पाहण्यांत आली. ती

ही कीं, इकडील पर्वतांवर सहज चढतां येतें. हिंदुस्थानांतील बहुतेक पर्वत व पहाड खडकाळ असल्यानें त्यांच्यावर चढतांना पाय मुष्किलीनें टिकतात. पण इकडे सर्वत्र गवत उगवलेलें असल्यानें पाय निसरत नाहीं. कशाही खड्या जागेवरून बिनधोक चढतां उतरतां येतें. शिवाय इकडे सांप नाहींत. तेव्हां त्यांचेंही भय कमी. हिंदुस्थानांत हे विषारी जीवजंतु फार. यामुळें तिकडे, असले दुर्गम व निर्जन प्रदेश पाहात फिरणें बरेंच धोक्याचें होतें.

लाक ऑ पासून आम्ही आगगाडींतून सुंदर वनप्रदेशाच्या देखाव्यामधून 'फोर्ट विल्यम्'ला गेलों. जागजागचीं हिरवींगार शेतें व बागबगीचे, आणि ठिकठिकाणीं पडणारे पाण्याचे झोत, यांमुळें वाटेंत लागणाऱ्या भणभणीत माळाचा कंटाळा आणणारा एकसारखेपणा कमी होत होता. वाटेंत मध्येंच एखाद्या संथ सरोवराचा प्रांतभाग, किंवा जोरानें वाहणारा ओहोळ लागे. आम्ही बेन् नेव्हिस्च्या नजीकसे पोहोंचलों. तसे, कोठें कोठें खबदड्यांमध्यें व जवळपासच्या पर्वतशिखरांवर बर्फाचे पाट दिसूं लागले. बेन् नेव्हिस्चें आह्मांला चांगलें दर्शन झालें. तो स्कॉटलंडांत, किंबहुना साऱ्या विलायतेंत, सर्वांत उंच पर्वत आहे. त्याचें तें खडबडीत सौंदर्य, व माथ्यावरील बर्फाचें अचळ शिरोवेष्टन, यांमुळें तो फारच शोभत होता. हें बर्फाचें शिरोवेष्टन इतकें कांहीं अढळ आहे

कीं, तेथील एका जमिनीच्या कौलनाम्यामध्यें त्याविषयींची एक शर्थ घातलेली आहे. ती जमीन ग्लेन् नेव्हिस्‌मधील क्यामेरॉन् यांच्याकडे आहे. तिच्यासंबंधीं कौलनाम्यांत बेन् नेव्हिस्‌च्या शिखरावर बर्फ कायम असेल, तोंवर ती जमीन त्यांच्याकडे कायम राहील, असें कलम आहे. या कबजाला एकदांच काय तो कांहींसा धोका आला होता, असें समजतें. त्यावेळीं क्यामेरॉन् यांना त्या शिखरावर तंबू ठोकून त्या बर्फाचा बचाव करण्याची पाळी आली होती. त्या वर्षी हिंवाळा सौम्य गेला होता, आणि पुढचे वसंत व ग्रीष्म ऋतू, कडक झाले. त्यामुळें बर्फ भराभर वितळूं लागलें. इतकें कीं, त्याच्या बचावाची तजवीज न केली जाती तर, तें पार नाहींसें होण्याची भीति होती.

'प्रिन्स् चार्लस् दि यंग प्रिटेंडर'—दुसऱ्या जेम्स राजाचा मुलगा—इंग्लंडच्या गादीवर आपला हक्क सांगणारा—याच्यासंबंधाचीं पुष्कळशीं स्मारकें या 'फोर्ट विल्यम्' मध्यें आहेत. त्या हतभागी राजपुत्रानें, याच्या आसपासच आपला झेंडा उभारला होता. त्याचा प्रयत्न प्रतिकूल दैवामुळें निष्फळ झाल्यावर, तो शेवटीं परत निघून गेला, तोही येथूनच. आम्ही आगबोटींतून ओबन्‌ला रवाना झालों. तसा बेन् नेव्हिस् स्पष्ट व पुरा जणों त्याच्या पूर्ण गौरवांत व वैभवांत उभा असलेला, पाहण्यास सांपडला. त्याचा तो रमणीय देखावा खरोखर उल्हासकारक होता. आह्मां लोकांना, हिंदु-

स्थानांत, सृष्टिदेवतेचें प्रचंड वैभव प्रत्यहीं पाहण्याचा अभ्यास आहे. त्या आह्मांला सुद्धां हा देखावा पाहून आनंद व आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. आमच्या ओबन्‌ला जाण्याच्या जलमार्गामध्यें समुद्रांतील 'लाक्स्'—वर खालीं बोटी चढण्या उतरण्याचे कृत्रिम बंद हौद—होते. त्यांच्या मधील मार्गांचे भागही फार मनोहर होते. त्याच्या दोन्ही बाजूंच्या टेकड्यांच्या उतारावर गर्द हिरवळ होती. यामुळें त्या टेकड्या फार प्रेक्षणीय झाल्या होत्या.

ओबन् येथें आम्ही दोन दिवस स्वस्थ व आरामांत घालविले. हा गांव फारच रमणीय स्थळीं वसलेला आहे. त्याच्या पुढें, खालीं समुद्राची खाडी, मागच्या अंगाला पहाडांची रांग, व उत्तम पोशाख केलेले, शांत स्वभावाच्या व मजेनें हवा खात फिरणाऱ्या लोकांचे थवेच्या थवे, या सर्वांचा माझ्या मनावर फारच चांगला परिणाम झाला. अशींच दुसरीं पुष्कळशीं स्थळें जवळपास आहेत. त्यांतील डन्स्टॉफ्नेज् क्यासल् आम्ही पाहून आलों. इ. स. १७१५ व इ. स. १७४५ सालच्या बंडांच्या वेळीं तेथें शिबंदी रहात होती. पण इ. स. १८१० सालीं आग लागून किल्ल्यांतील बराचसा भाग जळाला. तेव्हांपासून तेथें कोणी राहात नाहीं. तसेंच येथून कांहीं मैलांवर लोराचा धबधबा आहे. तो पाहण्यासही आम्ही गेलों होतों. त्याच्या आवाजावरून, तो पुष्कळच उंचावरून पडत असावा, असें वाटलें होतें. पण तो सारा पांच सहा फुटांवरूनच पडत

असलेला पाहून, आमची नाउमेदशी झाली. पण कड्यावरून खालीं पडल्यावर त्याचें पाणी फारच जोरानें व खळाळीनें वहात होतें. ओबन्‌ला परत आल्यावर आह्मीं कांहीं स्मारक वस्तू व स्कॉटिश् कापड खरेदी केलें. आमच्या सफरींतील अगदीं उत्तरेकडील ठिकाण ओबन् हेंच होतें. दिवस उन्हाळ्याचे असल्यानें, आह्मांला सर्वांत मोठा दिवस या ठिकाणींच प्रथमतः पाहण्यास मिळाला. रात्रीचे दहा वाजेपर्यंत सुद्धां, रस्त्यांत कृत्रिम प्रकाशाशिवाय, स्पष्ट दिसत होतें. सकाळीं निजून उठण्यापूर्वींच, सूर्य किती तरी वर आलेला असे.

स्कॉटलंड देश 'शिव्हलरी अँड् रोमान्स'—शूरवीर व स्त्रीजातीविषयीं प्रेमळ व आदरभाव ठेवणाऱ्या लोकांच्या अद्भुत व अलौकिक गोष्टी—संबंधानें सुप्रसिद्ध आहे. तेथील भूमीचा तुकडान् तुकडा, मनाला उत्साह आणणाऱ्या, उल्हास देणाऱ्या, व खडबडावून सोडणाऱ्या, कांहींना कांहीं स्थानिक गोष्टींमुळें संस्मरणीय झालेला आहे. या गोष्टी व कहाण्या शाहीर व पोवाडे रचून गाणारे लोकांनीं जपून ठेविल्या आहेत. तेथील पर्वत, दऱ्याखोरीं, सरोवरें, भयाण पण रमणीय वन-प्रदेश व माळ, यांचें गुणगान अपरिमित प्रकारांनीं साऱ्या भूमंडळावर होत आलें आहे. खडबडीत टेकड्यांनीं व्याप्त व चित्रासारख्या सुंदर, अशा प्रदेशांत वास करणारे लोक, निसर्गतःच विचारी, मोकळ्या मनाचे, जपून वागणारे, धीट, व

स्वावलंबी असतात. तसाच या ‘ स्कॉट् ’ लोकांचा स्वभाव आहे. ते बाह्यतः कडक व कठोर वाटतात. तो त्यांचा गुण केवळ वरपांगी आहे. त्याच्या आड प्रेमळ व सहानुभूतियुक्त खरा स्वभाव झांकलेला असतो. कारण, निसर्गदेवतेच्या थोर अंतःकरणाचा त्यांना निकट सहवास घडलेला. त्यामुळें त्यांच्या-मध्यें जीवात्म्याचे मृदु, तसेच कठोर, व खडबडीत गुणही विकास पावतात.

# भाग सत्रावा.

## आयर्लंडमधील सहकारी प्रयत्न.

ग्लासगोहून आम्ही बोटींतून बेल्फास्टला गेलों. 'एरिन्'चें मरकतमणितुल्य बेट जें आयर्लंड त्याचें मला तेथें प्रथमच दर्शन झालें. त्या बेटांतील झगडे, उत्क्रांति, उमेदी व मनोरथ, हे सर्व दोन्ही राजकीय पक्षांमध्यें, वादविवादाचे व भांडणाचे विषय होऊन राहिले आहेत. युरोपांतील किंवा विलायतेंतील इतर मोठ्याशा शहराच्या मानानें बेल्फास्ट मोठेंसें आहे असें नाहीं. तरी तें फारच गजबजलेलें, उद्योगी, सर्व साधनांनीं परिपूर्ण व बरेंच महत्त्वाचें स्थळ आहे. तेथील लोकांच्या अंगीं प्रशंसनीय असें सार्वजनिक कार्यकर्तृत्व वसत आहे. पूर्वीं मुंबई इलाख्यांतील पब्लिक् वर्क्स खात्यांत असलेले मिस्टर जॉन टेट, या सन्मान्य मित्राच्या नेतृत्वाखालीं, आह्मीं तेथें आमच्या सफरींतील एक मजेदार व आनंदाचा दिवस घालविला.

तेथील 'सिटी हॉल' फारच सुरेख आहे. त्यांतील संगमरवराचा भव्य जिना व मेजवानीचा प्रशस्त दिवाणखाना हे पाहून,





माझ्या मनाची खात्री झाली कीं, विलायतेंतील या एका सामान्य शहरामध्यें, सार्वजनिक कामाकाजायोग्य स्थानाच्या बाबतींत जशी सोय केलेली आहे, तशी हिंदुस्थानांत, एका इलाख्यांतही केलेली नाहीं. तेथील सारी व्यवस्था व सामानसुमान, अगदीं आतांपर्यंतच्या नवीन सुधारणा व क्लृप्ती, यांना अनुसरून आहेत. मेजवानीच्या दिवाणखान्यामध्यें नाचाला सोईवार अशी पेटंट कमानीदार फरशी केलेली आहे. ही या सुधारणांचाच एक मासला आहे. तिच्यावर हवा तितका झोंक येण्याला, नाचणारीं पांचशें जोडपीं लागतात, असें म्हणतात. इतकी हीं नाचणारी मंडळी, या लोकप्रिय करमणुकीचा अनुभव घेत, आनंदानें नाचण्यामध्यें निमग्न असल्यावेळचा देखावा, मनाला किती आनंददायक व उल्हासकारक होत असेल, याची सहज कल्पना करतां येईल.

बेल्फास्ट येथें गलबतें तयार करण्याचे प्रचंड कारखाने आहेत. त्यांच्यांत हवीं तेवढीं मोठीं गलबतें बनतात. तेथें पुष्कळच कारागीर व मजूर, यांचा रोजगार चालतो. तेथील 'ड्राय डाक्स्'—पाणी काढून रिकामी करतां येण्याजोगी गोदी—फारच विस्तीर्ण आहे. तिच्यांत जपान सरकारासाठीं तयार केलेली एक 'क्रूझर' साफ व दुरुस्त करीत होते. ती आह्मीं पाहिली. येथें तागाचें कापड विणण्याचे कारखाने आहेत. त्यांच्यांत कच्च्या तागापासून, यांत्रिक मागांनीं, कपडा विणतात.

अशा एका कारखान्यांत जाऊन, हें सर्व काम आम्हीं नीटपणें पाहिलें. येथील तागाचा कपडा पृथ्वीभर प्रसिद्ध आहे. बेल्फास्टचा परदेशाशीं व्यापार चालतो तो, फारच मोठा, डब्लिन्च्या व्यापारापेक्षांही भारी आहे. कारण, या कारखान्यांशिवाय, तेथें गोणपाट विणणें व दोरखंडें वळणें यांचे आणि तंबाकूचेही प्रचंड कारखाने आहेत. हें शहर मुख्यत: व्यापार धंदा व उद्योग, यांचें केंद्र आहे. तरी तेथें शेतकीकडेही चांगलेंच लक्ष दिलें जातें. यावेळीं तेथें एक औद्योगिक प्रदर्शन चालू होतें. तें आह्मीं पाहिलें. शेतकीशीं संबंध असलेल्या उद्योगधंद्याची सरकारांतून व्यवस्था लागण्याच्या हेतूनें हें सुरू केलेलें होतें. सारी संपदा व उद्योगधंदे यांचा मूळाधार जमीन. त्या अर्थीं हीं योजना बरीच उमेदीची आहे. या दिशेनें जें पुढें पाऊल पडतें आहे तें, पुढें मागें हितकारी परिणाम उत्पन्न करण्याच्या दिशेनेंच पडत आहे, ह्मणावयाचें.

या आयर्लंड देशांतील राज्यकारभाराची तऱ्हा कोणत्या पद्धतीवर कायम व्हावी, या विषयींची, फार दिवसांपासून लांबणीवर पडत आलेली चळवळ, व तिचा अनिश्चितपणा, यांच्यामुळें, व्यापारधंद्याला बराच चंचलपणा आलेला आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं असें निश्चयानें ह्मणतात कीं, 'होम रूल'—स्थानिक स्वराज्य—देण्यांत आलें तर, कारखाने बंद होतील किंवा त्यांचें स्थलांतर होईल. निदान त्यांच्यावर पुष्कळ अनिष्ट

परिणाम घडेल. हें म्हणणें खरें किंवा खोटें हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. जिकडे तिकडे हा भारी महत्त्वाचा होऊं घातलेला फेरबदल याच्या विषयीं, फारच जोराचा मतभेद असून, याच राजकीय गोष्टीविषयीं सारखा वादविवाद ऐकूं येतो. माझ्या स्वतःच्या अनुभवावरून इकडील बहुजनसमाज, 'होम रूल'ला प्रतिकूळ आहे, अशीच माझी समजूत झाली आहे. राजकीय परिस्थितीच्या या अनिश्चितपणामुळें, औद्योगिक संस्थांच्या भांडवलाच्या भागांची किंमत उतरत चालली आहे, असें सांगतात. कोणच्या प्रकारें कां होईना, याचा कायमचा निकाल लौकर लागून गेलेला बरा, अशी अंतःकरणपूर्वक भावना सर्वत्र दिसून येते. असें झाल्यानें इंग्लंड व आयर्लंड दोहोंनाहीं एकदांचा उसंत मिळेल.

बेल्फास्टहून डंडॉक् व ड्रामिंटीला जातांना, आह्मांला आयर्लंडमधील अतिउंच पर्वत व सृष्टिसौंदर्याचा उत्तम देखावा पाहण्यास सांपडला. साऱ्या खोऱ्यांमध्यें घरें दिसत होतीं. इंग्लंड व स्कॉट्लंडमधील घरांच्या मानानें तीं लहान व हलकीं दिसलीं. शेतें व वाड्याही लहान व कमी प्रतीच्या होत्या तरी हिंदुस्थानांतल्या मानानें तीं सर्व अधिक भरभराटींतच होतीं.

ड्रामिंटींमध्यें सहकारी संस्थांची चांगलीच प्रगती पाहून समाधान मानण्याला जागा होती. तेथील ' कोआपरेटिव्ह

सोसाइटी'—सहकारी संस्थे—चा स्थानिक सेक्रेटरी एक नोकरी पुरी झालेला शाळामास्तर असून तो फार हुषार आहे. त्याला शेतकऱ्यांची स्थिती सुधारण्याविषयीं भारी कळकळ आहे. या संस्थेच्या संबंधी सर्व प्रश्नांचें त्याला पूर्ण ज्ञान आहे. या कामाविषयीं त्याला जसा भारी उत्साह, तदनुरूपच कार्यकर्तृत्व शक्तीही त्याच्या अंगीं आहे. ही योग्य स्थळीं योग्य माणसाची योजना जुळलेली आहे. पूर्वी त्याचा शिष्य असलेला एक गृहस्थ अमेरिकेंत जाऊन राहिला आहे. त्याचें एक पत्र त्यानें, अर्थातच समाधानानें व आनंदानें, मला दाखविलें. त्यांत स्वत:चें कुशलवृत्त व हल्लींची स्थिती यांजबद्दल लिहून, त्यानें कांहीं सल्लाही विचारली होती. त्यावरून त्या शिक्षकाच्या शिक्षणाचा कायम टिकणारा प्रभाव, व शिष्याच्या मनांत उत्पन्न झालेला दृढ विश्वास, यांची उत्कृष्ट साक्ष पटत होती.

ड्रामिंटी येथील एक शाळा पाहण्यास मी गेलों. तेथील स्थितीवरूनशिक्षण संबंधांत इंग्लंड व आयर्लंड यांमध्यें असलेला पुष्कळच फरक माझ्या तेव्हांच लक्षांत आला. आयरिश् शाळा, आजकालच्या मानानें, किती तरी मागसलेल्या स्थितींत आहेत, अशी माझी समजूत झाली. इग्लंडांत, मुलें हुषार, तरतरीत, मोकळ्या मनाचीं, व विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याला उत्सुक दिसत होतीं. यावरून, मिळत असलेल्या शिक्षणापासून त्यांना

आनंद होत होता, हें उघड होतें. आयरिश् मुलें व मुली भेकड, मागें मागें घेणारीं, व शिक्षकाविषयीं भय बाळगणारीं दिसलीं. मी हें वर्णन अर्थात तेथील प्राथमिक शाळांचें देत आहे तथापि त्या शाळेंतील सामानसुमान व अवश्य लागणारे पदार्थ, यांचा पुरवठा, हिंदुस्थानांतील दुय्यम प्रतीच्या उत्तमोत्तम शाळेंतल्या बरोबरीचा होता.

एन्निस्कार्थी येथें माझा वेळ—त्यांतही तेथील ' कोआपरेटिव्ह स्टोअर्स ' पाहण्याला गेलों होतों तेव्हांचा—फारच मजेंत व उपयुक्त माहिती मिळविण्यांत गेला. हें इ.स.१९१३ साल सहकारी संस्थांच्या ज्युबिलीचें होतें. हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. सार्वजनिक सुधारणा व प्रगति घडवून आणण्याच्या कामीं या संस्था बऱ्याच महत्त्वाच्या कार्यसाधक झाल्या आहेत. सहकारी पतपेढ्यांची तऱ्हा त्यांच्यापासूनच उदयास आली, असें म्हणतां येईल. अगदीं गरिबीच्या प्रारंभापासून गेल्या पन्नास वर्षांत, ही चळवळ कशी फैलावत गेली याची कल्पना, ती आज साऱ्या विलायतभर सर्वांत मोठी औद्योगिक संस्था आणि सर्व जगांत कामकरी वर्गाला मुख्य उमेदीचें व भरंवशाचें मुख्य साधन झाली आहे, यावरून करतां येईल. या सोसाईटीची देवघेव पहिल्या वर्षीं थोड्याशा पौंडांचीच होती. ती हल्लीं, तीन कोटी पौंड—पंचेचाळीस कोटी रुपये—झाली आहे. यावरूनही तिची उपयुक्तता व महत्त्व पूर्णपणें सिद्ध होतें.

या वर्षी या चळवळीकडे विशेष लक्ष दिलें जात होतें. मी आयर्लंडला जाण्याच्या थोडेच पूर्वी, कानडा व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें येथील बरेचसे कमिशनर लोक, नुकतेच युरोपांत सफर करण्याला निघालेले होते. या चळवळीची कार्यकर्तृकता, त्यांतही विशेषतः सहकारी पतपेढ्यांच्या कार्यक्रमाच्या पद्धती, यासंबंधी स्थानिक चौकशी करण्याच्या उद्देशानेंच ही सफर बुद्ध्या चालली होती. त्यांच्या बरोबरच मी आयर्लंडला जाण्याला तयार आहे काय, असें मला विचारण्यांत आलें होतें. तसें करणें बरेंच उपयोगी व फायदेशीर झालें असतें. पण इतर कार्यक्रमामुळें मला तें साध्य नव्हतें. त्याला माझा निरुपाय होता. एन्निस्कार्थी येथील पद्धतीविषयीं चौकशी करण्यासाठीं, कांहीं स्कॉच् मंडळीही नुकतीच येऊन गेली होती, असेंही मला कळलें. ही लहानशी व विशेष पुढें न सरसावलेली जागा, आपली अशा रीतीनें अवचित प्रसिद्धी झालेली पाहण्याला जणों एकदम जागी झाली होती.

ही सहकारी संस्थेची चळवळ, खेडेगांवात, लोकांच्या जीवनक्रमामध्यें बरीचशी गडबड व जोम उत्पन्न करण्याला चांगलीच साधनीभूत झाली आहे, यांत शंका नाहीं. एकदां एन्निस्कार्थी येथील सहकारी पतवर्धक संस्थेच्या मेंबरांची कमेटी, काम करण्याला जमली असतांना, त्यांना शाईची एक बाटली हवी होती. ती एका दुकानदारानें दिली नाहीं. त्यावरून

त्यांनीं मंडळीला लागणारे, टांचणीपासून तों मळणीच्या यंत्रा-सुद्धां, हरएक जिन्नस पुरविणारी संस्था, स्थापन करण्याचें ठरविलें.

एन्निस्कार्थी येथील ' स्टोअर्स 'मध्यें, सामानाचा भरपूर पुरवठा आहे. तो 'स्टोअर्स' तेथील महत्त्वाच्या स्थळांत मोडला जातो. घरप्रपंचांत अवश्य लागणारे पदार्थ, शिवाय व्यवहारांत कामीं येणारे पुष्कळसे चैनीचे जिन्नस सुद्धां, तेथें मिळतात. सर्व तऱ्हेचें वाण सामान, रोटी, पोळ्या, मिठाई, लोणी, विणकरीचे व शिवलेले कपडे, निवडक बीं, पिकाची वाढ करणारीं खतें, शेतकीचीं लहान मोठीं आउतें व अवजारें, इत्यादि सर्व चिजा तेथें मिळतात. तसेंच घोड्यांचीं जीनें व साज नवे बनविणें व दुरुस्त करणें, याचीही तेथें शाखा आहे. तेथील काम करणारी मंडळी पक्की धंदेवाईक आहे. त्यांच्या कमेटीचा एक मेंबर, ' पाशा ' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यानें कांहीं दिवस ईजिप्त देशांत नोकरी केली होती. त्याच्याशीं माझें थोडेंसें संभाषण झालें. त्यावरून, त्याच्या नोकरीला हिंदुस्थानांत आरंभ झाला असल्यामुळें, त्याला तिकडीलही थोडीबहुत माहिती असल्याचें कळून आलें. असले लोक आमच्या हिंदुस्थानांत हवे आहेत. तरच तिकडे सहकारी संस्थांची, नांव घेण्यासारखी व खरी, प्रगती होण्याची उमेद बाळगतां येईल. या 'सोसाईटी'च्या ' कमेटी 'च्या दुसऱ्या कांहीं मेंबरांशींही या संबंधांत माझें बोलणें झालें. त्यांनीं मला, त्यांची काम करण्याची तऱ्हा प्रत्यक्ष

पाहतां यावी ह्मणून आपल्या कार्यकारी कमेटीच्या एका बैठकीलाही हजर राहूं दिलें. त्या कमेटीच्याही कांहीं सभासदांबरोबर माझें जें बोलणें झालें, त्यावरून त्यांना या संबंधाची हिंदुस्थानांतील सद्य:स्थिति चांगलीच माहीत होती. हें पाहून मला समाधान व आश्चर्य वाटलें.

या सहकारी तत्त्वाच्या अनुरोधानें चालविलेल्या चळवळीच्या द्वारें 'आयर्लंडा'तील भावी स्थिती आशाजनक होईल, अशी तेथील वस्तुस्थितीचें लक्षपूर्वक निरीक्षण करणाऱ्या मंडळीला, खात्री वाटत आहे. तिच्या साहाय्यानें गरीब उपरी कुळांना आपली स्थिती व स्वास्थ्य, भराभर सुधारण्याला सवड होत आहे. उदाहरणार्थ, अशा एखाद्या कुळाला एक लहानसें डुकर विकत घेण्याला लागणारी थोडीशी रकम उधार दिली जाते. थोडीशीच काळजी घेतल्यानें तें चांगलें पुष्ट व तयार करून बऱ्याच नफ्यानें विकतां येतें. जमीनीची सुधारणा करण्याला व यंत्रें विकत घेण्यालाही, हलक्याशा हप्तेबंदीनें फेड करण्याच्या शर्तीवर, कर्ज मिळतें. व कर्ज फेडून त्याला त्या वस्तूंचा मालक बनतां येतें. ही सहकारी पद्धत, त्या देशांत कायम झाली तेव्हांपासूनच काय तो, शेतकामासाठीं यांत्रिक शक्तीचा प्रसार शक्य झाला आहे. शिवाय, सरकारांतूनही कुळाला जमीनीचा मालक बनण्याला साहाय्य मिळत राहतें. या दोन्ही गोष्टींमुळें तेथील स्थितींत फरक पडत चालला आहे, व यामुळें राष्ट्रीय भरभराट, हळू हळू पण एक सारखी होत आहे.

शेतकीसंबंधी सहकारी कार्यकर्तृत्वाच्या बाबतींत, लगतचेंच स्कॉटलंड व वेल्स, या देशांपेक्षां, आयर्लंड पुष्कळ पुढें गेलेलें आहे. कदाचित्, तिकडे या चळवळीची, आयर्लंडा इतकी नड पडण्याजोगी आवश्यकता भासत नसेल. इंग्लंडांतील शेतवाड्या बहुतेक मोठाल्या असून, त्या मानानें लोकही सुखी आहेत. सहकारी पद्धत थोड्या उत्पन्नाच्या लोकांना जास्त फायद्याची होते. तिच्या योगानें कर्जाला तारणही चांगलें मिळून त्यांचा सामान्यतः ज्या लोकांशीं देवघेवीचा संबंध असतो, त्यांच्याकडून बऱ्याच जास्ती सवलतीनें त्या लोकांना पैशाची मदत मिळवून घेतां येते. खुद्द विलायतेंत सुद्धां, सरकार आणि सर्व विचारी लोक यांना या चळवळीचे फायदे कळून चुकले आहेत. आणि या लोकांकडून व सरकारांतून मिळणाऱ्या उत्तेजनामुळें तिला चांगलाच जोर पोहोंचतो आहे. सहकारी 'स्टोअर्स' व इतर शाखांप्रमाणेंच, सहकारी पतपेढ्यांची तऱ्हाहीं, हळू हळू निस्संशय लोकप्रिय होईल. आयर्लंडांतील सहकारी पतपेढ्या मोठ्याच सोईच्या व किफायतीच्या आहेत, इतकेंच नव्हे, तर सहकारितत्त्वावर जिनसाची पैदास व खपही तेथें वाढत्या प्रमाणावर आहे. खेड्यापाड्यांतून तर, सर्वच गोष्टी या सहकारी तत्त्वावर करण्याचा लोकांचा हेतू असल्यानें त्याचे फार चांगले परिणाम खास व लौकर निदर्शनास येतील.

बिनकिफायतीच्या—उदाहरणार्थ लग्न कार्यासारख्या कामांसाठीं—

या पतपेढ्या कर्ज देतात किंवा नाहीं, याची आह्मी बुध्दया चौकशी करीत होतों. याविषयीं मतभेद दिसला. तरी अशा कामासाठीं कर्ज देण्याला, होणारा खर्च अवश्य आहे व तो उधळेपणाचा नाहीं अशी कमेटीची खात्री झाली तर, फारशी हरकत येणार नाहीं, असा एकंदरींत भाव दिसला. कर्जाची मुदतशीर फेड होण्याला फार कमी अडचण पडते, असेंही मला खात्रीपूर्वक सांगण्यांत आलें. या चळवळीला खात्रीनें यश येण्याला पुढील गोष्टी अवश्य आहेत. कमेटीचे मेंबर निष्पक्षपाती व चांगल्या करारी स्वभावाचे पाहिजेत आणि केलेले करार दक्षतेनें व इमानानें पाळण्याची इच्छा ठेवणाऱ्या व चांगल्या आचरणाच्या लोकांनाच कर्ज द्यावयाचें, असा त्यांच्या मनाचा निग्रह असला पाहिजे. या दोनीही गोष्टी इकडे सर्वमान्य व नेहमीं प्रचारांत असल्याकारणानें या बाबतींत, हिंदुस्थानांत ज्या अडचणी येतात, त्यांचा इकडील मेंबर लोकांपाशीं उल्लेख केला तर, आमचें ह्मणणेंच त्यांच्या लक्षांत येत नाहीं. एन्निस्कार्थी येथें ही 'सोसाइटी' स्थापन झाली तेव्हां, मुख्य अडचण कर्ज काढणारीं गिऱ्हाइकें मिळणें हीच होती. हिंदुस्थानांत याविषयीं मुळींच उणीव भासणार नाहीं. कर्ज देणें घेणें, या विषयींच्या गोष्टी आयर्लंडामध्यें अगदीं गुप्तपणें चालवितात. त्याची माहिती, ऋणको, त्याचे जामीनदार, व कमेटी, यांवांचून कोणालाही असत नाहीं.

आयर्लंड व हिंदुस्थान यांच्यामधील परिस्थितीमध्यें वर वर पाहणाऱ्यास बरेंचसें साम्य दिसतें. दोन्ही देशांत जमीनदार लोक असून, कुळें जमीनीच्या मालकांना, जमीनीचा फाळा देतात. आयर्लंडांतील ' ग्यांबिन, ' ह्मणजे आमच्याकडील मारवाडी होत. लोकांच्या बेभरंवशामुळें, प्रारंभीं या चळवळीला बराच त्रास पडला. पण या अविश्वासाचें लौकरच निर्मूलन झालें. नंतर जमीनीच्या मालकांचें औदासीन्य व शंका आड आल्या. याही अडचणी सुदैवानें आतां पुष्कळच कमी झाल्या असून त्यांच्यांतील बहुतेक मंडळी आतां उलट या चळवळीचे पुरस्कर्ते बनले आहेत. शेवटीं तिला, दुकानदार व सावकार लोकांच्या वितुष्टाला तोंड द्यावें लागलें. या सर्व स्थित्यंतरांतून ती संस्था पार पडून, आतां ती सर्वमान्य व सर्वथा लोकप्रिय, होण्याच्या राजमार्गाला लागली आहे. असें वाटतें.

हिंदुस्थानांत या बाबतींत, प्रगती झाली आहे. पण ती अर्थातच धिमेपणाची आहे. कारण, या प्रगतीला देशांत आधीं शिक्षणाचा बराचसा प्रसार होण्याची आवश्यकता असते. इंग्रज लोकांच्या अंगीं उद्योगधंद्याला अवश्य लागणारी योग्यता, व्यापारविषयक नीती व सचोटी, आणि आपली स्थिती सुधारण्याची इच्छा, हे गुण आहेत. पेढया व संयुक्त भांडवल जमवून व्यापार करणाऱ्या मंडळ्या, यांची व्यवस्था ते स्वतः दीर्घ काळापासून पहात आले आहेत. तसेंच, स्वावलंबनप्रवर्तक

निरनिराळ्या मंडळ्या व मेंबर लोकांच्या कमेट्यांनीं चालविलेल्या इतर संस्था, यांच्या द्वारें, गरीब वर्गांतील लोकांना सुद्धां आपापल्या खासगी व्यवहाराची व्यवस्था सार्वत्रिक हित साधेल अशा रीतीनें करण्याची संवय पडलेली आहे. अशी भूमिका तयार असल्यामुळें तेथें सहकारी पतीच्या संस्थांच्या तत्त्वांचा कार्यक्रम अमलांत आणणें सोपें होतें. विलायतेंत, खेडयापाड्यांत सुद्धां, ' ब्यांक्स'–पेढ्या–आढळतात. आणि तेथील–विशेषतः खेड्यांतील–कारखाने व इतर धंदे यांची व्यवस्था खासगी लोकांच्या हातीं असते.

हिंदुस्थानांत या साऱ्याच गोष्टींची उणीव आहे. पेढ्या, आणि समायिक भांडवलावर चालणाऱ्या व्यापारी संस्था फारच कमी, आणि नुकत्याच ज्या स्वदेशी ब्यांका बुडाल्या त्याचा परिणाम फारच नाउमेद करणारा आहे. सामान्यतः हिंदी लोकांमध्यें व्यवहारधंद्याची योग्यता, व्यापारांतील सचोटी आणि परप्रीतीचा उत्साह यांची वाण आहे. व्यापारी देवघेवींत येथून तेथून " व्यापारधंदा तो व्यापारधंदा " हा अढळ मुद्रालेख अधिष्ठित झालेला दृष्टीस पडतो. हिंदुस्थानांत सहकारी चळवळ व पतपेढ्या, वगैरेंमध्यें म्हणण्यासारखी प्रगती व भरभराट होऊं लागण्यापूर्वी, तेथील सर्वसाधारण लोकसमाजानें, ब्रिटिश लोकांच्या अंगीं असलेल्या उद्योगधंद्याच्या संवयी आणि सामाजिक हितैकदृष्टी, हे गुण

स्वतःमध्यें आणिले पाहिजेत. नुसते एका मंडळीचे नियम दुसरीला लागू करूनच भागत नाहीं. ते ज्यांना लागू व्हावयाचे, व ज्यांनीं त्यांची अंमलबजावणी करावयाची, त्या दोघांकडूनही ते अक्षरशः पाळले गेले पाहिजेत. सहकारी पतपेढ्यांच्या कर्मेच्यांनीं, आपलें कर्तव्य निर्भयपणें व निर्भीडपणानें बजावलें पाहिजे. तसेंच ऋणकोंनीं कर्जाची फेड हप्तेबंदीनें, नियमित वेळीं व स्वतःच्या जबाबदारीची खरी जाणीव लक्षांत वागवून, करीत गेलें पाहिजे.

येथील लोकांच्या मनांत सहकारी तत्त्वाच्यासंबंधानें इतका कांहीं विश्वास पटलेला दिसतो कीं, त्यांच्या मतें, भांडवलवाले व मजूर यांच्या मधील सतत चाललेला झगडा, वर्गावर्गांतील भांडणें व राज्याराज्यांमधील देखील लढे वगैरे सर्व, हीं तत्त्वें अधिकाधिक अमलांत येत गेलीं व व्यक्तिमात्राच्या नित्यव्यवहारालाही लागू झालीं, तर त्यांच्या द्वारें झाडून बंद करतां येतील. कांहीं लोकांच्या विचाराची तर या बाबतींत याहूनही पुढें धांव आहे. त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, हें तत्त्व मानवजातीला अवश्य लागणाऱ्या वस्तूंची पैदास, पुरवठा, आणि विनिमय, इतक्या पुरतेंच लागू करून थांबावयाचें कांहीं कारण नाहीं. लहान लहानशा समाजाला सुद्धां, सहकारी तत्त्व अमलांत आणल्यानें, पूर्णपणें स्वावलंबी होऊन, आपापल्या सर्व गरजा भागवून घेतां येतील. स्वतःला लागणारे अन्नवस्त्रादिक,

आणि खेळ करमणुकीचे सुद्धां, जिन्नस, पुरवून घेतां येतील, व स्वतः पुरती स्थानिक स्वराज्याचीही स्थापना करण्याचें उपाय शोधून काढतां येतील. सारांश, सर्व तऱ्हेच्या सामाजिक गरजांची पूर्तता, खऱ्या सहकारी तत्त्वाचें व परार्थनिरततेचें अवलंबन केल्यानें होणारी आहे. अस्तु. हें एक सुरेख व सुंदर ध्येय आहे. तें साध्य असो वा नसो. तरी, ही चळवळ आजकाल मान्य झालेल्या व नियमित दिशेनें सुद्धां, पुष्कळच उपयोगी व उत्तेजनार्ह आहे. तिच्या द्वारें खेडींपाडीं व मध्यम वस्तींचीं शहरें यांच्या मधील राहणी, अधिक सुखकारक, भरभराटीची व समाधानाची होण्याचा बराच संभव आहे.

# भाग अठरावा.

## आयरिश् लोक.

एन्निस्कार्थी येथें कांहीं काळ आनंदांत काढल्यानंतर आह्मी आगगाडीनें ग्लेन्मोरला गेलों. त्या दिवशीं तेथील शर्यती होत्या. त्यासाठीं रेलवेनें विशेष सवलती दिल्या होत्या. स्टेशनावर जो गोंधळ दृष्टीस पडला त्याजवरून इकडील रेल-वेचा प्रवास हिंदुस्थानांतल्या इतकाच चांगला किंवा वाईट असल्याचें दिसून आलें. इंग्लंडांत रेलवेचे अधिकारी व नोकर, यांचें वर्तन सभ्यपणाचें असतें, व ते उतारूंना उपयोगीं पडतात, आणि जनतेचे खरे नोकर असे वागतात. पण यावेळीं ते हुकुमत गाजविणारे, स्वयंमन्य, व 'हम् करे सो कायदा,' असे समजणारे अरेराव दिसले. गाडींत फार गर्दी झाल्यामुळें कांहीं उतारू एका पहिल्या क्लासाच्या डब्यांत बसले. पण त्यांना तेथून तात्काळ जोरानें व बळजबरीनें हुसकून लावण्यांत आलें. आमच्या डब्यांतही तसेच कांहींजण घुसलेले होते, त्यांना तेथेंच राहूं दिलें. यावरून आगगाडीच्या प्रवासांत आराम

मिळविण्यासाठीं इकडेही बारीकसारीक नाण्याला किंमत नाहीं असें नाहीं, हें उघड दिसत होतें.

आम्ही ग्लेन्मोर स्टेशनावर उतरलों. तेव्हां तेथें सणामुळें सर्वत्र सुट्टी होती. या देशांत नियमित दिवशीं कोणच्या तरी संताच्या नांवानें सण व सुट्टी पाळण्याचा प्रघात आहे. त्या दिवशीं बहुतेक सर्व कामकाज बंद राहतें. धार्मिक विधि व प्रार्थना आटपल्यावर लोक सारा दिवस, मजा मारतात व आराम करि-तात. म्हणून स्टेशनावर एकही वाहन आलेलें नव्हतें. आह्मांला मुक्कामावर नेऊन पोहोंचविण्याला कोणी मिळेना. शेवटीं तेथील परोपकारी स्टेशनमास्तराच्या रदबदलीनें आह्मांला एक वाटाड्या मिळाला व आह्मी तेथून निघालों. वाटेंत एक जमीनदार—शेतकरी—भेटला. तो त्या वेळीं आपल्या शेताच्या आवारांत शिर-ण्याच्या बेतांत होता. त्याचें वय सुमारें ऐशीं वर्षांवर असूनही तो धट्टाकट्टा व निरोगी दिसत होता. त्याच्याकडे जाऊन, आह्मीं त्याला एकादें वाहन मिळवून देण्याविषयीं विचारिलें. त्यावर, आपल्या तबेल्यांत कोणी असलें तर मोठ्या खुषीनें तजवीज करितों, असें त्यानें उत्तर दिलें.

त्यानें आह्मांला घरांत बोलावून नेलें. तेथें आह्मी त्याच्याशीं बराच वेळ बोलत राहिलों. तो फारच योग्य व प्रेमळ स्वभा-वाचा असल्याचें आमच्या निदर्शनास आलें. तो क्यालिफो-र्नियामध्यें जाऊन आलेला होता. इंडियन लोकांविषयीं

त्याला सहानुभूति होती. आमचा पाहुणचार करण्यांत तो अत्यंत तत्पर होता. त्याच्या प्रेमळ व सौजन्याच्या वर्तनाबद्दल मीं आभार प्रदर्शित करून संतोष झाल्याचें कळविलें. तेव्हां त्यानें मार्मिक उत्तर दिलें:, 'मीं तुमच्याशीं असभ्यपणाचें वर्तन केलें तर हिंदुस्थानांत काय म्हणतील. तें तिकडे प्रसिद्ध झालें तर माझ्या देशाला खचित भूषणावह होणार नाहीं.' 'कोणी आयरिश् गृहस्थ हिंदुस्थानांत गेला तर, हिंदी लोक त्याची अगदीं घरच्यासारखी बरदास्त ठेवतील,' असेंही त्यानें ह्मटलें. तेव्हां, हिंदी लोकांच्या स्वभावाच्या, त्यानें केलेल्या या निदानाबद्दल, त्याच्या गुणग्राहकपणाची मीं तारीफ केली. कांहीं तरी उपाहार घेण्याविषयीं त्यानें आग्रहच धरिला. एकंदरींत तो फारच प्रेमळ व अगत्यवान दिसून आला. आपला मुलगा चांगला शिकला संवरलेला असून, त्याला शेतकरीच राहणें आवडत नाहीं, असेंही त्यानें सांगितलें. हीच स्थिती इतर पुष्कळशा शेतकऱ्यांच्या मुलांची आहे. तो एन्निस्कार्थी येथील एक 'जस्टिस् ऑफ् दि पीस' आहे. लौकरच त्यानें एक टांगा जोडून स्वत: आम्हांला तेथील पाद्र्याकडे नेलें. तेथील सहकारी पतपेढीचा तो पाद्री मूळ प्रवर्तक होता.

माझ्याशीं त्यांचें जें संभाषण झालें तें जसें चित्ताकर्षक तसेंच बोधप्रदही होतें. धार्मिक परिस्थितीविषयीं त्याच्या सांगण्यांत आलें कीं, पाद्री लोक आपापल्या अधिकारांतील

लोकांच्या धार्मिक, तसेंच व्यावहारिक कल्याणाकडेही लक्ष पुरवितात, व सहकारी पतपेढ्यांसारख्या संस्था चालू करण्यांत बरीचशी मदत देतात. असे बुद्धिमान् व वजनदार लोक या चळवळीमध्यें इतकें मनःपूर्वक लक्ष देतात व परिश्रम करितात, यामुळेंच आयर्लंडांत तिचा असा प्रसार होतो आहे. इकडे--किंबहुना साऱ्या यूरोपभर--धार्मिक संस्थांशीं संबंध असलेली धर्मगुरु मंडळी, हिंदुस्थानांतील त्या वर्गाच्या लोकांपेक्षां जास्त सुशिक्षित असते व त्यांच्याशीं लोकही जास्त पूज्यबुद्धीचें व आदराचें वर्तन ठेवतात. आपापल्या हद्दींतील जनसमाजाच्या धार्मिक गरजांविषयीं स्वतःवरील जबाबदारीची त्यांच्यामध्यें जास्त जाणीव व जागृती असते. तसेंच उच्च प्रतीच्या नैतिक ध्येयांचें परिपालन करण्याच्या कामीं निःसंशय त्यांचे अंगीं अचाट शक्ति वसत असते. सार्वजनिक आर्थिक कल्याणाच्या कामाशींही त्यांचा अगदीं निकट संबंध असतो. शारीर सुखसमाधानाच्या अभावीं धार्मिकपणा व नैतिक वर्तन राहणें कठिण, ही गोष्ट इकडील पाद्री मंडळी पूर्णपणें अवगत आहे.

इकडील पाद्री बहुतेक चांगले कुलीन व थोर घराण्यांतले असतात, तसेंच त्यांचें नैतिक वर्तन वरिष्ठ प्रतीचें असतें, असें सांगतात. ते साऱ्या जनसमाजाच्या सेवेंत सादर राहण्याला झटतात. लोकही त्यांना चांगला मान देतात. ते गरीब लोकांचे वाली असून पुष्कळशा दानधर्माच्या योजना सुरू

करण्याच्या कामीं ते नेहमीं झटत असतात. एकंदरींत ते समाजहितदृष्ट्या फार महत्त्वाची, वरिष्ठ दर्जाची व उपयोगाची कामगिरी बजावितात. या संबंधांत हिंदुस्थानानें यूरोपाचें पूर्णपणें अनुकरण करावें असें मला मनापासून वाटतें. ह्मणजेच आमच्याकडील बहुजनसमाजाची प्रगती व सुख समाधान, यांच्या बाबतींत खरोखर पुढें पाऊल टाकण्याची उमेद धरितां येईल. शिवाय, आयर्लंडामध्यें शिक्षणाचें काम पुष्कळ अंशीं पाद्री लोकांच्या हातीं असून ते त्याची सुधारणा करण्याला झटत आहेत. वास्तविकपणें ते लोक आपापल्या हद्दींतील समाजाची नैतिक, धार्मिक व ऐहिक, प्रगती घडवून आणण्याच्या कामीं कोणचीही गोष्ट करण्यांत कसूर करीत नाहींतसें दिसतें.

दानधर्म व औदार्य, या संबंधांत विलायतेच्या लोकांच्या अंगच्या स्वभावांतील विशेष सुंदर गुणांविषयीं विचार करीत असतांना मला एक विलक्षण कल्पना सुचली. हिंदुस्थानांत योगसाधनादिक शास्त्रोक्त मार्गानें चालणाऱ्यांना उत्तेजन देण्यासाठीं व त्यांच्या अभिवृद्धीप्रीत्यर्थ, ज्या तऱ्हेनें दानधर्म केला जातो किंवा जावा, त्याच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. परंतु मला असें वाटतें कीं, वरील हेतु साध्य करण्याकरितां आपण मंडळ्या स्थापन कराव्या व त्यांच्या मधून त्या त्या विषयांत निष्णात लोकांच्या कमेट्या नेमाव्या. त्या कमेट्या,

ज्यांना दानधर्म करण्याला पात्र ह्मणून ठरवितील, त्यांनाच दानधर्म केला जावा, अशी व्यवस्था सुरू करावी. असें झाल्यानें या संबंधांतील अपव्यय बंद होईल, आणि याप्रमाणें झालेली बचत, दुसऱ्या चांगल्या कामांकडे लावतां येईल. हल्लीं कांहीं थोड्या सत्पात्र लोकांना मदत मिळते. पण पुष्कळसा पैसा निवळ रिकामटेकड्या मंडळीवर व्यर्थ खर्च होत आहे. याच्यांत सुधारणा होण्याला पद्धतशीर काम व पक्की व्यवस्था अवश्य आहे. या बाबतींत समाजामध्यें योग्यायोग्याविषयीं असावी तितकी खरी उमज नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. सार्वजनिक हिताविषयीं कळकळ व उत्सुकता यांची वाण असल्यामुळें, आपल्यांतील बऱ्या व वाईट गोष्टींसंबंधाच्या कल्पनांचा विपर्यास झालेला आहे. ही वाण भरून येईपर्यंत, सरळ मार्गानें व सचोटीनें काम करणारे लोक मिळणार नाहींत. समाजाच्या हितासाठीं वर निर्दिष्ट केल्यासारखी चळवळ अमलांत आणण्यामध्यें प्रसंग पडल्यास दुर्लौकिकसुद्धां सहन करण्याला तयार, असे सार्वजनिक हिताप्रीत्यर्थ कळकळीनें व उत्साहानें झटणारे लोक, पुढें येऊं लागतील तोच हिंदुस्थानाला सोन्याचा दिवस होईल.

मी आयर्लंडाला जाऊन आलों, याचें मला फार समाधान वाटलें. कारण, शेतकीसंबंधांत तेथील परिस्थिति पुष्कळ अंशीं हिंदुस्थानांतल्या स्थितीसारखीच आहे, असें मला

आढळून आलें. आयरिश् लोक एकंदरींत आनंदी स्वभावाचे व संसारक्रमांत चित्ताचा समतोलपणा ढळूं न देणारे असे आहेत. या लोकांची स्थिती सामान्यतः गरीबीची असल्यामुळें, ते इंग्लिश लोकांइतपत महत्त्वाकांक्षी नाहींत. दूरदूरच्या भागांतले लोक मागसलेले व विशेष नरम व नम्र वाटतात. त्यांचें वर्तन गौरवाचें, तरी वरिष्ठ वर्गाशीं कांहींसें भित्रेपणाचें व फाजील आदबीचें असतें. या लोकांच्या अंगचे गुणदोष, हिंदुस्थानांत पुष्कळच मोठ्या प्रमाणावर आढळतात असें ह्मणतां येईल.

आयर्लंडाची राजधानी ' डब्लिन् ' येथें गेल्यावर आमची इकडची सफर पुरी झाली. लिफ्फे नदीच्या मुखाजवळ व डब्लिन्च्या सुंदर आखाताच्या शिरावर वसलेलें हें शहर, खरोखरच शानदार दिसतें. प्रेक्षणीय, सुंदर, व मोफत पाहतां येण्याजोग्या ' पिक्चर ग्यालरीज'–चित्रप्रदर्शनशाळा–, पदार्थसंग्रहालय, सार्वजनिक ग्रंथालयें, युनिव्हर्सिटी, आणि अगदीं आधुनिक तऱ्हेच्या म्युन्सिपालिटीला अवश्य अशा सर्व संस्था, तेथें आहेत. तेथील मोकळे व प्रशस्त चौक व सार्वजनिक बाग फार व्यवस्थित रीतीनें राखलेले आहेत. सर्वांत महत्त्वाची व पाहण्याजोगी इमारत येथील 'क्यासल्'–किल्ला–ही होय. तो मीं जाऊन पाहिला. या किल्लयांत आयर्लंडचे व्हाइसराय साहेब रहातात आणि बादशहांचा प्रतिनिधी या नात्यानें ते तेथेंच सरकारी दरबार–

लेव्ही—चा समारंभ व हिंदुस्थानच्या व्हाइसरॉय साहेबांना साधारणतः करावीं लागणारीं बहुतेक इतर सरकारी कामें करीत असतात. या किल्ल्यांत प्रातिवार्षिक जे समारंभ होतात त्या संधीला डब्लिन् शहरीं बरेच बाहेरचे लोक राहण्यास येतात आणि विशेषतः आगष्ट महिन्यांत जें घोड्यांचें प्रदर्शन होतें त्यावेळीं तर हा जनसंमर्द फारच वाढतो.

या शहरांत दिसून येणाऱ्या प्रगतीचा व भरभराटीचा पुष्कळच भाग लॉर्ड आयव्हे यांच्या उत्साहयुक्त दीर्घ उद्योगाचें व औदार्याचें फल आहे. ते पूर्वी ' मेसर्स ग्विन्नेस आणि कंपनी' नांवाच्या प्रसिद्ध दारूच्या कारखान्याचे मुख्य होते. हा अफाट कारखाना पाहून येण्याची मला संधी मिळाली, व तो पाहून माझ्या मनावर फारच चांगला ग्रह झाला. हा कारखाना डब्लिन् येथील प्रसिद्ध स्थळांपैकीं एक असून त्याला एखाद्या सार्वजनिक प्रदर्शनाचें स्वरूप प्राप्त झालें आहे, असें ह्मणण्यास विशेष हरकत दिसत नाहीं. डब्लिन् शहर पाहण्यास येणारे बहुतेक लोक तो बुद्ध्या पाहण्यास जातात.अशा मंडळीसाठीं 'वेटिंग रूम्स' बांधलेल्या असून कारखाना फिरून दाखवून आणण्यासाठीं, एक ' गाईड'—वाटाड्या—नेमलेला आहे. दारू आंबण्याचे प्रचंड 'व्हॅट्स'—अजस्र पिपें—आम्हीं पाहिलीं. दारू तयार करण्याचे पदार्थ आंबत होते त्या स्थळाखेरीज कोठेंही, हा दारू गाळण्याचा कारखाना आहे असें कळून येण्याजोगी

दारूची घाण येत नव्हती. सर्व जागीं विलक्षण स्वच्छता व टापटीप होती. तेथें सर्व बाबतींत दिसून येणारा सुव्यवस्थितपणा व काम करण्याची पद्धत, हें पाहिलें असतां इंग्रज लोकांच्या अंगीं उद्योगधंद्याच्या बाबतींत जी संघटनात्मक शक्ती वास करीत आहे तिचा चांगला अनुभव येतो. आह्मी नदीपर्यंत जाऊन आलों. तसेंच 'माल्ट्'—दारू आंबविण्याचीं द्रव्यें—ठेवण्याची जागाही पाहिली. येथें माल इतका कांहीं तयार होतो कीं, कारखान्याच्या निरनिराळ्या भागांतून त्याची नेआण करण्यासाठीं, व तयार झालेला माल चोंहींकडे पोहोंचविण्याकरितां, एक लहानशी रेलवे लाईन घातलेली आहे.

थोड्या वर्षांखालीं लार्ड आयव्हे यांनीं हा सारा कारखाना एका कंपनीला,पन्नास लक्ष पौंड(साडेसात कोटी रुपये)ला विकला. तेव्हां त्यांनीं त्यांपैकीं अडीच लक्ष पौंड(साडेसदतीस लक्ष रुपये गरीब लोकांना थोड्या भाड्यानें देतां येण्या जोग्या चाळी बांधण्यासाठीं दिले. त्यांतून पांचवा हिसा डब्लिन् येथें व बाकी लंडनमध्यें खर्च करण्याचें होतें. तसेंच त्यांनीं डब्लिन् येथील सार्वजनिक आरोग्याला अपायकारक असा एक वस्तीचा भाग साफ करून, तेथें कामकऱ्यांसाठीं घरें, स्नानाच्या जागा, गायनालयें, वगैरे बांधण्याकरितां तितकीच रकम दिली आहे. रोगप्रतिबंधक औषधोपचाराचा अभ्यास व नवीन शोध कर-

ण्यासाठीं लंडनमधील 'जेन्नर' इन्स्टिटयूटलाही त्यांनीं तितकीच रकम बक्षीस दिली आहे. या गोष्टी येथें नमूद करणें अवश्य आहे.

डब्लिन्‌मध्यें असतांना आह्मी सर होरेस प्लंकेट यांच्या भेटीला गेलों होतों. त्यांनीं आह्मांला भोजनाला निमंत्रण दिलें. त्यांचें 'किल्टराव-फाक्स्‌रॉक्' नांवाचें सुंदर घर समुद्रापासून जवळच आहे. तें फारच मजेदार असून हवा व प्रकाश, यांचा भरपूर पुरवठा होईल अशा रीतीनें बांधलेलें आहे. त्या प्रांतामध्यें ही जागा अव्वल प्रतीची आरोग्यदायक असल्याचें, त्यांनीं सांगितलें. सर होरेस साहेबांना संभाषणाची ढब सुरेख साधलेली आहे. त्यांनीं मला आयरिश् 'पार्लिमेंटेरियन्' मंडळीच्या बऱ्याचशा गमतीच्या गोष्टी सांगितल्या. त्यांनीं सांगितलेले ' आयरिश् बुल्लस्' चे चुटके फारच मनोरंजक होते. हे आमचे सुप्रसिद्ध यजमान सर होरेस साहेब फारच उत्तम स्वभावाचे होते. त्यांच्याबरोबर बोलण्याचालण्यांत माझा काळ मोठ्या आनंदांत व गमतीनें गेला. सर होरेस यांचें आजवरचें चरित्र चमत्कारिक व संस्मरणीय झालेलें आहे. ते पुष्कळ वर्षें अमेरिकेंत 'क्याटल् रांचिंग'—कुरणांमध्यें गुरें पैदा करून विकण्याचें काम—करीत होते. नंतर शेतकरी लोकांमध्यें सहकारी संस्थांचा प्रचार करण्याचें काम त्यांनीं हातीं घेऊन, ' आयरिश ॲग्रिकल्चरल् आर्गनायझेशन् सोसा-

इटी'ची स्थापना केली. या संस्थेनें साऱ्या आयर्लंडभर जमीनीची लागवड सुधारण्याच्या कामीं प्रयत्न करून, किती तरी यश मिळविलें आहे. सन १८९२ सालीं. 'डब्लिन् कौंटी, सौथ' या प्रांतातर्फे ते पार्लमेंटमध्यें निवडून आले. तेथें त्यांनीं आठ वर्षे सर्वांकडून मानमान्यता व लोकप्रियपणा संपादन करीत काम केलें. नेहमीं नानाप्रकारच्या कामाकाजांत गुंतलें असतांना व सारें आयुष्य काहींना कांहीं महत्त्वाचा उद्योग करण्यांत रत झालें असतांना देखील, ग्रंथलेखनाचें काम करण्यास त्यांनीं फुरसत काढली आहे. त्यांचें 'आयर्लंड इन् धि न्यू सेंचरी'—नवयुगांतील आयर्लंड—हें पुस्तक फारच पसंत झालेलें असून, त्यांतील मतें सर्वमान्य झालीं आहेत. तसेंच त्यांनीं 'धि रूरल् लाइफ् प्रॉब्लेम् ऑफ् धि युनायटेड् स्टेट्स' हें व दुसरींही पुस्तकें लिहिलीं आहेत.

त्यांचा निरोप घेऊन आम्ही होलीहेडला जाण्याला आगबोटीवर चढलों, व तेथून लंडनला परत आलों. वाटेंत मला वेल्स देशाचें धूळदर्शन झालें. तो देखावा पाहून आनंद वाटला. हा देश विलायतेचा एक अंकित भाग बनल्याला कांहीं शतकें झालीं तरी तो स्वतःला बऱ्याच अंशीं अगदीं स्वतंत्र समजतो, हें चमत्कारिक आहे. स्कॉटलंडप्रमाणेंच या देशांतही पृथक् राष्ट्रीयत्वाचे विशिष्ट गुण कायम असलेले आढळतात. हा देश डोंगराळ असून तेथील हवा-

पाण्यांत स्थळपरत्वें फरक पडतो. आम्हीं पाहिलेला त्याचा भाग ब्रिटिश बेटांतील इतर बऱ्याच भागांच्या मानानें तितका संपन्न किंवा भरभराटाची दिसला नाहीं. गांव व घरें गरीबीचीं व कमी दर्जाची होती. नित्यक्रम, राहणी व परिस्थिती, हीं सर्वसाधारणपणें कांहींशीं उदासवाणीं वाटलीं. 'कार्नार्व्हन्' किल्ल्याचा बराच चांगला देखावा पाहण्यास सांपडला. तेथेंच हल्लींचे शहाजादे यांना 'प्रिन्स ऑफ् वेल्स' चा किताब देण्याचा ऐतिहासिक समारंभ, शहानशहाच्या हातून मोठ्या थाटानें व भपक्यानें साजरा करण्यांत आला होता. हा किल्ला एका फारच खडबडीत डोंगराच्या कडप्यावर बांधलेला, चागला प्रेक्षणीय, चित्रासारखा दिसतो. तो फार भक्कम व मजबूत बांधलेला आहे.

स्कॉटलंड्, व आयर्लंडमधील नवे नवे व चमत्कारिक अनुभव घेऊन मी परत लंडनला आलों तेव्हां, वाटेंत मला जसें कांहीं स्वगृहींच परत जात असल्यासारखें वाटत होतें. कारण, गेल्या कांहीं महिन्यांच्या सहवासानें तेथील परिस्थिती व देखावे माझ्या निकट परिचयाचेसे झाले होते. 'रग्बी,' 'त्र्यू' व अशाच उद्योगधंद्यामुळें गजबजलेल्या व मधमाशांच्या पोळ्याप्रमाणें वाटणाऱ्या मोठमोठ्या गांवांवरून व उंचचउंच व प्रचंड चिमण्या आणि अफाट कारखाने, याच्या मधून आगगाडी वेगानें लंडनच्या सभोंवतालच्या

प्रदेशाकडे धावत चालली होती. त्या भागांत मनोरम व टापटिपीनें ठेवलेल्या वाड्या, बंगले, व उपवनांतील वाटिका नजरे समोरून जात होत्या. या प्रदेशांतील सुखवस्तू मंडळीं-जवळ सुखांची साधनें भरपूर असल्यामुळें, हीं स्थळें, आयर्लंडांतील परिस्थितीच्या पेक्षां किती तरी चांगलीं, रम्य, व सुखदायक, वाटत होतीं.

# भाग एकोणिसावा.

## इंग्लंडांतील व हिंदुस्थानांतील जीवनक्रम.

हिंदुस्थानांत मोठमोठ्या हुद्दयाच्या जागेवर इंग्रज लोक जातात ते, आपल्या घरीं ज्या तऱ्हेनें राहतात व सुखसोईंचा उपभोग घेतात, त्यापेक्षां तिकडे फारच जास्त मिजासीनें व श्रीमंती डौलानें राहतात, अशी तिकडील लोकांची सार्वत्रिक समजूत असलेली दिसते. अधिकाराची बडेजाव व जाणीव यां-विषयीं हा समज अंशतः खरा असला तरी, संसारांत नित्याच्या राहणीचें खरें सुख व सोई, यांच्या संबंधानें पाहतां, फाजील ऐषआरामाविषयींची समज निवळ काल्पनिक आहे, असें कबूल करावें लागतें. इकडे त्यांना घोड्याच्या जोडीची गाडी व पांच चौकड्या नोकर, ठेवतां येणें शक्य नसेल. पण हिंदु-स्थानांतील एखाद्या जिल्ह्याचा अधिपति या नात्यानें त्यांना जे ऐषआराम अनुभविण्यास सांपडतात त्यापेक्षां त्यांना आपल्या मातृभूमींत किती तरी अधिक सुख व इतर संसा-राच्या पुष्कळशा सोई सहजगत्या प्राप्त होतात.

हिंदुस्थानांतून परत आलेल्या बऱ्याच आंग्लो इंडियन लोकांच्या घरीं जाऊन, त्यांच्या मुलाखाती घेण्याचे मला प्रसंग आले. तेव्हां ते हिंदुस्थानांतल्याही पेक्षां जास्त सुखसमाधानांत रहात असल्याचें माझ्या निदर्शनास आलें. त्यांच्यांतील कांहीं, सुरेखशा आवारांमध्यें आरामशीर व मनोरम अशा स्वतःच्या घरांमध्यें राहतात. त्यांनीं घरची जोडी व गाडी किंवा मोटार-ही ठेवलेल्या आहेत. इतपत थाटानें न राहतां येणारे लोक-सुद्धां चांगल्या मोठ्याशा गांवांत राहतात. तेथें त्यांना गाडी व नोकर यांच्यापासून प्राप्त होणारीं सर्व सुखें व सोई मिळतात. इंग्लंडांतील एखादा कामकरीसुद्धां हिंदुस्थानांतील सुखवस्तू गृहस्थापेक्षां खरोखर जास्त सुखांत व आरामांत राहात असतो, असें दिसतें. त्याचें राहतें घर चांगलें पक्कें विटांचें किंवा दगडांचें बांधलेलें असतें. त्याच्यांत सोईस्कर व आरामदायक, राहण्याच्या व निजण्याच्या, पृथक् पृथक् खोल्या असतात. आटपशीर स्वयंपाकघर व पलीकडे जवळच काम करण्यास सोईची व उपयोगी अशीं भांडीं वगैरे ठेव-ण्याची कोठी असते. आणि या सर्व जागेंतील व्यवस्था व टापटीप फार स्वच्छतेची व नीटनेटकी असल्याचें दिसून येते.

इंग्रज लोकांचे क्लब हिंदुस्थानांत घाटावरील साहेब लोकांच्या क्लबांपेक्षां चांगले असतात. त्यांच्यामध्यें ' ईव्हिनिंग पार्टीज ' व 'डिनर पार्टीज,'—सायंकाळचे सम्मेलन व मेजवान्या—होतात. तसेंच तेथें ' गोल्फ ' आणि ' टेनिस ' चे खेळ चालतात.

सामान्यजनसमूहाला 'क्रिकेट' व 'फुटबॉल' हे खेळ अधिक आवडतात. वरिष्ठ प्रतीचे सधन लोक आणि सुखवस्तू मंडळी, यांचा मुख्य करमणुकीचा खेळ गोल्फ. तो खेळण्याचीं पुष्कळशीं 'लिंक्स'—मैदानें—फारच सुरेख आहेत. इकडे 'टेनिस' आमच्या देशांतल्या इतकें जलद खेळत नाहींत. कारण, आमच्या इकडे जमीन सूर्याच्या तापानें कठीण होते. समुद्र व नद्या, यांच्यामध्यें बोटींत बसून वल्हवीत फिरून येण्याचीही सोय असते. ही करमणूक 'युनिव्हर्सिटयां'मध्यें तर विशिष्ट महत्त्वाची मानली जाते. 'ऑक्सफर्ड' व 'केंब्रिज' येथील विश्वविद्यालयांतील विद्यार्थ्यांच्या दरम्यान दरसाल टेम्स नदीवर बोटींचा सामना होत असतो, तो माझ्या पाहण्यांत आला. इंग्लंडमध्यें प्रतिवर्षीं जे सार्वलौकिक करमणुकीचे खेळ होतात त्यांपैकीं हा बोटींचा सामना फारच लोकप्रिय झालेला आहे. इंग्लिश शिक्षणक्रमामध्यें खेळकरमणूक हा एक पुष्कळच महत्त्वाचा भाग मानला जातो. प्रत्येक शाळेला स्वतंत्र खेळण्याची जागा जोडलेली असते. प्रतापशाली डयूक ऑफ् वेलिंग्टन् यांनीं 'वाटर्लूची लढाई ईटन् येथील खेळाच्या मैदानांत जिंकली गेली,' असें ह्मटलेलें प्रसिद्ध आहे. त्याच्यावरून, शारीर शिक्षण व त्याचा अभ्यास, यांची योग्यता व प्रौढी किती समजली जाते, तें सिद्ध होतें.

शर्यतीमध्यें सर्व प्रतीचे लोक, भारी आतुरतेनें रममाण होतात. 'डार्बी'ची शर्यत सर्वांत अधिक लोकप्रिय असून



इचलकरंजीचे अधिपति आणि राणीसाहेब.



इचलकरंजीचे अधिपति आणि राणीसाहेब

तिला एखाद्या लोकप्रिय महोत्सवाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. 'ऑस्काट्' येथील शर्यतीचा समारंभ सर्वांत जास्ती भपके-दार व थाटाचा होतो. पण तो वरिष्ठ दर्जाचे लोक व निवडक मंडळी, यांच्या पुरताच असतो. या शर्यतीच्या प्रसंगीं जॉर्ज बादशहा व महाराज्ञी मेरी, राजकीय शिष्टाचाराचे निर्बंध बाजूला ठेवून आपल्या मित्रमंडळीशीं मोकळेपणीं गप्पा गोष्टी करीत असल्याचें पाहून मला फार संतोष वाटला. या प्रसंगीं शहानशहा खऱ्या नमूनेदार इंग्लिश सभ्य गृहस्था-प्रमाणें वागत होते. हीच तऱ्हा त्यांच्या परमप्रिय पित्याची—किंग एडवर्ड यांची—ही असे. त्यावरून सर्व लोकांकडून, त्यांना मोठ्या प्रेमानें, साऱ्या युरोपांतील 'अव्वल व अप्र-तिम दर्जाचे सभ्य गृहस्थ' असें नामाभिधान मिळालेलें होतें.

इंग्रज लोकांची राहणी, सुखकारक सोई व आराम यांचें मान आमच्यापेक्षां सर्व रीतीनें वरिष्ठ प्रतीचें आहे. त्यांच्या सामान्य घरांमध्यें सुद्धां जी स्नानागाराची सोय असते, तशी हिंदुस्थानांत कालांतरीं सुद्धां प्राप्त होण्याची आशा नाहीं. आरोग्याचें मुख्य साधन—शुद्ध पाण्याचा मुबलक पुरवठा—तो इकडे मनमुराद असतो. घरोघर पाण्याचे नळ असतात. हवे तेव्हां चावी फिरवितांच, राहण्याच्या व स्नानाच्या कोठड्यांमध्यें पाणी तयार. या सोईचा उपयोग, फायदा व महत्त्व, हिंदु-स्थानांतील लोकांच्या तेव्हांच ध्यानांत येईल. तिकडे मोठाल्या शहरांशिवाय हवें तेव्हां पाणी मिळण्याची सोय मुळींच नसते.

तें बऱ्याच दूर अंतरावरच्या विहिरींतून शेंदून भरून घरीं न्यावें लागतें.

घरखर्चास लागणाऱ्या इतर वस्तूही इंग्लंडांत हिंदुस्थानांतल्यापेक्षां सहज व सोईवार मिळतात. दूध, लोणी, भाजी, वगैरे घरोघर आणून पोहोंचवितात. ग्यासाचे आणि विजेचे दिवे तात्काळ लावतां येतील अशा तजविजीनें घरांत बसविलेले असतात. या सर्व सोईंमुळें गृहकृत्यांचा बोजा किती तरी हलका होतो. नोकर कमी असले तरी, ते विशेष नीटनेटके व टापटिपीनें काम करणारे असतात. हिंदुस्थानांतील वीस नोकरांपेक्षां इंग्लंडांत पांच सहा किंवा त्याहूनही कमी नोकर जास्त मेहनतीनें व पुष्कळच अधिक काम देतात.

मोठ्या सावजांची शिकार या एका बाबतींत मात्र आंग्लोइंडियन लोकांना हिंदुस्थानांतल्यापेक्षां, विलायतेंत अधिक उणीव असते. इकडे अशा शिकारीच्या करमणुकीचें साधनच कमी. जी कांहीं शिकार आहे ती फार खर्चाची; इतकी कीं, अव्वल दर्जाच्या श्रीमान् लोकांनाच आपलें कोड पुरविणें शक्य असतें. 'पोलो' हा खेळ खेळण्याची सोयही त्यांना इकडे तितक्या सुलभपणानें करतां येणें शक्य नाहीं. 'रॅनेला क्लब' सारख्या क्वचित् ठिकाणीं मात्र या खेळाची तरतूद केलेली आहे. पण ते लोक पेन्शन घेतात तोंपावेतों, बहुशः त्यांच्यामध्यें या खेळाविषयीं तितकी आतुरता व आस्थाही राहात नाहीं, कारण

या खेळांत फारच अंगमेहनत पडते, आणि म्हणून ही करमणूक लाभत नाहीं याबद्दल त्यांना तितकें वाईटही वाटत नसावें. उलट पक्षीं या वरील करमणुकींच्या साधनांची उणीव भरून काढणारीं अशीं दुसरीं अनेक प्रकारचीं शिकार करण्याचीं साधनें त्यांना इकडे उपलब्ध असतात. उदाहरणार्थ, 'स्टॅग'—एक प्रकारचा काळवीट,—कोल्हा, व हरीण यांची घोड्यावरून पारध करणें, आणि ससे, 'ग्राऊज्' व 'कुकण' पक्षी व कवडे यांची बंदुकीनें शिकार करणें, तसेंच 'सामन' वगैरे माशांना गळ घालणें, या गोष्टी त्यांना येथें साध्य असतात.

आह्मी स्कॉटलंडमध्यें असतांना तिकडील कांहीं 'ग्राउज्' पक्षी राहण्याच्या दलदलीच्या जागा पाहिल्या. त्यांच्यांत ज्याला आपण 'शूटिंग बॉक्सेस्'(शिकार करण्याचे माळे) ह्मणतों, ते पुष्कळ वेळां ठराविक मुदतीनें भाड्यानें देत असतात.सद्गृहस्थ शिकारीच्या पार्टी देतात व त्या प्रसंगीं आपल्या मित्रमंडळींना निमंत्रणें पाठवितात; आणि खुद्द राजेसाहेब देखील कृपाळू होऊन कांहीं मंडळीच्या निमंत्रणाचा स्वीकार करतात. शहानशहा हे वडिलाप्रमाणेंच उत्तम निशाण मारणारे आहेत.ग्राउज्, कुकण, कवडे अशा प्रकारच्या पाखरांची शिकार अमुकच दिवसांत करावी असें कायद्यानें ठरविलेलें आहे. ही शिकार करतेवेळीं बंदूकवाल्यांच्या पुढें, झाडांझुडपांतून पांखरें उठविण्यासाठीं, हांका करणारे लोक जातात.उठविलेलीं पांखरें चोहींकडे उडूं लागतात,

तेव्हां त्यांच्यावर बंदुका झाडून त्यांची शिकार करितात. या कामीं कुत्र्यांचाही पुष्कळ उपयोग करितात. त्या कुत्र्यांना 'पाइंटर' म्हणतात. ते वासावर पांखरांचा सुगावा काढून, त्यांचें ठिकाण शिकाऱ्यांना दाखवितात. या कामीं त्यांना शिकवून तयार केलेलें असतें.

'स्टॅग'ची शिकार मुख्यत्वें स्कॉटलंड व इंग्लंडांतील थोड्याशाच जंगली प्रदेशामध्यें करण्यास सांपडते. हे 'स्टॅगस्' काळवीटा सारखेच दिसतात. त्यांना गाडींत बंद करून, नेमलेल्या ठिकाणीं, ठरलेल्या वेळीं व खुणेवर बाहेर सोडतात. शिकार करणारे घोड्यावर स्वार होऊन, शिकारी कुत्र्यांच्या जोड्या बरोबर घेऊन, त्यांच्या मागें धांवतात. ते थकून जमीनदोस्त होई तों कधीं कधीं २९।३० मैलांची दौड करावी लागते. स्काटलंडच्या 'हायलंड्स' मध्यें, विस्तीर्ण जंगली माळरानें पुष्कळ आहेत. त्यांच्यांत शिकारी साठीं हरणें राखून ठेवतात. अशा प्रकारचें सर्वांत मोठें जंगल एक लक्ष एकरांचें व सर्वांत लहान ह्मटलें ह्मणजे त्याच्या एकदशांश विस्ताराचें असतें. हरणाची शिकार करण्याकरितां स्कॉटलंड मध्यें लहानमोठ्या डोंगरांच्या रांगांची चढउतर करावी लागते म्हणून या कामासाठीं तट्टांचा उपयोग करतात. तीं तट्टें फारच मजबूत व पायांचीं पक्कीं असतात. या शिकारीमध्यें चलाख व चपल हरणांची

पाठ पुरवावी लागत असल्यामुळें ती फारच कष्टप्रद असते. उन्हाळ्यांत त्यांना जंगलांत चारा मुबलक मिळतो तेव्हां हीं हरणें साऱ्या रानांत चरत फिरत राहतात. हिवाळ्यांत तीं राखणदारांच्या झोपड्यांजवळ येतात. तेथें त्यांना दररोज चारा घातला जातो. इंग्लंडांत हरणें मूळ रोमन लोकांनीं नेलीं, असें ह्मणतात. पण त्यांचे 'फॉसिल्स'—अश्मीभूत अस्थीचे अवशेष—कोठें कोठें आढळून आल्याचे उल्लेख आहेत. त्यावरून तीं इकडे त्यांच्या पूर्वी युगांचीं युगें होतीं, असें दिसून येतें.

इंग्लंडांतील किती तरी कुटुंबांचा हिंदुस्थानाशीं निकट संबंध आहे, हें आश्चर्य वाटण्याजोगें आहे. जिकडे जावें तिकडे, स्वतः हिंदुस्थानांत जाऊन आलेले, किंवा आप्तइष्ट व स्नेही, तिकडे असलेले लोक आढळतात. असें असूनही त्यांच्या ताब्यांतील त्या देशाविषयीं त्यांना पुरी माहिती नसावी, ही फारच आश्चर्याची गोष्ट होय. सामान्यतः हिंदुस्थान एक स्वतंत्र खंड आहे, त्याच्यांत अनेक निरनिराळ्या राष्ट्रजाति असून तेथील हवापाण्यांत जागजागीं पुष्कळच फरक आहे, तसेंच रीतीरिवाजही निरनिराळ्या प्रकारचे आहेत, या गोष्टींची त्यांना कल्पनाच होत नाहीं; आणि यामुळें त्याच्या एका भागाविषयींचें विधान दुसऱ्याला लागू पडणार नाहीं, याचें त्यांना स्मरण राहत नाहीं. उदाहरणार्थ, हिंदुस्थानची हवा

येथूनतेथून अत्यंत उष्ण आहे, अशी इकडील लोकांची सर्व-सामान्य समजूत आहे.पण तेथें खुद्द इंग्लंडांतल्यासारखें हवापाणी असलेलेंही कांहीं प्रांत आहेत, हें त्यांना माहित नाहीं.और्ध्व-देहिक चालीरीतींमध्येंही पुष्कळच फरक आहे. कोठें त्यांच्यांत उत्सवासारख्या प्रकाराचा समावेश होतो, तर कांहीं भागांत वर्षवर्षभर सुतक पाळण्याचा प्रघात आहे. कांहीं जातींत प्रेताचें दहन करितात, तर दुसऱ्या बऱ्याच लोकांमध्यें तीं पुर-तात. अशामुळें हिंदुस्थानाविषयीं भलत्याच कल्पनांचा सामा-न्यतः सर्व इंग्रज लोकांमध्यें फैलाव होणें किती साहजिक आहे, तें लक्षात येईल.

इंग्लिश बागबगीच्यांचें सौंदर्य माझ्या विशेषतः मनांत भरलें. हिंदुस्थानांत एखाद्या साहेबाला आपला बाग चांगल्या स्थितींत ठेवण्याचा झाल्यास पुष्कळ खर्च करावा लागतो आणि येवढा मोठा खर्च सोसूनही पाण्याची टंचाई व पाव-साची अनिश्चितता यांच्यामुळें त्यास या बागेला तितकें चांगलें स्वरूप आणतां येत नाहीं. परंतु इंग्लंडमध्यें तितक्याच स्वरू-पाची बाग तयार करण्यास तिकडच्यापेक्षां पुष्कळच कमी खर्च येतो. सृष्टिदेवतेची इकडे चांगलीच कृपा आहे. यामुळें प्रत्ये-काला बहुधा लहान मोठा टुमदार बगीचा तयार करतां येतो. त्याच्यांत फळें, फुलें, व भाजीपाला पुष्कळच पैदा करितात. बऱ्याच ठिकाणीं कोंबडीं, बदकें, हीं पोसून तयार करितात.

टीच टीचभर जागासुद्धां उपयोगांत आणून, तिच्यापासून मालक स्वतःचा फायदा करून घेत असतो. शिवाय ह्यामुळें त्यांस सूक्ष्मनिरीक्षण, उद्योगीपणा, व काटकसर, यांचें चांगलेंच शिक्षण मिळतें; आणि ते उपयोगी व हुषार नागरिक बनतात. अगदींच लहान बगीच्याचे तुकडे असतील तेथें सुद्धां जीं तऱ्हतऱ्हेचीं पिकें घेतलीं जातात तीं पाहून मन आश्चर्य चकित होतें. बहुतेक प्रत्येक जातीची फळफळावळ, भाजीपाला व फुलें, तसेंच 'बेरीज'—बोरीच्या जातीचीं लहान लहान फळें—पैदा करितात. त्यांच्यांत प्रत्येक जातीचीं रोपें क्वचित् प्रसंगीं नमून्यादाखल अगदीं मोजून लावलेलीं आढळतात.

इंग्लंडांत बहुतेक खेडींपाडीं व शहरें यांच्यांत प्रतिवर्षीं फुलांचीं प्रदर्शनें होतात. तेथें उत्तम बगीचे ठेवणाऱ्यांना व अव्वल प्रतीचीं फुलें, फळें व भाजीपाले, यांचे स्थानिक नमूने आणणाऱ्यांना, नगदी इनामें देतात. यामुळें त्यांच्या पैदासीला उत्तेजन मिळतें. हीं फुलें तयार करण्याचा शोक मानसिक उन्नति करणारा असून तो मनुष्यमात्राला मिळणाऱ्या सुखसमाधानांपैकीं उत्तमोत्तम व शुद्ध असा आनंद होय, असें इंग्लंडांतील थोर तत्त्ववेत्ता बेकन यानें लिहिलें आहे. त्याच्याबरोबरच, इंग्लंड देशाच्या थोरवीचा पक्का पाया जें स्वगृहप्रेम, त्याचीही चांगली अभिवृद्धि होते.

ज्ञानसंपादन व त्याचें वर्धन, यांविषयींच्या सवलतीमध्येंही, इंग्रज लोकांची स्थिती, हिंदी लोकांच्या पेक्षां अधिक चांगली

आहे. सार्वजनिक पुस्तकालयें बहुत करून प्रत्येक गांवांत असतात. त्यांचा उपयोग, श्रीमंत गरीब, सर्व लोकांना सारखा मोफत करून घेतां येतो. त्यांच्या पासून जसा वाङ्मयात्मक तद्वतच शिक्षणविषयक फायदा करून घेण्याचीं साधनें, यां-पैकीं अनेक पुस्तकालयांत उपलब्ध असतात.कारण, हिंवाळ्या-च्या दिवसांत तेथें शास्त्रीय व इतर विषयांवर, साधारण लोकांनाही सहज समजतील, अशीं व्याख्यानें होतात. साऱ्या जगांतील अत्युत्तम पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांपैकीं शिरोरत्न अशा मिचेल फाराडे याच्या उदाहरणावरून अशा प्रकारच्या व्याख्यानांची उपयुक्तता किती आहे याची पुरी कल्पना होते. तो एका सामान्य लोहाराचा मुलगा. शास्त्रीय उपयोगाचीं यंत्रें बनविण्याच्या कामीं, त्याच्या उपजत कल्पकपणाचा बराच विकास झाला होता. एका मित्राच्या मेहरबानगीमुळें, त्याला 'रॉयल इन्स्टीटयूशन' मध्यें होणारें सर हंफ्री डेव्ही यांचें व्याख्यान ऐकण्याची संधि मिळाली. कोळशाच्या खाणींत उप-योगांत आणीत असलेल्या दिव्याचा शोध लावला, तो यांनींच. या लोहाराच्या तरुण मुलानें, त्या व्याख्यानाचें टांचण लिहि-लेलें पाहून, सर हंफ्री डेव्ही साहेब इतके प्रसन्न झाले कीं, त्यांनीं त्याला आपल्या प्रयोगशाळेंत मदतगार नेमिलें. शेवटीं त्यांच्या पश्चात्, सार्वजनिक व्याख्यानें देण्याच्या कामावर फारा-डेची नेमणूक केली गेली. त्यांची पुढें साऱ्या जगांत प्रसिद्धी झाली. परलोकवासी महाराणी व्हिक्टोरिया, यांनीं, त्यांना

' ह्यांपटन् कोर्ट 'च्या राजवाड्यामध्यें राहण्याची सोय करून देऊन, त्यांचा बहुमान केला. तेथेंच त्यांनीं आपलें बाकीचें आयुष्य सुखानें घालविलें.

खेळकरमणुकीच्या सबंधांत देखील इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांची तुलना केली असतां दुसरा देश हाच पहिल्या-पेक्षां कमी प्रतीचा ठरतो. हिंदुस्थानांत एखादा 'जिमखाना'—क्रीडाभुवन—स्थापन करून त्या ठिकाणीं खेळ खेळण्याची व्यवस्था करण्याचें सामर्थ्य असणाऱ्या लोकांची संख्या हाताच्या बोटांवर मोजण्याइतकी असते. आणि तेथें बराचसा खर्च करून देखील कांहीं मर्यादित खेळ खेळण्याची सोय होते. इकडे इंग्लंडांत, व्यायाम करण्याचे व इतरही पुष्कळ क्लब आहेत. त्यांचे मेंबर पुष्कळ असतात. यामुळें अगदीं थोड्या खर्चांत हवे तितके डाव खेळून व्यायाम करण्याला सांपडतें.

इंग्रज लोक सामान्यतः ज्या ऐषआरामाचा उपभोग घेतात, तो सर्वत्र उघड दृष्टीस पडतो. इकडील साधारण प्रतीच्या सुद्धां लोकांचे कपडे, हिंदुस्थानांतील सुखवस्तू लोकांच्या कपड्यां-इतके चांगले असतात. येथल्यापेक्षां तिकडे कापड किती तरी महाग व हलक्या प्रतीचें असतें.तसेंच इकडे पुष्कळच सोईवार व आरामांत प्रवास करतां येतो. इकडील आगगाड्यांतला तिसरा क्लास, तिकडच्या पहिल्या क्लासासारखा असतो. इकडे सर्वच उतारूंच्या सुखसोईकडे लक्ष पुरवितात. तिकडल्या

प्रमाणें वर्गावर्गी अगर दर्जा, यांच्यावर आगगाडींतील सुखसोईचें मान अवलंबून ठेवलेलें नसतें.

लंडनमध्यें जमीनी खालून मोठमोठाले नळे घालून त्यांच्यांतून रेलवे नेलेल्या आहेत. अशा आगगाडींत क्लासवारी नसून सरसकट भाडयाचा दरही एकच आकारला जातो. ब्रिटिश कामकरी मजूर—'श्रृंगप्राय कठिण हात झालेला मेहनतीचा पुत्र'—सहज किंवा समजून उमजून व कदाचित् पर्वा न करतां या आगगाडींत, कोणा वरिष्ठ दर्जाच्या गृहस्थाच्या किंवा एखाद्या डयूकाच्याही शेजारीं खेटून बसण्यास कमी करीत नाहीं. हा संयोग ह्मणजे जणों खादी व मखमल एकत्र केल्यासारखा चमत्कारिक दिसतो. परलोकवासी डयूक ऑफ् केंब्रिज यांच्या हस्तें थोड्या वर्षांखालीं 'सेंट्रल लंडन टयूब रेलवे' सुरू करण्याचा समारंभ झाला. त्यांचें वर्तन अगदीं साधें असे. त्यांना ऐट व मिजास मुळीं ठाऊक नव्हती. ते या सर्व वर्गांच्या माणसांनीं वापरण्याच्या लोकप्रिय रेलवेंतून वारंवार आवडीनें प्रवास करीत असत. त्यांच्या हातीं नेहमीं एक भली थोरली छत्री असे. त्यावरून ' अंब्रेला डयूक '—छत्रीवाले डयूक—असें त्यांचें नांव पडलें होतें. एकदां एकाचा अकस्मात् धक्का लागून ती छत्री पडली. तो निवळ कामकरी मजूर—त्याला त्यांची मुदलांत माहिती नव्हती. त्यानें छत्री उचलून त्यांच्या हातीं दिली व आपल्या सरावांतल्या ग्राम्य शब्दांनीं 'बेग येर पार्डन्,

ओल्ड स्पोर्ट–'माफी मागतों खेळाडू दोस्त–असें म्हटलें. हे ड्यूक उत्तम शिकारी ह्मणून प्रसिद्ध होते. ते या प्रसंगाची हकीकत मोठ्या गमतीनें व आनंदानें सांगत.

इंग्रज लोकांमधील 'क्लान्निश्नेस '–विविक्षित वर्गाला चिकटून राहण्याची संवय–ही त्यांच्या जीवितक्रमांतील विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट होय. स्वकीय वर्गाचा दृढाभिमान 'आंग्लोइंडियन ' मंडळीमध्यें विशेषच दिसून येतो. त्यांना त्यांच्या शेजाऱ्यापेक्षां स्वतःच्या वर्गांतील लोकांची बरीच अधिक माहिती असते. याचा अर्थांत एका दृष्टीनें उपयोग आहे. पण तुटक व अलग राहण्यांतही तोटे असतात. इंग्रज लोक व हिंदुस्थानचे रहिवाशी, यांच्या अंतःकरणांत वसत असलेला सलोखा व सहकारिता, या भावना जर दृढतर करण्यांत आल्या तर त्यापासून किती तरी चांगला परिणाम होण्याचा संभव आहे, ही गोष्ट येथें नमूद केल्यावांचून राहवत नाहीं. आपलीं मतें व विचार दुसऱ्याला कळवितां येण्याची शक्ती, ही एक श्रेष्ठतम देणगी आहे. तिच्या संबंधाचें स्वातंत्र्य, राष्ट्राच्या सुखाचें व भरभराटीचें मूळ आहे.

इंग्लंडांतील सफरीमध्यें माझा पुष्कळचशा आंग्लोइंडियन पेन्शनर मंडळीशीं सहवास घडला. त्यावरून माझ्या मनांत पूर्वीपासून घोळत असलेली कल्पना दृढतर झाली; ती ही कीं, हल्लींच्या स्थितींत हिंदुस्थानांत काम करून मिळविलेल्या युरो-

पियन कामदारांच्या अनुभवाला तो देश सर्वथैव मुकतो आहे. हिंदुस्थानांत बहुतेक वरिष्ठ प्रतीच्या जागेवर युरोपियन भरलेले आहेत. सर्व कामाकाजाचें सूत्र त्यांच्या हातीं आहे. राज्यकारभाराची दिशा ठरविणें व ती अमलांत आणणें या दोन्ही गोष्टी तेच करितात. हे अंमलदार हिंदुस्थानांत प्रथम पाय ठेवतात त्यावेळीं त्यांची स्थिती कोशगत कीटासारखी–गर्भावस्थेची– असते. त्यांचा नवशिकेपणा व अनुभवाची उणीव, यांपासून होणारा सर्व तोटा त्या देशास सोसावा लागतो. तेथेंच त्यांना काम करण्याचें खरें शिक्षण मिळतें. या ज्ञानप्राप्तीच्या पूर्वावस्थेंत कांहीं व्यक्तींचें बरेंच नुकसान होतें. ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी आहे. एखाद्या डाक्टराच्या गोष्टी वरून हें स्पष्ट होईल. अति उत्तम शिक्षण पावलेले डाक्टर तिकडे पाठविले जातात. पण त्यांना पुर्ता अनुभव येऊन वैद्यविद्येचें पुरें ज्ञान मिळण्यासाठीं, शस्त्रक्रिया कराव्या लागतात. तेव्हां क्वचित् प्रसंगीं प्राणहानी होण्याचाही संभव असतो तसेंच नवीन येणारा अंमलदार इंजिनियर असला तर, अनुभवाच्या अभावीं तो मिळविण्यामध्यें चुका होऊन परिणामीं द्रव्यहानी व प्रसंगीं भयंकर अनर्थापात होण्याचीही भीती असते. या संबंधी तक्रारीचा मुख्य मुद्दा एवढाच कीं, या अंमलदारांना अनुभव येऊन, ते कामालायक झाल्यावर, ते थोडीं वर्षें काम करितात न करितात तोंच, ते पेन्शन घेऊन परत जातात. त्यांच्या जागीं तशीच नवशिकी मंडळी येते, व तीही त्याच

तऱ्हेनें नोकरीच्या क्रमांतून निघून परत स्वदेशीं जाते. याचा परिणाम असा होतो कीं, त्या देशांतून उत्तमोत्तम तयार झालेल्या मानवी बुद्धीच्या व अनुभवाच्या फायद्यास तो देश एकसारखा व सतत आंचवतो. हिंदी लोकांना सानुभव ज्ञान संपादन करून घेण्याचीं साधनें फारच कमी आहेत. या गोष्टीला पूर्वींच्या काळीं यदाकदाचित् निरुपाय असला, तथापि त्याच्या योगानें परिणत ज्ञानाचा संचय हिंदुस्थानांतून नाहींसा झालेला आहे यांत शंका नाहीं.

युरोपियन लोक स्वदेशीं नोकरीचाकरी केल्यानंतर तेथेंच कायम राहतात. त्याचप्रमाणें नोकरीसाठीं ते ज्या परकीय देशांत जातात त्या देशांत त्यांना पेनशन् घेतल्यानंतर राहणें शक्य झाल्यास त्यांच्या नोकरीच्या मुदतींत त्यांनीं मिळविलेला अनुभव व ज्ञान यांचा फायदा त्या देशांच्या कारभारांत योग्य सल्ला देण्याच्या कामीं किंवा त्यास योग्य वळण लावण्याच्या कामीं होण्यासारखा आहे. त्यांनीं आपल्या दत्तक गेलेल्या भूमीमध्यें-हीं, नोकरी आटपल्यावर राहावें. असें झाल्यानें, त्यांनीं कम-विलेलें ज्ञान व अनुभव, तिकडे मार्गदर्शकपणा किंवा नेतृत्व, यांसाठीं मिळूं पावतील. लोकवस्तीपैकीं अमुक वय झालेल्यांना परदेशीं पाठवून, लोकसमाजाची व्यवस्था तरुण व मध्यम वयाच्या लोकांच्याच हातीं सोंपवावयाची, अशी व्यवस्था असलेल्या एखाद्या राज्याची कल्पना केली तर, त्याची व

हिंदुस्थानांतील अधिकारी मंडळासंबंधाची स्थिती, अगदीं एकसारखी समजतां येईल. ज्ञान व अनुभव पूर्णावस्थेला पावलेल्या वृद्ध वीरांच्या लाभाला तो देश पारखा होईल. प्रत्येक राष्ट्राच्या जीवनक्रमामध्यें हें ज्ञान व हा अनुभव मोठे महत्त्वाचे भाग असतात. हल्लींच्या हिंदुस्थानाच्या राज्यकारभारामध्यें हा एक मोठा दोष आहे.

याला उपाय सुचविणें सोपें आहे असें नाहीं. युरोपियन लोक तिकडे कायमचे राहण्याला हवापाण्याची अडचण व आडकाठी आहे असें ह्मणण्यांत येतें. पण माझी अशी सूचना—ती कदाचित् साहसाची वाटेल—आहे कीं, हिंदी लोकांना जबाबदारीच्या जागा अधिक देण्यांत याव्या. नोकरी आटपून पेनशन् घेतल्यावर ते तिकडेच राहणार यामुळें त्यांचें ज्ञान व अनुभव, त्या देशांतच कायम राहून त्यांची राष्ट्राला उणीव भासणार नाहीं. आणखी पुष्कळच काळपर्यंत राज्यकारभारांत मोठासा भाग युरोपियन अंमलदारांच्याच हातीं राहिला पाहिजे, हें उघड आहे. ह्मणूनच, युरोपियन अधिकारी पेन्शन घेतल्यावरही कांहीं वर्षें तरी, तेथेंच राहतील अशी योजना झाली पाहिजे. यासाठीं पेन्शन घेतल्यावर अशांपैकीं कांहीं लोकांनीं तरी, ज्या जिल्ह्याचा त्यांना दृढ परिचय झालेला असतो, त्याच्यांत आणखी तीनचार वर्षें राहण्याची तजवीज व्हावी. त्यांनीं हिंवाळ्याचे दिवस तिकडे जाऊन

काढावे, ही यापेक्षांही सोईची व चांगली तजवीज होईल. यांत अर्थांतच कांहीं तरी अधिक खर्च पडेल पण तो सत्कारणीं होईल. असे पेन्शनर हुद्देदार, सरकारी नोकर नसलेल्या हिंदी लोकांना खरोखरीं उपयोगी पडण्याला, सरकारी नोकर मंडळीपासून पृथक् राहून, तसा हिंदी लोकांशीं त्यांनीं मोकळेपणीं सहवास ठेविला पाहिजे. नाहीं तर हल्लींच्या वस्तुस्थितींत विशेष फरक पडणार नाहीं. हें मात्र मुख्यत्वें व स्पष्ट लक्षांत ठेविलें पाहिजे.

सरकारी अंमलदारांचें नेतृत्व अवश्य समजून, तें मान्यही केलें जातें. हिंदी लोकांना, इंग्रजांचा दाब व वळण लावणें, यांचा फायदाही कबूल आहे. तरी आपणाला सरकारी कामाकाजांत अधिकाऱ्यांच्या बरोबर सहकारितेनें काम करण्याची अधिकाधिक संधी मिळाली पाहिजे, असेंही त्यांना मनापासून वाटतें. तद्देशीय लोकांच्या जास्त नेमणुकी होणें, व पेनशनर युरोपियन अंमलदारांनीं तिकडे जास्त दिवस किंवा कायमचें राहणें, यांच्या द्वारें हल्लींच्या स्थितींतल्या अडचणीचा बराच निकाल लावतां येण्याजोगा आहे, असें दिसतें.

# भाग विसावा.

## इंग्लंडांतील बाग.

' समुद्राकडे निरखीत असतांना किती तरी रम्य व सुखकारक देखावे चित्तचक्षूपुढें उभे राहून माझा पिछा पुरवितात. पूर्वींच्या साऱ्या अलौकिक कथा आणि माझीं सारीं स्वप्नें जणों प्रत्यक्षतः परत येतात.'

' लांगफेलो. '

अनेक जागीं पुष्कळसें फिरून, लंडनला परत आल्यावर, आम्ही तेथील ' सीझन 'च्या उकाड्याचा मारा सोसला. नंतर केंट मधील प्रशांत व रमणीय स्थळांमध्यें समुद्रकिनाऱ्यावर, आरोग्यकारक लहरीवरून येणारी हवा खात, स्वस्थ आराम घेत राहिलों. हा फेरबदल फारच उत्साहजनक होता. केंट कौंटीला इंग्लंडांतील बाग, असें अन्वर्थक नांव मिळालें आहे. डील व वामर येथें आह्मीं दोन महिने मोठ्या आनंदांत काढले. या शहरांच्या जवळपासच्या भागांत पुष्कळसे पेनशनर आंग्लोइंडियन राहतात. त्यांच्या सहवासामुळें तेथें राहण्यापासून होणाऱ्या सुखामध्यें पुष्कळ भर पडली. आह्मी गेल्या वेळीं तेथील ' सीझन ' बहारींत होता.





हे दोन्ही गांव अगदीं लागून—बहुतेक एकच म्हणण्यासारखे—आहेत. इंग्लंडमध्यें आगस्ट महिना, साऱ्या वर्षांत सुट्टीचा व विश्रांतीचा असतो. यामुळें यावेळीं तेथें बाहेर गांवाहून पुष्कळ मंडळी आली होती. तेथील देखावा उज्ज्वल व उल्हसित करणारा होता, आणि फ्रॉयसार्ट या फ्रेंच तत्त्ववेत्त्यानें ' इंग्लिश लोक ऐषआरामाचा उपभोग देखील विषण्ण वदनानें घेत असतात' अशा प्रकारची जी त्यांची निर्भर्त्सना केली आहे, त्या त्याच्या उक्तीचें वैय्यर्थ येथील देखावा पाहिल्यानें पूर्णपणें व्यक्त होत होतें.अशा या लोकप्रिय करमणुकीच्या ठिकाणीं मंदवृत्तीला मुळीं आसराच नव्हता, हें पाहणाऱ्याच्या सहज नजरेस येण्यासारखें होतें.समुद्रतीरावरील सुरेखशी फरसबंदी, सुंदरसा धक्का, आराम व सुख देणारीं हाटेलें, व विश्रांतिगृहें, आणि उतारबंद अशीं मोकळीं व मनोहर पटांगणें, या सर्व जागा सुखानें सहल करणाऱ्या मंडळीच्या गर्दीनें चिकार भरून गेल्या होत्या. पुरुष मंडळींनीं बारीक फ्लानेलचे उन्हाळ्यांत थंड राहणारे कपडे घातले होते, व स्त्रियांनीं चटकदार पेहराव व बहुतेक सर्व रंगांच्या टोप्या घातलेल्या होत्या. मधून मधून ब्यांड वाजत होता.त्याच्या सुराच्या मजेदार लहरी कानावर पडत होत्या. त्यांच्या योगानें तेथील सार्वत्रिक आनंदामध्यें भर पडत होती. तेथें प्रत्येक जण सुखोपभोगाच्या इच्छेंत मग्न झालेला होता व सुखसाधक जादूच्या मंत्रानें, काळजी अगदीं हद्दपार झालेली होती.प्रशस्त राजमार्गावरील प्रत्येक बैठकीपाशीं

चैन व करमणूक, यांच्या मागें फिरणारी मंडळी जमली होती. समुद्रतीरावरील वाळवंट जमलेल्या मंडळीमुळें खरोखर सजीवसें झालें होतें. अल्लड तरुण मुलें, फावडी व बालद्या घेऊन, तीरावरील वाळवंटांत नेटानें खणत होती. वडीलधारे गार-गोट्यांवर आळसानें आडवे पडून, आरोग्य व उल्हास प्राप्त करून देणाऱ्या मंदवायूचा आस्वाद घेत, महासागराच्या लाटां-वर डौलानें चाललेल्या गलबतांचा नेहमीं बदल पावणारा देखावा गमतीनें व आनंदानें पहात होते.

तेथून समुद्राचा देखावा फारच विस्तीर्ण दिसत होता. त्याच्याकडे पाहात असतांना, पूर्वकालीन शौर्य प्रदर्शना-च्या दिवसाचें, तसेंच डील व वामर यांच्याकडे या राष्ट्रा-च्या इतिहासामध्यें मन खळबळून सोडणारा व महत्त्वाचा जो कार्यभाग होता, त्याचें स्मरण झाल्यावांचून राहत नाहीं. त्यांच्याजवळच उतरून, ज्यूलियस् सीझर यानें या देशाचें आक्रमण केलें. त्यावेळीं येथील लोकांनीं त्याचें प्रेमपूर्वक स्वागत केलें होतें, असें सांगतात. पुढें पुष्कळ वर्षांनंतर नार्थफोर्लंड्च्या पलीकडे इंग्लंडानें पहिली समुद्रांतील मोठी लढाई मारली, व फ्रेंच लोकांचा आरमारी युद्धांत काय-मचा निकाल लावल्यामुळें येथून पुढें इंग्रज लोकांच्या समुद्रा-वरील विजयमालिकेस सुरवात झाली; आणि त्या योगानें इंग्लंड देशास सातां समुद्रावर अप्रतिहत स्वामित्व प्राप्त झालें.

त्याचा तो आजवर उपभोग घेत आहे. आठव्या हेन्री राजाच्या वेळीं डील, वामर व सांडविच्, येथें तटबंदी किल्ले बांधविण्यांत येऊन इतःपर कोणी शत्रूनें स्वारी करण्याच्या प्रयत्नाला पक्का अडथळा व्हावा, अशी तजवीज केली गेली. सांडविच् येथील किल्ल्याची तटबंदी कमी करण्यांत आली आहे. पण बाकीच्या दोन्ही किल्ल्यांची तटबंदी अद्याप कायम असून ते त्या अलौकिक धामधूमीच्या काळाचे स्मारक आहेत.

सिंके पोर्ट्सचे ‘ लॉर्ड वार्डन्. ’ लॉर्ड ब्रासी, यांच्या मेहरबानगीमुळें, यापैकीं मुख्य असलेला वामरचा किल्ला मला पाहण्यास सांपडला. लॉर्ड व लेडी ब्रासी यांनीं स्वतः मोठ्या अगत्यानें बरोबर येऊन, तो ऐतिहासिक किल्ला राणीसाहेबांना व मला नीट फिरून दाखविला. विल्ल्यम पिट्ट, हे ‘ लॉर्ड वार्डन् ’ असतांना, त्यांनीं नेलसनची भेट येथेंच घेऊन त्याच्याशीं सल्ला मसलत केली होती. सुप्रसिद्ध ट्राफल्गारच्या लढाई नंतर इंग्लंडच्या अप्रतिम थोर ‘ अड्मिरल्’चें—नेल्सनचें--पार्थिव कलेवर घेऊन परत आलेल्या ‘व्हिक्टरी’ नांवाच्या लढाऊ गलबतानें या किल्ल्या लगतच नांगर टाकला. तेव्हां पिट्ट याला अतोनात दु.ख झालें. तो देखावा अतिशय करुणास्पद होता. त्याच्यामुळेंच पिट्टचें मरण लौकर ओढवलें, असें म्हणतात. पुढें प्रख्यात डयूक ऑफ् वेलिंग्टन्

हे येथील 'लॉर्ड वार्डन्' व 'लॉर्ड ऑफ् धि सिंके पोर्टस' झाले. महाराणी व्हिक्टोरिया व प्रिन्स कन्सॉर्ट, यांनीं येथें स्वत: येऊन त्यांची भेट घेतली. त्यावेळीं महाराणी साहेब ज्या खोलींत निजल्या होत्या, ती अद्यापि दाखविण्यांत येते. वामर येथें आनंदांत घालविलेल्या काळाबद्दल महाराणी साहेबांनीं आपल्या रोजनिशींत उल्लेख केला आहे. 'आयर्न ड्यूक' मरण पावल्यावर त्यांचें प्रेत या किल्ल्यांतील, ते राहात असलेल्या दालनामध्यें थोडे दिवस दर्शनासाठीं ठेविलें होतें. पुढें तें लंडनला नेलें. तेथें त्याचा अपूर्व थाटाचा प्रेतयात्रेचा सार्वजनिक समारंभ झाला. त्या विख्यात शूर योद्ध्याचें प्रेत, 'सेंट पॉल्स क्याथेड्रल्'मध्यें दफन होण्यासाठीं मोठ्या समारंभानें नेण्यांत आलें त्यावेळीं, त्याचें दर्शन घेऊन, पूज्यबुद्धी व्यक्त करण्यासाठीं, सारें लंडन शहर बाहेर पडलें होतें. येथें त्यांच्या स्मारक वस्तू ठेवलेल्या आहेत. त्यांत त्यांचा प्रवासांत उपयोगांत आणावयाचा पलंग, ज्या खुर्चीवर त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ती खुर्ची, त्यांचें लिहिण्याचें टेबल, वाटर्लूच्या लढाईंत त्यांनीं वापरलेलें 'हेल्मेट'–टोपी–,लांब बूट, व त्यांच्या मरणानंतर त्यांच्या चेहऱ्याचा जो ठसा घेतला गेला त्याची नक्कल वगैरे आम्हीं पाहिलें. येथें आणखी एक विलक्षण वस्तू ठेवलेली आहे. ती पिट्ट बसत असलेली खुर्ची. तिच्यावर ते दोन्हीकडे पाय सोडून बसत असते. हात मागें खुर्चीच्या पाठीवर राहात. तेथेंच पुस्तक ठेवण्याला जागा केलेली होती. या किल्ल्याभोंवतीं

सुंदर बाग आहेत व जवळच एक सुंदर खोरें आहे. हे दोन्ही मिळून, हें एक फारच प्रेक्षणीय व रम्य स्थळ झालेलें आहे. खंदकामध्यें एक फार मोठें व जुनें अंजीराचें झाड आहे. त्याला अद्यापि फळें येतात. इतकें जुनें झाड, साऱ्या इंग्लंडांत इतर कोठें क्वचितच असेल.

याचप्रामाणें डील येथील किल्लाही अत्यंत मनोहर आहे. तो या राजपथाच्या दक्षिण टोंकास पाहरेकऱ्याप्रमाणें उभा आहे. लॉर्ड जॉर्ज ह्यामिल्टन हे या किल्ल्याचे 'क्यापटन्'—मुख्याधिकारी—असून ते त्यांतच राहात असतात. तो मजबूत व भक्कम बांधलेला आहे. त्याच्या मध्यभागीं 'टॉवर'—उंच मनोरा—असून सभोंवतालीं तटबंदी आहे. त्याच्या वरून पाडतां उचलतां येण्याजोगा एक पूल आहे. त्यांतील दालनांमध्यें शहानशहा सातवे एडवर्ड यांच्या राज्यारोहणसमारंभाला हजर असलेल्या हिंदी राजे लोकांच्या कांहीं अत्युत्तम तसबिरी, आणि पूर्वींचे 'वार्डन्'—किल्लेदार—लोकांचीं व इतरांचीं कोरीव काम केलेलीं आणि एन्ग्रेव्हिंग्स्—छापील—चित्रें आहेत. 'टॉवर'—मुख्य गढी—खालीं मोठें थोरलें तळघरांतलें कारागृह आहे. लॉर्ड व लेडी जॉर्ज ह्यामिल्टन् यांनीं आमचें मोठ्या आदरपूर्वक स्वागत केलें. त्यांनीं प्रथमतः हिंदुस्थानचे 'दुय्यम सेक्रेटरी' व पुढें पुष्कळ वर्षं हिंदुस्थानचे 'स्टेट सेक्रेटरी' या नात्यानें काम करून आपल्या देशाची अत्युत्तम सेवा बजाविली आहे.

त्यासंबंधानें आम्हां उभयतांचेंही मनोरंजन होण्यासारख्या बऱ्याचशा विषयांवर आम्ही बोलत होतों.

डील व वामर या दोन्ही जागीं, मुलांच्या शिक्षणाची सोय फार चांगली आहे. आसपास खासगी शिक्षण देण्याच्या बऱ्याचशा संस्था आहेत. तेथील सार्वजनिक प्राथमिक शाळांमध्येंही कोण्या प्रकारची उणीव आढळण्याजोगी नाहीं. हिंदुस्थानांतील या दर्जाच्या शाळांच्या मानानें, त्या सर्व गोष्टींत पुष्कळ श्रेष्ठ आहेत. वामर येथें कॅनडारोडवर असलेली अशी एक शाळा मीं पाहिली. तेथेंही टार्कैप्रमाणें सर्वतऱ्हेनें परिपूर्ण अशी शिक्षणपद्धती सुरू आहे. तिचा माझ्या मनावर चांगला परिणाम झाला. इकडे शिक्षण सक्तीचें असल्यानें शिक्षणाच्या सर्व सोयींनीं युक्त अशा उत्तम संस्था, लहान सहान खेड्यांतून सुद्धां आढळून येतात.

येथें येणाऱ्या लोकांना सदैव कौतुक वाटणारी चीज ह्मणजे ' ब्यांड स्टॅंड ' जवळ ठळक जागीं उभा केलेला, ' टाइम बॉल '—वेळ दाखविणारा गोळा—ही होय. गलबतावरील अधिकाऱ्यांना घड्याळें नीट लावतां येण्यास साधनीभूत व्हावें असा ही योजना स्थापन करण्याचा मूळ उद्देश होता. वेळ बरोबर दर्शविली जावी ह्मणून यांतील यंत्रांचा संबंध ' ग्रीनाविच् ' च्या वेधशाळेशीं विद्युच्छक्तीनें जोडण्यांत आला आहे. तो गोळा एक वाजण्यापूर्वी कांहीं थोडा वेळ वर चढू

लागतो, आणि बरोबर एक वाजतां नेमानें खालीं पडतो. लोक डील येथें राहण्याला येतात त्या दिवसांत, ही मजा पाहण्याला गर्दी जमते. त्याच्यावरून घड्याळें लावण्याला सर्वांना सोईचें पडतें. ' धि रॉयल् मरीन लाइन इन्फंट्री ' चे निळ्या रंगाचे व एक नमून्याचे नीटनेटके पोषाख घालून फिरत असलेले शिपाई, डील व वामर येथील रस्त्यांत नेहमीं पाहण्यांत येतात. त्यांच्या बराकी, ' वामर डिस्ट्रिक्ट ' मध्यें आहेत. त्यांत दोन हजार शिपायांना प्रशस्तपणें निजण्याच्या जागा, भोजनशाला व क्रीडागृहें, स्नानाच्या जागा, परेडीचीं मैदानें, खेळण्याचीं पटांगणें, वगैरे आहेत. तसेंच लष्करी लोकांच्या उपयोगासाठीं एक मोठें चर्चही आहे. त्याच्या पायाचा दगड लॉर्ड जॉर्ज ह्यामिल्टन यांच्या हातून बसविला गेला होता.

डीलच्या स्थानिक स्वराज्यसंस्थेचा इतिहास मजेदार आहे. त्याच्या कार्पोरेशनची मूळची सनद सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं मिळाली, होती. ती ' म्युन्सिपल रिफॉर्म ॲक्ट ' पास झाल्यावर रद्द करण्यांत आली, आणि तिच्या ऐवजीं नवीन सनद देण्यांत आली होती. तेथील 'टौन क्लार्क' मिस्तर ए. सी. ब्रौन यांनीं, कृपा करून आम्हांला तेथील म्युन्सिपल् इमारती दाखविल्या. प्रथम आह्मी म्याजिस्ट्रेट कोर्टांत गेलों. तेथें आरोपी लोकांची चौकशी होऊन, गुन्हेगारांना शिक्षा करण्याचें, न्याय

इन्साफाचें काम होत होतें. या कोर्टांत पूर्वींचे 'मेयर्स' व इतर स्थानिक प्रसिद्ध मंडळी, यांच्या तसबिरी टांगलेल्या आहेत. तसेंच या ठिकाणीं डील येथील प्राचीन 'लग्गर्स' दुकाठी अथवा तिकाठी जहाजें व मासे धरणाऱ्या लोकांच्या होडया इत्यादिकांचे नमूने आणि रोमन लोकांच्या स्वारीचीं स्मारकें, जुनीं नाणीं, कुंभारकाम, अस्थि ठेवण्याचीं मडकीं, वगैरे वस्तू ठेवलेल्या आहेत. जवळच्या 'कौन्सिल् चेंबर' मध्यें स्थानिक अंमलदार कमेटीच्या सभा भरतात. तेथेंही पूर्वींचे 'मेयर्स, आल्डरमेन् व कौन्सिलर्स' यांच्या तसबिरी पाहण्यांत आल्या. निघण्यापूर्वीं तेथील 'व्हिजिटर्स बुक' मध्यें सही करण्याकरितां आह्मांस पाचारण करण्यांत आलें. तेव्हां आह्मी लॉर्ड लोर्बर्न यांच्या सहीखालीं सह्या केल्या.

डील येथील 'टौन हॉल' साधाच असल्यामुळें पाहण्याचा राहून जाण्याचा संभव आहे. येथील कौन्सिलानें अशा मौल्यवान् इमारतीकडे खर्च करण्या ऐवजीं शक्य तेवढा उपयोगी कामाकडे पैशाचा विनियोग करण्यांत बराचसा दूरदर्शीपणा दाखविला आहे. गेल्या थोड्याशा वर्षांत त्यांनीं (ड्रेनेज) घाण वाहून नेण्यासाठीं गटोरें बांधणें, पाण्याचा पुरवठा, दिवाबत्ती, व रस्त्यावर फरसबंदी, अशा लोकोपयोगी कामांमध्यें महत्त्वाच्या सुधारणा केल्या आहेत. रस्ते उत्तम स्थितींत राखलेले आहेत. ते इंग्लंडांतील इतर कोणच्याही शहरांतील रस्त्यांच्या

मानानें उणे दिसण्या जोगे नाहींत. 'टौन हॉल'च्या लगतच 'बोर्ड ऑफ् ट्रेड'–व्यापारी संघ–शीं संबंध असलेली 'लेबर एक्सचेंज'–उद्योगविनिमया–ची इमारत आहे. तेथें नोकरीच्या रिकाम्या जागांचें 'रजिस्टर' ठेवलेलें असतें. त्या ठिकाणीं नोकरीच्या शोधार्थ फिरणाऱ्यांना फुकट अर्ज करितां येतो. अशा 'लेबर एक्सचेंजेस' इकडे सर्वत्र आढळतात व त्यांच्यामध्यें एकमेकास निरोप पाठविण्याकरितां टेलिफोनची व्यवस्था केलेली असते. त्यामुळें उमेदवार मंडळीला नोकरी-साठीं हवें तेथें तात्काळ पाठवितां येतें. अडचणीच्या प्रसंगीं त्यांना आगाऊ भाडें देऊनही पाठवितात. वामर सारख्या लहान गांवांत या कामाकरितां स्वतंत्र ऑफिसाची सोय नसल्यानें, रिकाम्या जागेच्या यादी पोस्ट ऑफिसांत टांगून ठेवतात.

आम्ही तेथें असतांना, आसपासचीं बरींच प्रेक्षणीय स्थळें, मोटार मधून पाहून आलों. त्यापासून आम्हांला मोठा आनंद वाटला. त्यांतही विशेषत: सांडविच्‌ला गेलों, ती आमची सफर फारच मजेची झाली. हें एक चमत्कारिक शहर असून पुरातन वस्तुसंशोधनाच्या संबंधानें या गांवाचें महत्त्व विशेष आहे. प्राचीनकाळीं हें भरभराटीचें बंदर होतें. पण समुद्र मागें हटत चालल्यामुळें तें आतां दूर आंत राहिलें आहे. रॅम्सगेट हें मोठें थोरलें बंदर असून, तेथें मासे धरण्याचा धंदा फार

मोठ्या प्रमाणावर चालतो, अशी प्रसिद्धी आहे. सुरेख वाळवंटें व डोंगराचे कडपे असलेलें मारगेट, सुंदर घरें व मनोहर कुरणें असलेलें फोक्स्टन, आणि भव्य व प्राचीन किल्ला, समुद्रकाठीं प्रशस्त परेडीची जागा, व भपकेदार दुकानें असलेलें डोव्हर, हे सर्व गांव चांगले पाहण्याजोगे आहेत. साऱ्या विलायतेंत डोव्हरचा किल्ला अतिशय भव्य व शानदार किल्ल्यांपैकीं एक आहे. त्याची मजबूत तटबंदी, व गोल बुरुज, फिनीशियन्स, रोमन्स, सॅक्सन्स, व नॉर्मन्स या लोकांपैकीं प्रत्येकांनीं क्रमाक्रमानें बांधलेले आहेत. दीपस्तंभ प्रचारांत येण्यापूर्वी, तेथील उंच इमारतीवरून, रणशिंग वाजवून, दर्यावर्दी लोकांना इषारा दिला जात असे. तें शिंग आह्मीं पाहिलें. या किल्ल्यांतील एक भाग, नेपोलियनशीं चाललेल्या युद्धाच्या वेळीं, वेलिंग्टन् यांनीं बांधविलेला होता. त्या किल्ल्यांत तळघरें व भुयारें आहेत. तीं सुमारें दोन मैल लांब आहेत. त्यांच्यांत अलीकडे कोणाला जाऊं देत नाहींत. पण यांपैकीं एका भुयारांत जाऊन येण्याची आह्मांला परवानगी मिळाली. या किल्ल्याच्या आजूबाजूला असलेले बालेकिल्ले व इतर इमारती मिळून हा किल्ला फार मजबूत, भव्य व विस्तीर्ण झालेला आहे. आसपासच्या प्रदेशांतून त्याचा देखावा फारच चांगला दिसतो.

वामर येथें असतांना प्रसिद्ध ‘ गुडविन् सँड्स ’ वरही आह्मी एकदां जाऊन आलों. ही सफर भारी उत्साहजनक व

मजेदार झाली. आक्टोबर महिन्यांत एका स्वच्छ व निरभ्र दिवशीं तिसरे प्रहरीं आह्मी एका प्रशस्तशा ' मोटार लॉंच ' मधून, ' बीच '—वाळवंटा—वरून समुद्रकिनाऱ्याहून निघालों. या सफरीसाठीं लागणारें सारें सामान बरोबर घेतलें होतें. त्यावेळीं नीलवर्ण समुद्रजलावर सुरेखसे सूर्यकिरण चमकत होते. हवा मंद व सुखस्पर्श होती. यामुळें तो दिवस जणों जून महिन्यांतून उसना आणल्याप्रमाणें वाटत होता. समुद्र शांत होता. त्याच्या पृष्ठभागावर लहरीचें नांव सुद्धां नव्हतें परंतु आम्ही निघाल्यानंतर तांडेलानें चढविलेला ' युनियन जॅक' चा बाव्हटा मजेदार फडकत राहील येव्हढी मात्र वाऱ्याची झुळूक चालली होती. ह तांडेल एक नमूनेदार 'ओल्ड सॉल्ट'— पक्का मुरलेला—खलाशी होता. त्याच्या अंगीं स्वदेशाभिमान पूर्ण भरलेला होता. त्याचा बांधा भक्कम व शरीरकाठी सुरेख कसलेली होती. त्याला यावेळीं शांत दिसणाऱ्या त्या दर्यांतील प्रत्येक बोट बोटभर जागा पूर्ण परिचित होतीसें दिसलें. हा समुद्राचा भाग मोठा धोक्याचा आहे. त्याच्यांत दगावलेल्या गलबतांचे अवशिष्ट भाग, आह्मांला वाटेंत बरेचसे दृष्टीस पडले. त्या विषयींची पुष्कळशी माहिती तांडेलानें आम्हांला सांगितली. सुमारें ६५०० टनांची ' मराठा ' नांवाची, कलकत्ता व लंडन यांच्यामध्यें चालणारी, सण, रबर, चहा वगैरे माल भरलेली आगबोट, चार वर्षांखालीं या भागांत अदृश्य अशा रेतीच्या तीरांवर आदळून बुडाली. तिच्या डोलकाठ्या अद्यापि दिसत

होत्या. तिच्या मदतीला गेलेल्या धाडसी व शूर मंडळीमध्यें आमचा ‘ पायलट् ’—वाटाड्या—ही होता. त्या आगबोटीवरील सर्व खलाशी व बराचसा माल, कसा वांचविला, तें त्यानें आह्मांला सांगितलें. याचप्रमाणें दगावलेल्या दुसऱ्या कित्येक गलबतांचे भाग पाण्यावर दिसत होते ते महाभूतांच्या आघातामुळें काळे ठिक्कर पडले होते. ‘ गुडविन्स ’ जवळ गेलों तसें, आमच्या रंगेल तांडेलानें सांगितलें कीं, बर्जेस् नांवाचा साहसी गृहस्थ, ‘ चॅनेल् ’—इंग्लिश खाडी—पोहत ओलांडून, फ्रान्सला पोहोंचला त्यावेळीं, आम्ही बसून चाललेली बोटच त्याच्या बरोबर होती.

सुमारें एक तासानंतर, दूर पिंगट रंगाची रेषा दिसूं लागली. तसें आह्मी त्या वाळवंटाजवळ पोहोंचलों असें दिसून आलें. दुसरी एक लहानशी होडी बरोबर आणलेली होती. तिच्यांतून वल्हवीत जाऊन आम्ही एका सोईवारशा जागीं उतरलों. तें वाळवंट अगदीं रूक्ष व निर्जन असून त्याच्या चोहीं बाजूंला पाणी होतें. त्याच्यावर पाय ठेवतांच मनांत जी भावना उत्पन्न झाली ती अगदींच चमत्कारिक होय. किनाऱ्यावरील रेतीवर समुद्राच्या लाटा आदळून पांढरा शुभ्र फेस उसळत होता. दृक्पथांतील आखिल भागाचे जणों आम्हीं त्यावेळीं राजे झालों होतों, व आम्हीं व्यापलेल्या मुलुखाचा आमचा निर्विवाद ताबा होता. ऊन पडून उबारा येत

चालला तसे, कांहीं 'सील' मासे या वाळवंटाकडे येत असल्याचें दिसलें. तें पाहून आम्हांला असें वाटलें कीं, या बेटावरील आमच्या राजसत्तेवर जणों ते हक्क सांगण्या-करितांच कीं काय आम्हांकडे येत आहेत. त्यांचें यथा-स्थित स्वागत करण्याला आह्मी तयार झालों. आमच्यां-तील विशेष साहसी मंडळी, त्यांना चुचकारूं लागली. पण, धिटाई व शौर्य यांच्या पेक्षांही शहाणपण बरें, असें समजूनच जणों, ते रोख बदलून दिसेनासे झाले. ओहो-टीच्या वेळीं बाहेर येऊन ते या वाळवंटावर ऊन खात पडतात, असें तांडेलानें सांगितलें.

ही रेती लाटांचा तडाका कशी आपोआप कमी करिते तें, येथें उभें असतांना सहज लक्षांत येतें. भरती उलटून पाणी ओसरतें तेव्हां ती बरीच घट्ट होते. तुफानांतल्या लाटा भारी जोरानें उसळतात. त्या किनाऱ्यावर आदळून त्यापासून पुष्कळ नुकसान व्हावयाचें, पण त्याला ही रेती आड येते. कांहीं जागीं तिच्यावर उभे राहतांच, ती जणों त्रासानें खालीं दबते. त्यावेळीं पडलेली खेंच स्पष्ट अनुभवास येते. एखादें प्रचंड जहाज अशा जागीं येऊन आदळलें तर, त्याच्या धक्क्याच्या सपाट्यानें, तें त्या रेतींत-ल्या भोंवऱ्यांत कसें गडप होऊन जाईल याची सहज कल्पना होण्यासारखी आहे. ओहोटीच्या वेळीं, कोसों गणती वाळवंट

उघडें पडतें. तें पाण्यांत बुडालेलें असतांना, त्याच्या पासून नावाड्यांना किती व कसा धोका असतो, तें आह्मांला कळून आलें. हीं वाळवंटें जवळ आहेत, हें सुचविण्यासाठीं दीप स्तंभाप्रमाणें उपयोगी पडणारीं जहाजें ठेवलेलीं आहेत. धुकें असतांना या वाळवंटां संबंधानें सूचना देण्याकरितां त्यांच्या वरून, तास, शिंगें व शिट्या, वाजवितात. याशिवाय जागजागीं पुष्कळसे ' बॉय '—बोयरे—ही रोंवलेले आहेत.

हीं वाळवंटें पूर्वीं इंग्लंड बेटाला लागूनच होतीं, व ज्यूलियस् सीझर उतरला, तो येथेंच, अशी दंतकथा आहे. या वाळवंटांच्या जागीं पूर्वीं एक बेट होतें, व त्यावेळीं कोणी लॉर्ड गुड्विन् नांवाचा त्याचा मालक होता. त्याच्या पापी आचरणामुळें ईश्वरी क्षोभ होऊन तें बेट बुडालें, असेंही सांगतात. हीं गुड्विन्सचीं वाळवंटें कशींही झालीं असोत, त्यांनीं पुष्कळच बळी घेतले आहेत, हें मात्र खास आहे. येथील अपघात कमी करण्यासाठीं, होईल तितकी खबरदारी घेतात. तरी पण ते होतातच. महासागराच्या अफाट साम्राज्यामध्यें, रेतींत अर्धवट दबलेले, असे गलबतांचे अवशेष, अद्यापि दृष्टीस पडतात. याचा उल्लेख वर आलाच आहे. हे अपघात होतात ते, रात्रीं अंधेरांत, भयंकर गर्जना करणारीं वादळें सुरू असतांना. अशा वेळीं समुद्रांत बुडून मरण्याच्या संकटांत सांपडलेल्या हतभागी लोकांचे प्राण वांचविण्यासाठीं आमचा

शूर तांडेल व त्याच्यासारखे साहसी व धीट खलाशी कशाचीही पर्वा न करतां, काळाच्या दाढेंत बिनदिक्कत उड्या टाकतात. अशा शूर वीरांच्या गोष्टी लिहून काढल्या तर त्यांचा एक मोठा ग्रंथ होईल.

क्याँटरबरी इतकें पूज्यबुद्धीनें व आश्चर्यचकित दृष्टीनें पाहिलें जाणारें इतर शहर, साऱ्या इंग्लंडामध्यें क्वचितच आढळेल. डील आणि वामर पासून गाडीमार्गानें या प्राचीन शहराला जातांना मोठी मजा वाटते. त्या ठिकाणीं प्राचीन व अर्वाचीन यांचा अप्रतिम मेळ दिसून येतो. तेथील विचित्र रस्ते,व निरुंद गल्ल्या, यांच्यामध्यें तऱ्हेदार पुरातनपणासा वाटतो. त्यांच्यांत मध्ययुगीन शिल्पकलेचे पुष्कळसे शानदार नमूने आहेत. हे नमूने जरी इतके सुंदर असले तथापि क्यांटरबरीची प्रसिद्धी आहे ती कांहीं या वस्तूंवरच अवलंबून आहे, असें नाहीं. तेथें आणखी पुष्कळच प्रेक्षणीय प्रकार आहेत. आधुनिक तऱ्हेचीं भपकेदार दुकानें, सुंदर 'इन्स्टिटयूट,' 'फ्री लायबरी,' 'आर्ट ग्यालरी,' म्यूझियम, क्लब्स, धान्य व हॉप्स् यांचे बाजार, वगैरेही तेथें पाहण्यालायक आहेत. कोणचेंही शहर आजकालच्या सुधारलेल्या व भरभराटीच्या स्थितीला आलेलें आहे, असें ह्मणवून घेण्याला अवश्य लागणारें, व्यापारी प्रगतीचें उत्कट धोरण, व सामाजिक कार्यतत्परता आणि उत्साह, हेही तेथें पुष्कळच अंशानें दिसून येतात.

तरी पण क्यांटरबरीची विशेष ख्याती आहे ती इंग्लंडांतील धार्मिक जीवनाचें मुख्य केंद्र किंवा अधिष्ठान या नात्यानें होय. क्यांटरबरी येथील 'आर्चबिशप्' हे साऱ्या इंग्लंडांतले 'लॉर्ड प्रायमेट' —धर्मसंबंधाच्या बाबतींत सर्वांहून वरिष्ठ आधकारी—आहेत. तसेंच, साऱ्या जगांतील उत्तमोत्तम भव्य 'क्याथेड्रल्स' पैकीं एक, असें 'क्याथेड्रल' तेथें आहे. या दोन गोष्टींमुळें मुख्यतः त्या शहरास इतकें महत्त्व प्राप्त झालें आहे. या बादशाही इमारतीच्या आवारांतच 'आर्चबिशप'ची राहण्याची जागा आहे. इंग्लंडांतील अगदीं अव्वलचें ख्रिस्ती मंदिर हेंच होय. तें सेंट ऑगस्टाईन् व किंग एथल्बर्ट यांच्या वेळचें आहे. धार्मिक इमारतींच्या शिल्पकलेच्या साध्या ओबड धोबड तऱ्हेपासून तों सर्वोत्कृष्ट अशा गॉथिक शिल्पकलेच्या अत्युत्तम नमुन्यापर्यंतच्या सर्व तऱ्हा, तेथें दिसून येतात. त्या इमारतींमध्यें वेळोवेळीं किती तरी फेरफार झालेले आहेत. डेन्स लोकांच्या हातून स. १०११ सालीं त्याचा नाश व्हावयाचा थोडक्यांत टळला. पुढें १२ वर्षांनीं क्यान्यूट राजानें त्याचा जीर्णोद्धार केला. सं० १०६७ मध्यें त्याचा अग्निकोपानें नाश झाला. नॉर्मन लोकांनीं इंग्लंड देश काबीज केल्यानंतर आर्चबिशप् लॅनफ्रॉंक यानें तें मंदिर पुनः बांधलें. त्याच्या मागून आन्सेलेम हा 'आर्चबिशप' झाला. त्यानें त्याचा पूर्वेकडील भाग पाडून, तो जास्त भव्य व शोभिवंत बांधविला. बाराव्या शतकांत अग्नीनें त्याची पुनः आहुती घेतली. त्यानंतर

त्या रक्षेमधून, त्याचें पुनरपि अधिकच भव्य व थाटदार उज्जीवन झालें. त्याच्यांतील शेवटचें झालेलें काम म्हटलें म्हणजे त्याच्या प्रचंड 'टॉवर'चें होय. तो स. १४९५ सालीं बांधला गेला.

टॉमस अ बेकेट् चा खून झाला तो येथेंच. त्याचें प्रेत पडलेली जागा अद्यापि दाखवितात. या क्याथेड्रल्च्या 'क्रिप्ट'–वेदी खालील भुयारा–मध्यें एलिझाबेथ् राणीनें नार्मंडी मधून आलेल्या प्रोटेस्टंट लोकांना, आपले माग चालविण्याला परवानगी दिली. त्या लोकांच्या वंशजांना, तेथील एक लहानसा भाग, हल्लींसुद्धां, स्वतंत्रपणें प्रार्थना करण्यासाठीं उपयोगांत आणूं दिला जात आहे. तेथें प्रार्थना होते ती फ्रेंच भाषेमध्यें. या इमारतींत ज्या दुसऱ्या ऐतिहासिक महत्त्वाच्या वस्तू आहेत, त्यांच्यामध्यें ब्लॅक् प्रिन्स, चौथा हेन्री राजा, त्याची राणी, त्याचा बंधू व पुत्र, तसेच पुष्कळसे 'प्रीलेट्स,' 'आर्चबिशप्स' इत्यादिकांचीं थडगीं, यांचा समावेश होतो. हल्लींच्या स्थितींत सुद्धां ही अद्वितीय इमारत ह्मणजे, धर्मसंबंधी इमारतीच्या शिल्पकलेची प्रगती होत जाण्याला कारण झालेल्या अनेक गोष्टींच्या नमून्यांचें एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

टॉमस् अ बेकेट् याचें थडगें 'रिफार्मेशन'च्यां वेळीं उद्धस्त केलें गेलें होतें. त्याची जागा मला दाखविण्यांत आली. दुसऱ्या हेन्री राजानें या धर्मगुरूच्या खुनाप्रीत्यर्थ, त्या थडग्या

समोर, उग्र प्रायश्चित्त घेतलें. त्याविषयींची कथा, तसेंच, तेथें भरणाऱ्या यात्रा व घडून येणारे दैवी चमत्कार, यांविषयींच्या गोष्टींही मीं ऐकिल्या. त्या महात्म्याच्या समाधीच्या दर्शनास येऊन, तिच्यापुढें गुडघे टेकून प्रार्थना करणाऱ्या सहस्रावधि भाविक लोकांच्या गुडघे टेंकण्यामुळें पडलेल्या खांचाही मीं पाहिल्या. तेव्हां मला तात्काळ आपल्या देशांतील धर्मभोळ्या समजुतींचें स्मरण झालें. पाश्चिमात्य देशही थोड्याशा काळा-पूर्वीं, ज्याच्या संबंधानें प्राच्यदेशीयांना आजकाल नांवें ठेवलीं जातात, तसल्याच अंधश्रद्धेच्या स्थितींत होते, ही गोष्टही माझ्या ध्यानांत येऊन चुकली.

प्राचीन इतिहास व दंतकथा, याच्याशीं संबंध असलेल्या वस्तू व गोष्टी नीट जतन करून ठेवण्याच्या कामीं, युरोपांतील देशांमध्यें फार कळकळीची खबरदारी घेतली जाते; ही गोष्ट माझ्या मनावर ठसली. अमूक एक गोष्ट कोठें व कधीं घडून आली, याचें इतिहासकार बरेंच खात्रीपूर्वक वर्णन करितात. आमचा देश फार प्राचीन असून त्याच्यांत पुरातन दंतकथांची समृद्धी आहे. पण परकीयांनीं केलेल्या स्वाऱ्या, लुटालूट, जाळपोळ, व राज्यक्रांति, इत्यादिकांपासून त्याला दुस्सह ताप सोसावा लागला आहे. पाहावें तिकडे दृष्टीस पडणाऱ्या अश्वत्थ वृक्षांनीं जुन्या इमारती नामशेष होण्याला बरीच मदत होत आहे. या सर्व कारणांनीं प्राचीन इमारती

क्वचितच कायम आहेत. तेव्हां ऐतिहासिक दृष्टीनें ज्यांचें महत्त्व आहे अशा वस्तूंविषयीं तर बोलावयासच नको. युरोपांतील लोकांमध्यें पुष्कळच विशदपणें दिसून येत असलेल्या ऐतिहासिक भावनेची आम्हां लोकांमध्यें फारच उणीव असणें ही गोष्ट शोचनीय होय. तिकडे सातशें आठशें वर्षांपूर्वींचें रंगित कांचेचें काम, सहज, मोठ्या प्रेमानें दाखवितात व लोकही तें आवडीनें पाहतात. त्यांच्या मध्यें ऐतिहासिक महत्त्वाच्या वस्तू-राजवाडा, मंदिर, किंवा कोणा सरदाराची उपवनवाटिका वगैरे काळजीपूर्वक जोपासना करून ठेवण्याची पद्धत भारी विलक्षण दिसून येते. इंग्लंड देशाला अतिशय प्राचीन सुधारणेविषयीं प्रतिष्ठा मिरविण्याचें साधन नसलें तरी, स्वतःच्या पूर्वकालीन इतिहाससंबंधीं पुरती व खात्रीलायक माहिती उपलब्ध आहे, ती, ह्या देशाला या बाबतींत हिंदुस्थानापेक्षां पुष्कळ पुरातन संबंधाला नेऊन पोंचविते. आमच्या देशाच्या प्राचीनत्वाविषयीं आम्हांला अभिमान आहे, व आमच्या प्राचीनतर सुधारणेच्या संबंधांत आह्मी सुसमृद्ध होतों. पण आमच्यामध्यें खरें ऐतिहासिक महत्त्वाचें सलग वृत्त, असें फारच कमी अवशिष्ट राहिलें आहे; आणि जें थोडेसें आहे, तेंही दंतकथात्मक व पौराणिक कालांतल्या व्यक्तीविषयींचेंच आहे.

# भाग एकविसावा.

## प्राच्य व पाश्चिमात्य चालीरीती.

' रूढीचे बंदे गुलाम कालाचीं खेळवणीं होत. ' बेकन.

'आपणाजवळच्या वस्तूंच्या मौल्यवानपणावर सुखसमाधान अवलंबून असत नाहीं. तें स्वतःच्या गरजा कमी असण्यापासून प्राप्त होतें.'

गोल्ड्स्मिथ.

वरील उताऱ्यांतील अनुस्यूत तत्त्वांची सत्यता, विशेषतः प्राच्य व पाश्चिमात्य देशांतील चालीरीतींना अधिक अंशानें लागू पडते, असें म्हणतां येईल. चालीरीती व रूढी यांनीं जखडून टाकलेलें व त्यामुळें जणों निरनिराळ्या कोठड्यांमध्यें कोंडून ठेविलें गेलेलें असल्यानें राष्ट्र या नात्यानें हिंदी लोकांचें अत्यंत नुकसान झालें आहे, असें ह्मणावें तर, इकडे इंग्रज लोक नेहमीं फेरफाराच्या अधीन असल्यामुळें त्यांनाही, सदा चंचल व मनसोक्त वर्तन ठेवीत जाण्याचा परिणाम, मनाची अस्वस्थता उत्पन्न करण्यांत होत असून तीच या चंचलपणाचें शासन होय, या गोष्टींची आठवण करून देणें अवश्य आहे.

नेमस्तपणानेंच बहुधा खरी प्रगती लाभत असावी, असें दिसतें. प्रत्येक देशांतील चालीरीती निरनिराळ्या असून, देशादेशांत ज्या त्या देशास स्वतःच्या विशिष्ट चालीरीतींची मोठी आवड तरी असते अथवा त्याविषयीं त्यांना एक प्रकारचा अभिमान तरी वाटतो. फ्रान्स व इंग्लंड दोन्ही देश शेजारी शेजारी—त्यांच्यांत सुद्धां या गोष्टी खऱ्या आहेत. तेव्हां विलायत आणि हिंदुस्थान, यांच्यासारख्या अतिशय अंतरावर असलेल्या राष्ट्रांसंबंधानें, त्या अधिकच खऱ्या असणार. त्यांच्यांतील हवापाणी, मनुष्य-स्वभाव, पुरातन दंतकथा, तसेंच सुख समाधान व सभ्य-पणाविषयीं निरनिराळ्या कल्पना, इत्यादिकांमुळें त्यांच्यांतील भेदवाद अधिक उत्कट व तात्काळ डोळ्यांत भरणारा असा झाला आहे.

या दोन्ही राष्ट्रांतील लोकसमाजाच्या रीतीरिवाजांमधील वैल-क्षण्याचें यथार्थ वर्णन करणें, कांहीं सोपें नाहीं. त्यांच्यांतील फरक बरेच सर्वविश्रुतही आहेत. तेव्हां त्यांचें मी येथें विस्तृत वर्णन करूं इच्छित नाहीं. त्यांतील कांहीं रूढी फारच प्राचीन आहेत. त्यांचा मूळारंभ युगाचीं युगें लोटल्यामुळें, जणों प्राचीन काळच्या धुक्याआडसा लोपलेला आहे. दुसऱ्या कांहीं चालीरीती नियतस्थलविशिष्ट आहेत. कोणच्याही समजांतील पुरातन चालीच्या मुळाशीं कांहीं तरी विशिष्ट कारणाचा पाया असतो, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. तो पाया

हवापाण्याच्या संबंधाचा असो, किंवा शेंकडो वर्षांच्या जुन्या परंपरेच्या अनुरोधानें चालत आलेल्या सभ्यपणाच्या वगैरे कल्पनांमुळें त्यांचा प्रघात पडलेला असो.

खुद्द पूर्व व पश्चिम यांच्यामध्यें जितका फरक आहे, तितकाच तिकडील पेहरावामध्यें फरक आहे, हेंही जातांजातां मला नमूद करून ठेविलें पाहिजे. प्रत्येक देशांतील सार्वजनिक पोषाखाची तऱ्हा कायम ठरण्याला, तेथील हवापाणी, व सोई, पुष्कळ अंशानें कारण होतात यांत शंका नाहीं. हिंदुस्थान देश सामान्यतः उष्ण असल्यानें तिकडील लोक हलके व सैल कपडे वापरतात. अशा प्रकारचा पेहराव करण्यांत त्यांचा हेतू हा आहे कीं, त्या योगानें शरीराला शक्य तितकी जास्त ताजी हवा मिळावी. कारण, स्वच्छ हवा ही शरीरावरील चर्माचें निसर्गसिद्ध जीवन असून तिच्याशिवाय आरोग्य राहणें शक्य नाहीं. पाश्चिमात्य देशांतील परिस्थिती याच्या उलट. तिकडे अंगाबरोबरच कपडे पाहिजेत.त्यांच्या योगानें मनुष्य सुटसुटीत व कार्यक्षम राहातो. यामुळेंच पूर्वेकडील लोक ऐदी व संथ, तर पश्चिमेकडील युरोपियन लोक उलट चलाख व तरतरीत असतात.

जन्मादारभ्य हिंदुस्थानी रीतीरिवाजामध्यें वाढलेल्या लोकांना कडकडीत 'कॉलर्स'—गळपट्टे—आणि तंग बूट घालण्याचा उपयोग किंवा हेतू लक्षांत येत नाहींत. ते कांहीं असोत.

( त्यांचा चांगलाच उपयोग होतो हें खास असलें ) तरी त्यांच्यामुळें फारच त्रास व गैरसोय सोसावी लागते, ही गोष्ट कोणीही नाकबूल करणार नाहीं; असें इंग्रज लोक सुद्धां कबूल करितात. कोरा करकरीत व कडकडीत इस्त्री केलेला कॉलर—गळपट्टा—बरोबर बसविण्यांत, जी भानगड पडते व त्रास होतो, त्याच्या इतपत एखाद्याच्या मानसिक स्थैर्यामध्यें गडबड उडविणारी गोष्ट कचितच सांपडेल. तंग बुटांचा त्रास अंगवळणीं पडणें, ही गोष्टही तिच्याच तोडीची आहे. अडीच इंच उंच, वज्राप्रमाणें कठिण, व कडक असें कॉलरचें वळें मानेला घालणें, आणि ढोराच्या कांतड्यांच्या दणकट व संकुचितशा बूटरूपी साच्यांत पाय कोंबून भरणें, हीं दोन्ही दुस्सह प्रायश्चित्तें खुषीनें कबूल करणें, त्या युरोपियन लोकांचेंच काम होय.

त्यांच्या अंतरंगांत प्रवेश न झालेल्या मंडळीला, हे पुरुषांच्या पेहरावांतील विचित्र प्रकार सुद्धां, स्त्रियांच्या पोषाखांतील अर्वाच्य तऱ्हांच्या मानानें, कमी कठिण अशा कूट प्रश्नाप्रमाणें वाटतात. हल्लीं स्त्रियांच्या पोषाखांचे जे प्रकार प्रचलित आहेत त्यांत, मान उघडी, तंग झगे, बाजू उभ्या चिरलेल्या आणि आंतील व अंगाबरोबरच्या कापडाचें प्रदर्शन करणारा, असा पोषाख, हे खरोखर न शोभणाऱ्या अर्वाच्यपणाचे कळस होत. युरोपियन स्त्रिया घालतात त्यांपैकीं

कांहीं टोप्या–टोपली–सुद्धां फारच विचित्र व विलक्षण असतात. त्यांतील कांहींवर शोभेसाठीं इतकीं फुलें ठेवलेलीं असतात कीं, त्या टोप्या खरोखर चिमुकल्या बगीचाप्रमाणें दिसूं लागतात.

ब्रिटिश बेटांमध्यें हवापाण्यासंबंधानें विलक्षण व अचानक फेरफार होतात. तसेच व तितकेच फेरफार तेथील लोकांच्या पोषाखामध्येंही होणें शक्य असतें. 'स्मार्ट सेट्'–षोकीन मंडळी-- उद्यां कसा विचित्र व विद्रूप पोषाख पसंत करील, हें केव्हांच कोणाला खात्रीनें सांगतां येणार नाहीं. तेथील लोकांची सांपत्तिक स्थिती पुष्कळच समाधानकारक असल्यामुळें त्यांना खुशाल हवे ते चोंचले सहज अमलांत आणितां येतात. अशा नव्या नव्या पोषाखाच्या तऱ्हांचें आंग्लो लोकांना जें वेड लागलें आहे, त्यास उत्तेजन देत राहण्यांत, कापडवाल्यांचा फायदाच असतो. यामुळें त्यांचा धंदा वाढतो. इंग्लंडांत प्रत्येकजण 'फ्याशन्'चें अनुकरण करण्याला भारीच उत्सुक दिसतो. एखादी नवी टूम सुरू होण्याचा अवकाश कीं एका इंग्रजी लोकप्रिय पद्यांत वर्णन केल्याप्रमाणें, 'प्रत्येकजण तेंच करितो आहे' असें ह्मणण्याची स्थिती होते. 'फ्याशन्च्या बाहेर राहणें आणि मरून जाणें बरोबर,'ही ह्मण नेहमीं ऐकण्यांत येते. सामान्य लोकांची समजूत व वर्तन साधारणतः याच वळणावर असतें. तेही मोठ्या वस्तीच्या ठिकाणीं तर अधिक प्रमाणानें दृष्टीस पडतें.

फ्याशन् ह्मणजे शुद्ध ' टायरंट '–जुलुमी सत्ताधीश. त्याच्या फेरबदलाचें विचित्र चक्र कसें कोण फिरवितो तें कोणालाच कळत नाहीं. त्याविषयीं कोणी काळजी किंवा पर्वाही करीत नाहीं. कोणी लोकप्रिय नटी, किंवा नेभळा शानषोकी, खुशालचेंडू, एखादी नवीशी ट्रूम उपयोगांत आणितो. तीच पुढें चालू राहून तिची फ्याशन् बनते. कसेंही असो एकदा या फ्याशनूरूपी कंदुकाला गती मिळाली पुरे. सर्व दर्जाच्या लोकसमाजामध्यें, सरदार आणि निवळ धनाढ्य मंडळी, मध्यम सुखवस्तु वर्गांतील गृहस्थ, वगैरे पासून तों थेट कामकरी लोकांमध्यें सुद्धां, या कंदुकाच्या गतीची लाट लीलेनें तऱ्हांच जाऊन पोहोंचते.

इंग्लंडामध्यें जातिभेद असा नाहीं. तरी तेथील लोकसमाजांत पृथक् पृथक् वर्ग ठाम ठरलेले आहेत. यांच्या परस्पर मर्यादाही तशाच कायम झालेल्या आहेत. वरिष्ठ वर्गांतील लोकांना, कमी भाग्यवान् लोकांसारखा पोषाख करणें, अर्थांतच पसंत नसतें. सरदारांच्या खालच्या दर्जाच्या लोकांमध्यें वरील दर्जा प्राप्त करून घेण्याची ईर्षा व चढाओढ पुष्कळच अधिक असते. कांहीं वर्गांतल्या लोकांना, सामाजिक बाबतींत वरिष्ठ लोकांचें अनुकरण करून, स्वतःच्या खऱ्या स्थितीच्या उलट, नसता डौल लोकांच्या नजरेस पाडण्याची विलक्षण हाव असते. पैशाची वाण सर्वसाधारणतः नसल्यामुळें त्यांना आपल्या

या आवडत्या अनुकरणाच्या इच्छेनुरूप वागून, कसल्या तरी नवीन टूमीमध्यें खर्च करण्याला अडचण पडत नाहीं. सारेच युरोपियन लोक, त्यांतही इंग्लिश भाषा बोलणारे, यांना फेर-बदलाची भारी हौस. यामुळें त्यांच्यांत बहुतेक नेहमींच फाजील व गांवढळ डामडौलाचे प्रकार घडून येतात. अतोनात खर्च करून 'फ्रीक डिनर्स'--विचित्र मेजवान्या—व इतर तसलेच उधळपट्टीचे वेडे वेडे चार, हे याचेच मासले होत. या विचित्र प्रकारांची अमेरिकेंतल्या सारख्या नवकोट नारायण मंडळीमध्यें, जशी मधून मधून सांथच उद्भवते.

आधुनिक सुधारणेबरोबरच पैदा झालेल्या सामाजिक प्रगतीचें अभिनंदन करितांना सुद्धां, अलीकडे दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या फाजील ऐषआरामाकडील प्रवृत्तीचा कल पाहून, मन साशंक झाल्याशिवाय राहात नाहीं. या ऐषआरामांची अनुपयुक्तता, गौतमबुद्ध यांच्या पूर्व वयांतील चटकदार चरित्रावरून विशेष व्यक्त होते. ते एका राजाचे एकुलते एक पुत्र. ते पुढें संन्यासी होणार, असें भविष्य वर्तविलें गेलें होतें. त्यावरून त्यांच्या कोणच्याही प्रकारची दुःखकारक वस्तू दृष्टीस सुद्धां पडूं नये, याविषयीं त्यांच्या पित्यानें फारच काळजी घेतली होती. त्यानें त्यांच्या सभोंवार जगांतील उत्तमोत्तम वस्तूंचा जणों कोट बांधून टाकला. हे राजपुत्र तारुण्यदशेला प्राप्त झाल्यावर, एके दिवशीं ते कसे तरी राजवाड्याबाहेर

पडून नगरांत पोहोंचले. तेथें त्यांच्या पुढें दुःख व त्रास अवचित दत्त ह्मणून उभें ठाकलें. प्रथमच एक वृद्ध मनुष्य त्यांच्या दृष्टीस पडला. त्याला, सर्व माणसें अशींच वृद्ध होतात काय, ह्मणून त्यांनीं विचारिलें. तेव्हां, त्यानें, ' होय ' असें उत्तर दिलें. त्यावरून हें जीवन सतत कायम राहणारें यौवन नव्हे, हें गौतम बुद्धांना कळून आलें. नंतर एक रोगग्रस्त मनुष्य त्यांच्या पाहण्यांत आला. त्यावरून, ' सर्व लोकांना रोगापासून पीडा होते,' हें त्यांना कळलें. पुढें त्यांच्या नजरेस एक प्रेत पडलें. तेव्हां, सर्वांमागें मरण हें लागलेंच आहे, याचें त्यांना ज्ञान झालें. जीवन नश्वर आहे, केवळ संपत्तीच्या द्वारें सुख, तसेंच दुःख व त्रास यांच्या पासून मुक्तता प्राप्त होत नाहीं, हें त्यांना कळून आलें. त्यानंतर त्यांनीं एकांत व अरण्यवास पतकरण्याचा निश्चय केला, आणि भार्या व घरदार यांच्यापासून प्राप्त होणाऱ्या सुखसमाधानाचा त्यांनीं त्याग केला. रथ आणि घोडे सोडून त्यांनीं अरण्याचा मार्ग धरिला. ते पायींच अरण्यभूमीच्या प्रांतभागीं पोहोंचले. तेथून बरोबरच्या सेवकाला त्यांनीं निरोप दिला. जवळ फक्त पाणी पिण्याचा पेला ठेविला. ते एका पुष्करिणीजवळ पोहोंचले. तेथें एकजण ओंजळीनें पाणी पीत असलेला पाहून, जवळ पेला ठेवणें सुद्धां अवश्य नाहीं, असें त्यांना दिसून आलें. याचें तात्पर्य उघड आहे. त्याच्यावरून या पृथ्वीवरील जीवनक्रमांत,—जो त्याच्या पलीकडे भावी स्वर्गीय जीवनक्रमाला पोंहोंचण्याच्या

वाटेंतील एका मुक्कामा सारखाच जणों आहे—खरोखर एखाद्याला अगदींच अवश्य अशा वस्तू किती थोड्या असतात त्याचें निदर्शन होतें.

इंग्रज लोक फ्याशन्च्या चंचलपणाचे इतके निस्सीम बंदे गुलाम असूनही, ते आपल्या रीतीरिवाजासंबंधांत पक्के कान्सरव्हेटिव्ह—चालत आलेल्या पद्धतीला धरून राहणारे—आहेत. लोकांच्या डोळ्यांत येण्याजोग्या किंवा हंसे होण्यासारख्या गोष्टी करण्यांत ते फार मागें पुढें पाहतात. तरी एखादी नवी तऱ्हा एकदां कां सुरू झाली, कीं ती तेव्हांच जशी सर्वमान्य होते, आणि मग पुष्कळांना जुन्या गोष्टींना चिकटून राहून, आपण चालू काळाच्या मागें पडलों आहों, अशीं नांवें ठेवून घेण्याचें धैर्य राहात नाहीं. हिंदुस्थानांतल्याप्रमाणें स्थित्यंतर झालेल्या ठिकाणीं त्या स्थित्यंतराला अनुरूप असा फेरबदल करण्यामध्यें, ते नाराजी दाखवितात. यावरून परंपरागत स्थितीला चिकटून राहण्याचा हा त्यांचा अंगस्वभाव स्पष्ट दिसून येतो. या बाबतींत इंग्रज लोक व डच लोक यांच्या मध्यें फरक दिसून येतो. जावा बेटांतील स्थित्यंतरानुरूप बऱ्याच अंशानें वागण्याला तयार होऊन, डच लोकांनीं, पोषाखामध्येंच नव्हे, पण खानपानादिकांतील किरकोळ बाबतींत सुद्धां, प्राच्य रीतीरिवाज पत्करिले आहेत. कारण, तेच त्या उष्ण कटिबंधांतील भागांत, जास्त सोइस्कर व हितकर





होतात. इंग्रज लोकांनीं या संबंधांत डच लोकांचें अनुकरण करावें. म्हणजे त्यांना, हिंदुस्थानांत राहणें सामान्यतः जितकें दुस्सह व वाईट वाटतें, तितकें तें नाहीं, असें दिसून येईल.

खानपानविषयक वर्णन करितांना, प्राच्य आणि पाश्चिमात्य लोकांच्या राहणीमधील आणखी एका फरकाचें मला स्मरण झाल्याशिवाय राहात नाहीं. तेंही, जीवनाला अत्यंत आवश्यक अशा पाण्याच्या उपयोगासंबंधांत. इकडच्या पेक्षां प्राच्य देशांत, त्याचा पुष्कळच अधिक उपयोग होतो. भोजनापूर्वी व नंतर, पाण्यानें तोंड धुण्याची तिकडे सर्वत्रिक चाल आहे. नित्य निदान एकदां तरी पाण्याचा स्नानासाठीं उपयोग होतो. बरेच लोक अधिक वेळांही स्नान करितात. इंग्रज लोकाप्रमाणें हिंदी लोक पाणी भरलेल्या मोठ्याशा पिपांत बसून स्नान करीत नाहींत. तें ताजें पाणी अंगावर ओतून घेतात. ही तऱ्हा अधिक स्वच्छपणाची आहे. जावा बेटांतील हॉटेलामध्यें डच लोक या दोन्ही तऱ्हांचें मिश्रण करितात. हिवाळ्यांत ऊन पाणी असलें तर बरें, नाहीं तर 'बाथ' मध्यें किंवा पिपामध्यें बसलेलेंच चांगलें, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. अंगावर पाणी ओतून घेऊन स्नान केल्यानें जास्त हलकेपणा वाटतो. पुष्कळसें पाणी पिण्यांत आल्यानें आरोग्यरक्षण चांगलें होतें, हें इंग्रज लोकांच्या नीट ध्यानीं आलेलें नाहीं. जपान व रशिया यांच्या मधील घोर युद्धांत

जपानी शिपायापाशीं 'फिल्टर'–पाणी गाळण्याचें लहानसें यंत्र–असें प्रत्येकाला दहा पंधरा शेर पाणी ठरावाप्रमाणें मिळत असे. यामुळें त्यांना रोगराई झाली नाहीं. त्या युद्धांमध्यें त्यांनीं जो काटकपणा व सोशिकपणा दाखविला, तो बहुतेक याचाच परिणाम होता, असें मानतां येण्याजोगें आहे.

स्त्रियांशीं वागणूक ठेवण्या संबंधांत प्राच्य व पाश्चिमात्य यांच्यामध्यें पुष्कळच फरक आहे. स्त्री जातीविषयीं आदर, युरोपच्या पश्चिम भागांत बहुतेक सार्वत्रिक आहे. ' प्रथम स्त्रिया ' ही ह्मण तिकडे सर्वत्र प्रचारांत आहे. युरोपियन बायकांना मोकळेपणीं स्वातंत्र्य उपभोगितां येतें, व वाटेल तसें बाहेर राहतां फिरतां येतें. हा सर्व तिकडील पुरुषांच्या मनांत सदैव जागरूक असलेला स्त्री जातिविषयक ' शिव्हल्री '—आदरभाव–चाच परिणाम होय. इंग्लंडमध्यें तर स्त्रिया पुरुषांइतक्याच स्वतंत्र आहेत. त्यांच्यावर कोणच्याही तऱ्हेचा दाब नाहीं. त्यांना कोठेंही आडकाठी नाहीं. एखाद्या स्त्रीला बाहेर एकटें फिरतां सवरतां किंवा प्रवासाला जातां येतें. तिला त्रास किंवा अडचण येण्याची भीति मुळींच नसते. बाहेर समाजामध्यें असतांना, तिला मज्जाव करण्याची, किंवा कसलीही अडचण आणण्याची, कोणाचीही प्राज्ञा नाहीं. तिचा उपमर्द करणें तर एकीकडेच राहिलें, पण तिच्याशीं यत्किंचितही आगळिकीचें वर्तन झालेलें कोणाच्याही दृष्टीस पडलें तर, त्याला तात्काळ बलवत्तर त्वेष आल्याशिवाय रहात नाहीं.

हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या स्थितीशीं ताडून पाहतां, या गोष्टी किती तरी विरुद्धशा आहेत. तिकडे थोड्याच वर्षांपूर्वी त्यांना कोठें बाहेर पाठविणें अवश्यच आलें तर, त्यांच्या योग्य संरक्षणाची तजवीज करणें भाग पडत असे. कारण,त्यांना कोणी त्रास देऊं लागला तर,कोणाकडून मदत किंवा सहानुभूती मिळण्याची खात्री नसे. तिकडेही स्त्रियांना मोकळेपणीं बाहेर जातां फिरतां न येण्याला एक सुद्धां योग्य व सबळ कारण आढळत नाहीं. पण याविषयींची हल्लीं असलेली समजूत बदलण्यापूर्वी तिकडील लोकांच्या मनांत इंग्रजी तऱ्हेच्या 'शिव्हल्री'–स्त्रीविषयक आदरबुद्धी–ची जाणीव उत्पन्न झाली पाहिजे. तिकडील स्त्रियांमध्यें स्वावलंबन व स्वत:वरील जबाबदारी यांविषयींची जास्त जाणीव आल्याशिवाय, हिंदुस्थानांतील सांपत्तिक व कौटुंबिक स्थिती सुधारणें शक्य नाहीं. वास्तविकपणें सर्वतोपरी परावलंबी व दुसऱ्यांनीं काळजी घेण्याच्या स्थितींत राहण्याऐवजीं, हिंदी स्त्रियांनीं स्वत:च्या कुटुंबांतील माणसांनीं अंगावर घेतलेल्या हरएक कामांमध्यें साहाय्य करतां येईल, इतकी योग्यता संपादन केली पाहिजे.

स्त्रियांना पडद्यांत ठेवण्याचा प्रघात मुसलमानांपासून अनुकरण केलेला आहे, अशी समजूत सर्वमान्य झालेली आहे. हिंदी स्त्रियांच्या प्रगतीला, मुसलमान लोकांची आपल्याला जबरदस्त आडकाठी आहे, कारण त्यांच्या स्त्रियांनींही पडदा सोड-

त्याशिवाय–निदान तसें करणाऱ्या हिंदी स्त्रिया मोकळेपणीं बाहेर पडलेल्या पाहून, त्यांची टवाळी व थट्टा करण्याचें सोडल्यावांचून, हिंदी स्त्रिया ती तऱ्हा सोडणार नाहींत, असें इंग्लंडांत सकुटुंब रहात असलेल्या एका हिंदी सद्गृहस्थांनीं मला सांगितलें. तें कांहीं असो; हल्लीं या बाबतींत फेरबदल होतो आहे. कांहीं झालें तरी एका जातीच्या किंवा वर्गाच्या स्त्रियांना इतरांच्यापेक्षां प्रागतिक होण्यांत 'फाय ब्रांड्स'–आगलाव्या–अशाप्रकारचीं अपमानकारक विशेषणें सोसून घ्यावीं लागणारच. कांहीं घस सोसलीच पाहिजे व अडचणी भोगल्या पाहिजेत. साऱ्याच प्रगति आणि सुधारणांसाठीं अशा प्रकारचीं प्रायश्चित्तें भोगणें प्राप्त पडतेंच. मी स्वतः या बाबतींत, इंग्रज लोकांइतपत पुढें पाऊल टाकण्याला तयार नाहीं. तरी कांहीं फेरफार हवा आहे, आणि आजवर समाजसुधारणेच्या बाबतींत आमचें पुढें पडलेलें पाऊल बरेंच आशाजनक आहे.

पुढें पुढें 'शिव्हल्‌री' शब्दाचा जो विवक्षित अर्थ मानण्यांत येऊं लागला, त्यामध्येंच युरोपियन समाजामध्यें स्त्रियांविषयीं जो आदर दाखविला जातो, व त्यांना जो अग्रेसरपणा दिला जातो, त्याचें मूळ पाहिलें पाहिजे. पूर्वीं पूर्वीं या शब्दामध्यें शूरवीराच्या अंगच्या सर्व श्रेष्ठ गुणांचा व शौर्याचा समावेश होत होता. दुर्बल व गांजलेल्या व्यक्तिमात्रांचें संरक्षण करणें, व त्यांच्यासाठीं खस्त खाणें, वीरपुरुषाचें कर्तव्य आहे

अशा अर्थानें ' शिव्हल्‌री ' शब्दाचा उपयोग करीत असत. पुढें त्याच्या सर्वमान्य अर्थांत सद्गुणसंपन्न वीराच्या अंगचा एकच विशिष्ट गुण समाविष्ट होऊं लागला. सामान्यतः स्त्रीजातीसंबंधीं, व त्यांतही आपल्या प्रणयपात्र स्त्रीसंबंधीं, एका विशेष कर्तव्याच्या जबाबदारीचें त्याच्यापासून निदर्शन होऊं लागलें. मूळारंभापासून या ' शिव्हल्‌री ' रूपी संस्थेमुळें जें उपयुक्त कार्य घडलें, आणि पाश्चिमात्य सुधारणेवर तिचे जे महदुपकार झाले, त्याचें दिग्दर्शन करणें वावगें होणार नाहीं. कारण त्यामुळें त्या काळच्या दणगट, असंस्कृत तथापि उदार व सत्यनिष्ठ लोकांच्या मनांत गरीब व निराश्रित लोक विशेषें-करून स्त्रिया—यांच्या हक्कांची जाणीव उत्पन्न होऊन, त्यांच्या-साठीं आपण काय व कशी घस सोसणें अवश्य आहे त्याची त्यांना पुरी उमज पडण्याला एक साधन मिळालें. दिवस-गतीनें या ' शिव्हल्‌री'च्या ध्येयामध्यें बदल होऊन त्याला संकु-चितपणा आला, तरी गरजू व जुलूम झालेल्या व्यक्तींच्या संरक्षणासाठीं या शूरवीरांच्या प्रबळ बाहूंना आपलें शौर्यबल दाखविण्याचे वेळोवेळीं प्रसंग पडत, आणि याप्रमाणें, त्या काळीं समाजाकडून मिळणें अवश्य असणारें स्त्रियांच्या संरक्षणाचें साधन, ' शिव्हल्‌री'नें प्राप्त करून दिलें.

हिंदू स्त्रियांच्या दृष्टीनें ' पतिव्रत ' शब्दाचा जो अर्थ होता व त्या शब्दांत ज्या सद्गुणांचा समावेश केला जात असे

तो अर्थ व गुणसमुच्चय अगदीं ‘ शिव्हल्री ’च्याच मासल्याचा होता. त्याचाही मूळचा अर्थ अधिक व्यापक होता. त्याचाच पुढें कौटुंबिक कर्तव्यांपैकीं एका विशिष्ट गुणापुरता हल्लींच्या अर्थाच्या पातिव्रत्याचा द्योतक-अर्थ कायम झाला. ‘ शिव्हल्री’ मुळें शूरवीराला आपल्या प्रणयपात्राला खुष करण्यासाठीं किंवा तिच्या केवळ मर्जीखातर, हवी ती घस सोसण्याला तयार व्हावें लागे. त्याप्रमाणें इकडे हिंदी पातिव्रतेनें स्वत:चें हित व सुख, यांच्यापूर्वी पतीचें हित व सुख साधण्याला झटणें स्वत:चें कर्तव्य समजून, पतीची प्रत्येक आज्ञा शिरसा मान्य करून तदनुरूप स्वत:चें वर्तन ठेवणें आवश्यक आहे; असें समजलें जात असे. पाश्चिमात्य देशांत ‘ शिव्हल्री ’साठीं, स्त्रियांना सर्व तऱ्हेनें मान देणें, व त्यांची श्रेष्ठता कबूल करणें हक्काचें समजलें जाऊं लागलें. तसेंच पूर्वेकडील देशांत ‘ पतिव्रत ’ धर्माअन्वयें पुरुषाकडे सर्व मान व वरिष्ठपणाचा हक्क आला. ‘ शिव्हल्री ’च्या द्वारें, स्त्री ह्मणजे मूर्तिमान् सद्गुणाची पुतळी बनली, व पुरुषांनीं तिला मान देण्याची व त्यांच्या हातून संरक्षण केलें जाण्याची तिच्या अंगीं पात्रता आली. तद्वतच पतिव्रताच्या द्वारें स्त्रीला पुरुषाच्या श्रेष्ठतेची जाणीव झाली, व तिच्यापासून ताबेदारी व मान मिळविण्याचा त्याला हक्क प्राप्त झाला.

गरीब व रंजले गांजलेल्या लोकांच्या संरक्षणाविषयीं, हिंदी लोकांच्या मनांत सहानुभूती उत्पन्न करण्यासाठीं, युरोपांतील

मध्ययुगीन नवीन ‘ शिव्हल्‍री ’सारख्या संस्थेची आवश्यकता नव्हती. तसेंच, आपला राजा, वडीलधारे, गुरू, आणि सर्वच स्त्रिया,यांच्या संबंधांत आपलीं कर्तव्यें काय आहेत,याची बाहेरून जाणीव होण्याची, त्यांच्यामध्यें केव्हांच उणीव नव्हती.‘शिव्हल्‍री’ शब्दाचा अतिशय व्यापक अर्थाचा भाव, हिंदी लोकांच्या अंत:करणामध्यें, त्यांच्या हातून जगांतील अतिश्रेष्ठ व थोर कृत्यांपैकींच पुष्कळशीं कृत्यें घडत असतांना, जोरानें उचंबळत होता. झीज सोसण्याची शक्ती व ती ज्यांच्या प्रीत्यर्थ सोसावयाची, ते गुरुजन, दीन दुबळे, गरजू, व रंजले गांजलेले लोक, यांच्याकडे खास लक्ष पुरविणें, या गोष्टींमध्यें हिंदुस्थान देश इतर कोणत्याही देशाला आहारीं जाण्याजोगा नव्हता. हें ध्येय, तदनुरूप वर्तन व प्रयत्न चालू होते तोंवर, त्या देशाचा मोठा उत्कर्ष होता. त्याच्यापासून चळल्यानंतरच त्याचा भराभर ऱ्हास होऊं लागला.

‘ शिव्हल्‍री ’ आणि ‘ पतिव्रत, ’ या दोन्ही ध्येयांचें आजकाल एकीकरण हवें आहे. पौर्वात्यांनीं पाश्चिमात्यांकडून हल्लींच्या अर्थाची ‘शिव्हल्‍री’ शिकली पाहिजे. तसेंच त्यांनाही पाश्चिमात्यांना त्याच तोडीचा धडा देतां येण्याजोगा आहे. या दोहोंचें योग्य सम्मीलन झालें होतें,अशा एका काळीं हिंदुस्थान देश सुखी व भाग्यवान् होता. त्या दिवसांत पुरुष व स्त्रिया आपापल्या क्षेत्रांत परस्परांना श्रेष्ठ व पूज्य समजून वागत असत.

राम व जानकी, किंवा नल व दमयंती, यांचीं चरित्रें हीं याचीं उदाहरणें आहेत. त्यावेळीं तेथील सहस्रावधि उत्तमोत्तम नरनारीरत्नांविषयीं अभिमान बाळगण्याला, त्या देशाला जागा होती. देशांत अशीं नरनारीरत्नें असणें हें कोणत्याही देशाला अभिमानास्पद होय. तेथील स्त्रियांमध्यें पतिव्रत धर्माची जाणीव अद्यापिसुद्धां उत्कट व जागरूक आहे. पाश्चिमात्य शिक्षणाच्या द्वारें तेथील युवकांच्या अंतःकरणांत 'शिव्हल्री'ची कल्पना रुजत चालली आहे. हीं दोन्ही ध्येयें साध्य करण्यामध्यें, त्याच्या साधनांचा अतिरेक न होऊं देण्याची खबरदारी घेतली गेली तर, आमच्या मातृभूमीलाही लौकरच हटकून उज्ज्वल स्थिती प्राप्त होईल, अशी माझी खात्री आहे.

इंग्लिश लोकांची राहणी निर्मळ व व्यवस्थेशीर असते. ते नियमित वेळीं खानपान करितात. यामुळें गृहकृत्यांचा उरक सोपा जातो. ते सामान्यतः कामाकाजाच्या वेळीं खूप मेहनतीनें काम करितात, व फुरसतीच्या वेळीं खेळांत मनापासून गढून जाऊन खेळतात संवरतात. आजकाल इंग्लंडांत मद्याचा खप कमी होत चालला आहे, असें मला सांगण्यांत आलें. या गोष्टीचें मला खरोखर समाधान वाटलें. त्याच्यापासून गुन्हेही कमी घडूं लागले आहेत, तसेंच समाजाचें आरोग्य व नैतिक प्रवृत्ति, यांचाही जोम वाढतो आहे.

मद्यपान खालावत चालल्याबरोबरच, उच्च प्रतीचे करमणुकीचे मार्ग व बुद्धिविषयक सुखसाधनें यांची लोकांना अधि-

काधिक आवड लागत आहे. सुखवस्तू व संपन्न लोकांचा जीवनक्रम जास्त ऐषआरामाचा होतो आहे, असें सकृद्दर्शनीं वाटतें पण सामान्यतः सर्वसाधारण लोकांच्याच जीवनचर्येचें मान वरिष्ठ प्रतीचें होत आहे, असें मला खात्रीपूर्वक कळविण्यांत आलें. हें सुदैवानें खरेंच ठरलें तर, पाश्चिमात्य सुधारणेची भावी स्थिति खचित आशाजनक आहे. अभिनवयौवनावस्था ही सर्वत्र उच्छृंखळपणाचें जसें वारूळ. प्रौढावस्थेमध्यें सुखोपभोग अधिक भारदस्तपणाचे होतात. वयोमानाप्रमाणें मनुष्याच्या अंगीं अधिकाधिक नेमस्तपणा येतो. मन हळू हळू न कळत वरिष्ठ कोटीच्या मार्गाकडे व उद्योगाकडे, तसेंच नित्य च अनश्वर, सत्य व अनंत, वस्तूच्या चिंतनाकडे, आणि भविष्यत् चिरकालिक व अज्ञात स्थितीकडे वळूं लागतें. ही भावी अज्ञात स्थितीच साऱ्या जगाला मोठ्या आशेचा विषय होऊन राहिली आहे.

जी गोष्ट व्यक्तींना तीच राष्ट्रांनाही लागू पडते. अपरिचित चालीरीतीसंबंधानें कोणींही ठासून विधान करणें एकंदरींत योग्य नव्हे. इंग्लंडाला येण्यापूर्वीं व आलों तेव्हांही, पाश्चिमात्यांच्या चालीरीतींसंबंधानें माझा कांहींसा प्रतिकूळ ग्रह होता, हें मी कबूल करितों. पण यापूर्वीं निदर्शन केल्याप्रमाणें, त्यांच्यापैकीं प्रत्येकीचा कांहीं ना कांहीं उपयोग आहे. यांपैकीं कांहीं चालीरीती मला पूर्वीं वाटत होत्या तितक्या त्या

वाईट नाहींत, असें शोधनाअंतीं दिसून आलें. प्रत्येकीं-मधील चांगुलपणा शोधून काढणें, हीच मुख्य व महत्त्वाची गोष्ट होय. आपणाला त्यांच्याकडे मानवी हिताहिताच्या दृष्टीनें पाहून, त्यांची टवाळी करण्याऐवजीं, सुधारणा करण्याच्या दृष्टीनें लक्ष दिलें पाहिजे. असल्या व इतर मानवबंधूंच्या न्यायदृष्टीसंबंधांत आपल्या मनाची दृष्टी अधिकाधिक उदार-पणाची होण्याविषयीं, यत्न करीत राहिलें पाहिजे, आणि आपण,

'दोषाविषयीं आंधळे, क्षमा करण्याला तत्पर, परार्थ प्राण धारण करणारे, व स्वतःप्रमाणेंच इतरांनाही जिवंत राहूं देण्याला तयार, असे झालें पाहिजे.'

या मार्गानेंच आपल्या जीवनक्रमावर सुख व संपदारूपी हिरण्मय सूर्यप्रभा फांकेल. महासागरावर फिरणारीं अनेक गलबतें, निरनिराळा मार्ग क्रमीत असलीं तरी, तीं शेवटीं, एकाच बंदराला पोहोंचूं शकतात. तद्वत्, या जीवयात्रेची स्थिती आहे. सुंदर चेहऱ्यावरील प्रत्येक स्मित, तसेंच प्रत्येक पुष्प, जतन करण्यायोग्य आहे. पण तें कसें करावयाचें हें जाणलें पाहिजे. प्रत्येक जीवनचरित्रामध्यें जगताला देण्यायोग्य असा कांहीं तरी भाग अवश्य असतो.

# भाग बाविसावा.

## इंग्रज लोकांतील शिक्षण.

'सामान्य मनाला वळण लावून तयार करणारें असें शिक्षणच. खांदी वळवावी तसेंच झाड तयार होतें.' पोप.

लॉर्ड रोजबरी, हे इंग्लंडांतील प्रमुख वक्त्यांपैकीं शिरोरत्न होत. त्यांनीं थोड्या दिवसांखालीं ह्मटलें आहे कीं, 'युरोपांतील मोठमोठ्या राष्ट्रांमधील भावी प्रचंड कलह, मेंदूच्या शक्तीच्या द्वारें होईल, रक्तपाताचा नव्हे. तो कलह व तदानुषंगिक युद्धें, व्यापारसंबंधानें होतील, आणि प्रत्यक्षतः व्यवहारोपयोगी शिक्षण, हेंच त्याचें नियामक तत्त्व होईल.' हें त्यांचें म्हणणें, जसें एखाद्या महात्म्याच्या भविष्यवादाप्रमाणें खरें ठरलें. हा कलह तूर्त चालूच आहे. जर्मनीनें बरोबरीच्या प्रतिस्पर्धी मंडळीपेक्षां, पुष्कळचशा बाबतींत किती तरी पुढें धांव मारली आहे. तिनें पुष्कळ वर्षांपासून आपल्या प्रचंड लोकसमाजामध्यें शिक्षणाच्या प्रसारासाठीं ज्या अटोकाट सोई करून ठेविल्या, त्यांचेंच हें फळ होय. भौतिक शास्त्रा-

मधील नवीन शोध लावण्याच्या बाबतींत फ्रान्स व अमेरिका यांना प्रमुखपणा मिळत आहे; तो तरी याच कारणांमुळें. तसेंच इंग्लंडानें व्यापारसंबंधांत जो अद्वितीय वरिष्ठपणा मिळविला आहे, त्याचा खरा व पक्का आधार, होतकरू पिढीच्या मानसिक तयारीच्या पुर्तेपणावरच सर्वथैव अवलंबून आहे; ही गोष्ट इंग्लंडाला पुर्तेपणीं समजून गेलेली आहे.

ग्रेट ब्रिटन् मधील तरुण मंडळीला शिक्षण देऊन तयार करण्यामध्यें, सरकार जी जणों पितृवात्सल्यानें व कळकळीनें, काळजी घेत आहे, ती माझ्या ध्यानांत आल्यावांचून राहिली नाहीं. विलायतेंतील प्राथमिक शिक्षण फुकट व सक्तीचें असून, शिवाय पुष्कळ ठिकाणीं अगदीं गरीबांच्या मुलांना, शाळेंत न जाण्याला सबब राहूं नये म्हणून, खाणें पिणें व बूट फुकट देतात. याचें सारें श्रेय तिकडील लोकसमाजाच्या औदार्याला आहे. मुलांना तरी शाळेंत आर्जव करून पाठवावें लागतें, असें नाहीं. पूर्वींच लिहिल्याप्रमाणें, निरनिराळ्या गांवांतील प्राथमिक शाळा, मीं जाऊन पाहिल्या त्यांतील मुलें एकंदरींत आपले धडे आनंदानें तयार करीत असल्याचें व शिकविलेले पाठ कुशाग्र बुद्धीनें ग्रहण करीत असल्याचें माझ्या निदर्शनास आलें. साधारणतः सामान्यशिक्षणपद्धतीचा मुख्य अभ्यासक्रम ' बोर्ड ऑफ् एज्युकेशन ' ठरवून देतें. पण शिक्षण देण्याच्या तऱ्हेमध्यें बराच फरक असतो.

अगदीं लहान मुलांच्या शाळेंत ' किंडरगार्टन '–बालोद्यानपद्धती–चें शिक्षण फायदेशीर व लोकप्रिय होतें.या बालोद्यानशिक्षणपद्धतीचा मुख्य हेतू हा आहे कीं, व्यवस्थित खेळकरमणुकी व मनोरंजक वस्तुपाठ, इत्यादिकांच्या द्वारें, मुलांच्या चौकसपणाचा सहज व क्रमाक्रमानें विकास होत जावा आणि त्यांच्या मानसिक व नैतिक वृत्ती व शारीरिक शक्ति यांची वाढ, सरळ व परस्परांना अनुकूल अशा रीतीनें होत जावी. सार्वजनिक प्राथमिक शाळांमधून, चौदा वर्षांपर्यंतच्या मुलांना एकंदरींत सामान्य तऱ्हेचें शिक्षण चांगलेंच दिलें जातें. त्यांच्यांतील साधनसामग्री, हिंदुस्थानांतील प्रमुख शाळा व कॉलेजें, यांनासुद्धां शोभेल अशी असते. शिवाय त्या शाळांतून वरिष्ठ प्रतीच्या शाळांत व तेथून ' यूनिव्हर्सिटी ' मध्यें जाण्याला होतकरू विद्यार्थ्यांना मदत व्हावी या हेतूनें व्यवस्थित स्कॉलरशिपांची योजना करण्यांत आलेली असते.

अभ्यासक्रम पुढें चालविण्याच्या सायंकाळच्या शाळा, या शिक्षणक्रमाच्या पद्धतींतील पुढची पायरी होत. तेथें जाणें न जाणें, ज्याच्या त्याच्या मर्जीवर असतें. नांवाला थोडीशी फी भरून, त्यांच्यांत, हिशेब, चित्रकला, व्यापारी व रोजच्या व्यवहारांतील पत्रें लिहिण्याच्या पद्धती, लघुलेखन, लांकडावरील कोरीव काम, आधुनिक भाषा, शिंप्याचें काम, सूपकर्म, वगैरेचें शिक्षण मिळतें. त्यामुळें,शाळा सोडून,उद्योग

धंदा किंवा नोकरी, यांच्या मागें लागलेल्या तरुण मुलांमुलींना शिक्षणक्रम पुढें चालवितां येतो. त्यांना नोकरींत ठेवणाऱ्या बऱ्याचशा लोकांकडून, नोकरीचा कांहीं वेळ या कामीं खर्च करण्याला परवानगी वगैरे देऊन, उत्तेजन दिलें जातें. हरहुन्नरशिक्षणाच्या बहुतेक मोठ्या गांवांतून विशिष्टधंदेशिक्षणाच्या व 'पॉलिटेक्निक्स' शाळा असतात. तेथें कामकरी मंडळीला हातकसबाचें काम, इमारत काम, व्यापार व व्यवहार, भाषाज्ञान, आणि प्रत्येकाच्या निरनिराळ्या धंद्यासंबंधीं शास्त्रीय विषय आणि कला, इत्यादिकांचें ज्ञान मिळविण्याची साधनें उपलब्ध असतात. या सर्वांमुळें, कामकरी लोकांची बरीच सुधारणा झाली आहे, इतकेंच नव्हे, तर त्यांच्या अंगीं जास्त चतुराईनें काम करण्याची योग्यता आल्यामुळें प्रत्येक कारखान्यांतील माल पूर्वीपेक्षां अधिक चांगला तयार होत आहे आणि त्या योगानें देशाचाही फायदा झाला आहे. विलायतच्या लोकांसाठीं इतक्या तऱ्हेच्या सोई सुलभ असल्यामुळें त्यांच्याशीं आमच्या हिंदुस्थानांतील अत्युत्तम कारागिरांना सुद्धां, सामना करून यश मिळविणें अशक्य झालें आहे. इंग्लंडांतील दरिद्री माणसाला सुद्धां, अव्वल प्रतीचें शिक्षण मिळवून घेण्याची उमेद बाळगण्याला जागा आहे. पण हिंदुस्थानांत तें शिक्षण केवळ सुखवस्तू लोकांसाठींच राखून ठेवल्यासारखें झालेलें आहे.

सरकारी शाळा व शिक्षणसंस्था, यांशिवाय, खासगी शाळा व कॉलेजेंही पुष्कळच आहेत. त्यांपैकी 'सिटी

अँड गिल्ड्स एन्जिनियरिंग कॉलेज' व 'वेस्टमिन्स्टर स्कूल,' हीं मीं पाहिलीं. यांतील पहिलें 'लंडन युनिव्हर्सिटी' खालीं असून, त्याच्यांत उत्तम तऱ्हेचें धंदेशिक्षण दिलें जातें. दुसरी शाळा पूर्वीच्या 'पब्लिक स्कूल'च्या धर्तीची आहे. तेथील व्यवस्था पाहून माझ्या मनावर फार चांगला ग्रह झाला. तेथें फार खर्च येतो, असेंही नाहीं. शिक्षक व विद्यार्थी, यांचा परस्पर संबंध, बराच प्रौढपणाचा व आदबशीर असतो. या शिक्षणक्रमाची शेवटची पायरी 'युनिव्हर्सिट्यां'ची. लंडन युनिव्हर्सिटीचें ऑफिस मीं पाहिलें. तेथील शिक्षणविषयक ध्येय फारच श्रेष्ठ असल्याचा लौकिक आहे. तेथील लायब्ररी पहिल्या प्रतीची आहे. आणि लॅबोरेटरी सर्व सामग्रीनें परिपूर्ण आहे. तिच्यांत काळजाचे ठोके स्पष्ट दाखविणारें यंत्र असून तें आधुनिक वैद्यकशास्त्रसंबंधांतील एक अद्वितीय नवीन क्लृप्तीचें निदर्शक आहे.बायकांना शिक्षणक्रमांतील पदव्या देण्याच्या कामीं या युनिव्हर्सिटीनेंच पुढाकार घेतला, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. ऑक्सफर्ड व केंब्रिज मध्यें अद्यापि बायकांना त्या पदव्या देण्याचा रिवाज नाहीं. परंतु स्त्रियांनीं पुरुषांबरोबरच, सर्व शिक्षणक्रम पुरा करून घेण्याचीं सर्व साधनें व सोई करून ठेवलेल्या आहेत.

ठराविक शिक्षणाच्या सोईशिवाय, या विश्वविद्यालयांना उपयोगी व पुरवणीदाखल अशी 'युनिव्हर्सिटी एक्स्टेन्शन

मूव्हमेंट 'ची संस्था आहे. तिच्या द्वारें या विश्वविद्यालयांना आपल्या मर्यादित क्षेत्राबाहेरही शिक्षणाचा प्रसार करण्याची तजवीज करतां येते. भौतिक शास्त्र, वाङ्मय, तत्त्वज्ञान, अर्थशास्त्र, नीतिशास्त्र, आणि कामकरी मंडळीला विशेषेंकरून उपयोगी अशा विषयांवर, त्यांच्यामध्यें पारंगत असलेल्या व्याख्यानकारांना, निरनिराळ्या गांवांत व शहरांत, व्याख्यानमाला देण्यासाठीं पाठविलें जातें. हीं सर्व व्याख्यानें सामान्य लोकांनाही सहज समजतील, अशीं सोप्या भाषेंत दिलीं जात असल्यानें तीं सर्व श्रोत्यांना समजण्याला अडचण पडत नाहीं. अशा तीन चार व्याख्यानांची माला ऐकण्यासाठीं सरासरी साडेपांच रुपये फी पडते. या व्याख्यानमालांचे मुख्य उद्देश पुढें लिहिल्याप्रमाणें असतात. सामान्य चाणाक्ष व शोधक श्रोत्यांच्या मनाला उत्तेजन मिळावें, निरनिराळ्या विषयांचें विशेष अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्ग दाखवून मदत व्हावी, कोणच्या विषयावर कोणकोणचीं पुस्तकें वाचावीं तें सुचवून शिक्षणक्रम आखून द्यावा, व तयार मंडळीच्या परीक्षा घ्याव्या. प्रत्येक व्याख्यान आटपल्यावर, त्यांतील विषयावर प्रवचन होतें. त्याच्यांत त्या विषयाचें विशेष स्पष्टीकरण केलें जाऊन विद्यार्थ्यांना न कळणाऱ्या भागासंबधानें खुलासा करून घेतां येतो. पद्धतशीर अभ्यास चालविणाऱ्या मंडळीसाठीं, दर आठवड्याला लेखी प्रश्न देऊन त्यांनीं दिलेलीं उत्तरें तपासून दिलीं जातात. येथें असतांना आम्ही अशा एका व्याख्यानाला गेलों होतों. तेथें

"आजकालच्या उद्योगधंद्याची स्थिती व तिच्यासंबंधीं उपाय— औद्योगिक शांतता," या विषयावर, मिस्तर ई. एल्. एस्. हार्सबर्ग, बी. ए., क्वीन्स कॉलेज, ऑक्सफर्ड, यांनीं व्याख्यान दिलें होतें.

याच संबंधांत इंग्लिश शिक्षणक्रमांतील धार्मिक विषयांच्या बाबतींत व त्याचा हिंदुस्थानांतील अनेक महत्त्वाच्या प्रश्नांपैकीं एकाशीं असलेल्या संबंधाविषयीं थोडेंसें विवेचन करणें अवश्य आहे. इंग्लंड देश मुख्यतः जड सृष्टीच्या विचारामध्येंच गर्क असतो, अशी माझी समजूत होती. पण तेथील लोकांच्या जीवनक्रमामध्यें धर्माकडून पुष्कळच महत्त्वाची कामगिरी घडत आहे, असें, प्रत्यक्ष माहिती मिळाली तिच्यावरून पाहून, मला भारी आश्चर्य वाटलें. प्रत्येक खेडें, गांव, 'पारिश,' हरएक कॉलेज, सर्व मोठमोठ्या शाळा, वर्क हौसेस व खुद्द तुरुंग, इत्यादि साऱ्या ठिकाणीं, विवक्षित, प्रार्थनेचीं मंदिरें असतात. इंग्लंडामध्यें दोन तीन शतकांपूर्वीं हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच वरिष्ठ प्रतीचें शिक्षण, व धार्मिक शिक्षण, हीं समानार्थक पदें होतीं. आजकाल इंग्लंडांत इतर अनेक विषयांप्रमाणेंच, धर्म हा शिक्षणक्रमापैकीं एक विषय झालेला आहे. पण सर्व शिक्षणक्रमामध्यें साधारणतः धार्मिक तत्त्वें बऱ्याच अंशांनीं मिसळलेलीं असून, त्याच्या योगानें विद्यार्थिवर्गाच्या चारित्र्यामध्यें विशेष सत्त्व व जोम येत आहेत.

कांहीं झालें व ह्मटलें तरी, प्रत्येक राष्ट्राला धर्माची आवश्यकता असते. या धर्मामुळें नैतिक शास्त्राचे नियम यथाविधि कां पाळले पाहिजेत याची कारणपरंपरा लोकांच्या स्पष्टपणें निदर्शनास आणली जाते. ओजस्वी व सत्यप्रिय असें चारित्र्य बनून येण्याला, धर्म व नीती हीं मुख्य व मूळाधार साधनें होत. खऱ्या भक्कम धर्मतत्त्वांच्या पायावर अधिष्ठित असलेल्या प्रबल नीतिशास्त्राच्या आधारावांचून, कोणच्याही राष्ट्राला उन्नती होण्याची आशा व उमेद धरणें शक्य नाहीं. कांहीं लोक नीट शास्त्रोक्त व पूर्ण विचार करीत जातात. पण त्यांचीं प्रमेयें अन्यथा असल्यामुळें, ते अनीश्वरवादी बनतात. ज्यांना या संसाराविषयीं खोल व योग्य विचार करण्याला फावत नाहीं, किंवा जे त्याच्या विषयीं विशेष काळजी किंवा पर्वा करीत नाहींत, अशा खुशालचेंडू मंडळीच्या मनांत, या जगाच्या परमकृपाळू व दयाघन विधात्याविषयीं विचारच येत नाहीं. बहुतेक प्रत्येकाला या संसारामध्यें केव्हां ना केव्हां, महत्संकटाचा असा एखादा प्रसंग अवश्यमेव येतोच, कीं, त्या वेळीं त्याच्या मनाला धैर्य किंवा समाधान वाटण्याला, व पुढें आलेल्या मोहजालांत न फसण्याजोगी मनोवृत्ती होण्याला, धर्माची आवश्यकता वाटतेच. विलायतेंतील भले गृहस्थ हे भक्कम व्यवहारज्ञानसंपन्न. वाढत्या तरुण पिढीला वाडवडिलांच्या धर्माचें शिक्षण देणें, राष्ट्राचें कर्तव्य असून ती मंडळी स्वतः त्यासंबंधीं योग्य व शास्त्रोक्त विचार करण्याला समर्थ होईपर्यंत,

तें शिक्षण त्यांना दिलें गेलेंच पाहिजे, अशी त्यांची पक्की समजूत आहे.

असें असूनही सुदैवानें ज्यांच्या जीवनचर्येच्या नेतृत्वाचें महत्त्वाचें काम ईशसत्तेनें ब्रिटिशांच्या हातीं आलेलें आहे अशा हिंदुस्थानांतील वाढत्या पिढीच्या शिक्षणक्रमामध्येंही, धर्मासंबंधीं शिक्षण अंतर्भूत असणें अवश्य आहे, ही गोष्ट ब्रिटिश राष्ट्राच्या परिस्थितींत वाढलेल्या लोकांच्या कशी ध्यानांत येत नाहीं, याचें मला फार आश्चर्य वाटतें. हिंदुस्थानांतील प्रजेमध्यें धर्माचे निरनिराळे पंथ प्रचलित असल्यानें सरकारी देखरेखीखालीं धार्मिक शिक्षण देण्याचें काम कठिण आहे, असें म्हणण्यांत येतें. पण इंग्लंडांत ख्रिस्ती धर्माचे निरनिराळे पंथ व प्रकार सुरू असूनही, तेथील प्रत्येक शाळेंत व कॉलेजामध्यें धार्मिक शिक्षण दिलें जात आहे. तिकडील सर्वसाधारण जनसमूहाला परधर्मसहिष्णुतेचा धडा अलीकडेच मिळालेला आहे. तरी सुद्धां ही धार्मिक शिक्षणाची पद्धती तेथें चांगली बिनबोभाट, व समाधानकारक रीतीनें काम करीत असल्याचें आढळून आलें आहे.

उलट हिंदुस्थानांत हिंदुधर्मांतील निरनिराळ्या शाखा व पंथ अनादि असून सुद्धां, तो धर्म, इतर सर्व धर्मांहून अधिक परधर्मसहिष्णु असल्याची गोष्ट सर्वमान्य आहे. तेव्हां, आजकाल हिंदुस्थानांतील मुलांना धार्मिक शिक्षण देण्याच्या बाब-

तींत जो मनःपूर्वक प्रयत्न केला जात आहे, त्याला, ही पंथ-बाहुल्याची सबब बाधक होऊं देणें योग्य नाहीं. हे प्रयत्न इंग्लंडांत व युरोपांतील इतर देशांमध्यें, मुख्यतः अमलांत आणले जात आहेत ते विशिष्ट पंथवाल्यांनीं चालविलेल्या शाळांमध्येंच, हें खरें. अशा शाळांना सार्वजनिक साहाय्य मिळत असतें. हिंदी लोकांनींही अशाच तऱ्हेच्या संस्था चालविण्याचा प्रयत्न करणें अवश्य असलें तरी, तिकडे खऱ्या सार्वजनिक व सार्वत्रिक उपयोगाच्या चळवळींना यश येण्याला, जोराची सार्वजनिक जागृती झाली पाहिजे. पण ती होण्याचे दिवस येण्याला किती तरी अवकाश आहे, हें विसरतां कामा नये. हिंदुस्थान देश अफाट आहे; आणि अशा बाबतींत पुष्कळच संघटक गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतात. तेव्हां साऱ्या देशभर सर्वसाधारण प्रगती होण्यासाठीं, कांहीं सुद्धां करावयाचें म्हणजे, त्याचा प्रारंभ व पुढील एकसारखें साहाय्य, सरकाराकडूनच व्हावें लागतें.

आजकाल आमच्या मुलांना जें शिक्षण दिलें जातें आहे, त्याच्या योगानें त्यांच्या मनांत, त्यांचा स्वधर्म व पूर्वापार चालीरीती इत्यादिकांविषयीं आदर कसा तो मुळींच राहात नाहा. याचा परिणाम फारच अनिष्ट व दुर्दैवाचा होत असून त्याचा आह्मां लोकांना अधिकाधिक धिक्कार व तिरस्कार वाटतो आहे. तिकडे अलीकडे प्रादुर्भूत झालेल्या अनिष्ट अडचणी तरी धर्माची शिक्षणाशीं जी फारखत झालेली आहे, तिचाच

मुख्यत्वें परिणाम होत. तरुण मंडळीला परमेश्वराचें भय बाळगण्याचें शिक्षण मिळालेलें नसल्यानें त्यांना मानवांविषयीं आदर वाटेनासा झाला आहे; किंवा निदान पक्षीं त्यांच्या मनांतून धार्मिक, सामाजिक, व राजकीय, अधिकाराविषयींचा पूज्यभाव नष्ट झाला आहे. धर्माच्या बाबतींत हिंदुस्थानसरकारची राजकारणाची वृत्ति सांगून सवरून तटस्थपणाची असल्यामुळें, शिक्षणक्रमामध्यें धार्मिक तत्त्वाचा पूर्ण लोप झालेला आहे. ही 'चाललें तसेंच चालूं दे,' अशा तऱ्हेची राज्यपद्धति हिंदी जनसमूहाला उन्नतीला पोहोंचविणारी नव्हे, आणि ह्मणूनच सरकार अलीकडे दीन व मागसलेल्या वर्गांतील लोकांना, स्वतःच उत्सुकतेनें साहाय्य करूं लागलें आहे.

या संबंधांत मी नम्रपणें असें सुचवितों कीं, इतर बाबतींत जी गोष्ट खरी, तीच नैतिक व धार्मिक शिक्षणाच्या संबंधांतही खरी आहे. ह्मणून हें तटस्थ वृत्तीचें धोरण, खरोखर, कोणा विवक्षित धर्मपंथाच्या संबंधानें ढवळाढवळ न करण्यापुरतें अवश्य राहावें; आणि सर्व मुलांना त्यांच्या त्यांच्या वाडवडिलांच्या धर्माचें शिक्षण मिळण्याची सोय करण्यांत यावी. सिंधी व ब्रह्मी लोकांपुरतें हें तत्त्व सरकारानें पूर्वींच मान्य केलेलें आहे. धार्मिक शिक्षण हें इतर शिक्षणाचाच एक अंतर्भूत भाग होय, असें सरकाराकडून ठरविलें गेल्यावांचून, हिंदुस्थानांत धार्मिक शिक्षण देण्याविषयीं प्रांतानिहाय झालेल्या निव्वळ

खासगी प्रयत्नांपासून विशेष फलप्राप्ति होणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. हल्लीं ख्रिस्ती धर्मासंबंधाचें धार्मिक शिक्षण मात्र वस्तुतः दिलें जात आहे. सरकारी तऱ्हेनें मान्य होणारा व सरकारांतून साहाय्य मिळण्यालायक धर्म काय तो तोच, असें ठरविलें जाईल, तरच हल्लींची ही वस्तुस्थिती ठीक आहे. धर्मशिक्षणाच्या आवश्यकतेविषयीं सरकाराकडून जी उदासीन वृत्ती धारण करण्यांत येत आहे ती मिशनरी लोकांच्या वजनाचेंच फळ आहे, असा सामान्य लोकांचा ग्रह होतो. पण सरकारचा खरा हेतु काय आहे, ही गोष्ट, या विषयावर यत्किंचितही विचार करणाऱ्यांच्या तेव्हांच लक्षांत येते. मिशनरी लोक करीत असलेल्या कामगिरीविरुद्ध, माझें कांहींच म्हणणें नाहीं. उलट हिंदुस्थानांतील सर्वसाधारण लोकांची, त्यांतूनही त्यांच्या ख्रिस्ती बंधूंची, स्थिती सुधारण्याच्या कामीं त्यांच्याकडून होत असलेले प्रयत्न, मला अवगत असून त्याबद्दल त्यांचें मी अभिनंदनच करितों. पण त्यांच्याशिवाय इतर धर्मपंथांनाही सरकारांतून सम्मती व साहाय्य मिळालेलें त्यांना कितपत पसंत पडेल, याची शंका आहे.

नैतिक व धार्मिक शिक्षण देण्याच्या संबंधांत पंजाबांतील शीख व इतर कांहीं धर्मपंथवाले प्रयत्न करीत आहेत. तसेंच दक्षिण हिंदुस्थानांत कांहीं शाळा व कॉलेजें यांच्यामध्यें धार्मिक व नैतिक शिक्षण दिलें जावें एतदर्थ खासगी लोकांकडून बरेच

प्रयत्न सुरू आहेत. बनारस येथील 'सेंट्रल हिंदू कॉलेज' ही संस्था या दिशेनें प्रयत्न केल्यास कितपत यश येईल याचा एक चांगलाच नमूना आहे. यासंबंधांत मुसलमानी संस्थांचा विशेषसा उल्लेख मी करूं इच्छित नाहीं. कारण, त्यांच्यांत धर्म व तत्संबंधीं शिक्षण, हा प्रश्न, अधिक सुलभ आहे. परंतु वर सुचविल्याप्रमाणें निरनिराळ्या पंथांच्या मूळ तत्त्वांच्या पायावर हीं सारीं स्थानिक व वैय्यक्तिक उदाहरणें उभारलेलीं आहेत. तेव्हां सरकार व सर्व जनता, यांनीं, ही चळवळ स्वतः हातीं घेऊन, ती इतकी उन्नत व कार्यक्षम केली पाहिजे कीं, तिच्या द्वारें आमची वाढती पिढी अधिकाधिक स्थिर स्वभावाची, आणि परमेश्वराचें भय बाळगणारी होत जाईल, हें मला हवें आहे. मी या प्रश्नाविषयीं दीर्घकाल व सूक्ष्म विचार करीत आलों आहें. आणि कौन्सिलामध्यें व त्याच्या बाहेरही, सरकारचें—त्यांतही, ज्यांच्या हातीं शिक्षणसंबंधी धोरण कायम करण्याचीं सूत्रें आहेत अशांचें—व बहुजनसमाजाचें लक्ष या विषयाकडे वेधण्याच्या प्रत्येक संधीचा, मी फायदा घेत आलों आहें. हिंदुस्थानाच्या ज्या भागांतून मी आलों आहें, तेथील हल्लींच्या युनिव्हर्सिटीच्या शिक्षणपद्धतीच्या क्रमांतून निघालेल्या मंडळीची, या बाबतींत मजशीं सहानुभूती नाहीं, हें पाहून मला निराशा वाटते. ही गोष्ट अत्यंत आवश्यक व तशीच ती साध्यही आहे, हा विचारच, त्यांना मिळालेल्या शिक्षणामुळें मान्य होणें दुरापास्त दिसतें.

साऱ्या हिंदुस्थान देशांत एकच धर्म प्रचलित असता, व तेथील प्रचंड लोकसमाजाच्या धार्मिक आकांक्षा व कल्पना, त्याच्यांतच समाविष्ट होण्यासारख्या असत्या, तर मोठें भाग्याचें झालें असतें. पण वस्तुस्थिती अगदीं उलट असल्यानें, आह्मी जास्त नेटानें प्रयत्न करून आमच्या मार्गांत येणाऱ्या अडचणी व अंगीकृत कार्याचा नाजुकपणा यांना आहारीं न जातां, इष्ट हेतू साध्य केला पाहिजे. नुकतेच जे अनिर्वचनीय व घोर राजद्रोहाचे गुन्हे घडून आले आहेत, त्यांच्यावरून आपणांला खरा व सतत झटून प्रयत्न करण्याला तात्काल प्रेरणा झाली पाहिजे आणि आपणांसमोर असलेल्या या वादग्रस्त प्रश्नाचें खरें महत्त्व कितपत आहे याची आपणांस पुरी जाणीव पटली पाहिजे. हिंदुस्थानांत सरकाराकडून विद्यादानाची जी अत्युत्तम देणगी दिली जात आहे, तिच्याबरोबरच योग्य अशा धार्मिक व नैतिक शिक्षणाचा लाभ मिळण्यास कसूर होणार नाहीं, हें पाहण्याचें सरकारचें काम आहे. आमचें सरकार दयावंत आहे तेव्हां त्याच्या उत्कट साहाय्यानें ही धार्मिक शिक्षणरूपी नाव, चांगली हाकारिली जाईल, आणि तिचें सुकाणू यश प्राप्त होईल अशा रीतीनें धरिलें जाऊन, शेवटीं ती नाव सर्व अडचणींतून पार पडून, सुखरूपपणें यशःप्राप्तिरूपी परतीराला लागलेली पाहण्याचा सुखाचा दिवस उजाडण्याला उशीर लागणार नाहीं, अशी मला उमेद वाटते.

# भाग तेविसावा.

## सार्वजनिक हिताचीं खातीं.

'सर्वांत मुख्य संपत्ती आरोग्य.' **इमर्सन.**

ज्ञानाचा प्रसार होत चालला त्याच्याबरोबरच आरोग्य-रक्षण हें सर्व लोकांना अधिकाधिक महत्त्वाचें व कळकळीचें काम झालें आहे. पूर्वी सांथीचे रोग अनिवार्य व नैसर्गिक होणारे समजले जात असत आणि त्यांपासून बरीचशी प्राणहानि झाली तथापि त्यांचें शमन करण्याचे उपाय फारच कमी योजण्यांत येत. दूषितांशीं संसर्ग घडल्यानें असा संसर्ग उपासमाराच्या व अशक्तपणाच्या स्थितींत जास्त बाधण्याचा संभव असतो. आरोग्यशास्त्राच्या नियमांचें अतिक्रमण झाल्यानें, घाणीचा किंवा घाणपाण्याचा पुर्ता निकास नसल्यानें किंवा तो प्रतिबद्ध असल्यानें, आणि रोगजनक परिस्थितीनें दूषित असलेल्या घरांत राहिल्यानें, सांथीचे रोग जडतात, ही गोष्ट आतां सर्वविश्रुत झालेली आहे. स्वतः स्वच्छतेकडे पूर्णपणें लक्ष देणें, आणि खाण्यापिण्याचा योग्य बंदोबस्त राखणें, हीं दोन

आरोग्यरक्षणाचीं मूळ आधारभूत साधनें होत. त्यांच्या अभावीं स्थानिक आरोग्यरक्षक अधिकाऱ्यांनीं मोठ्या परिश्रमानें जुळवून अमलांत आणिलेल्या आरोग्यरक्षणाच्या योजना साऱ्या व्यर्थ होतात. उलट एकाद्याचा वर्तनक्रम कोणच्याही तऱ्हेनें नांव ठेवण्याजोगा नसूनही, घाणपाणी अगर त्याचा अव्यवस्थित निकास यांच्यामुळें, त्याला विषाराची बाधा होऊं शकेल. ह्मणून सार्वजनिक आरोग्याच्या रक्षणाची तजवीज करणें स्थानिक आरोग्यरक्षक अंमलदारांना किती महत्त्वाचें आहे हें यावरून स्पष्ट होत आहे.

या गोष्टी इंग्लंडांत फारच कसोशीनें व तपशीलवार रीतीनें अमलांत येतात. हिंदुस्थानांत याचें होईल तितकें अधिक अनुकरण होणें अवश्य व फायदेशीर होईल. इकडे सार्वजनिक आरोग्यरक्षणसंबंधीं कायदा अमलांत आहे. त्या अन्वयें 'सॅनिटरी इन्स्पेक्टर्स' नेमण्याचा अधिकार, स्थानिक अधिकाऱ्यांकडे दिलेला आहे. वाटेल तेव्हां घरांच्या मोऱ्या तपासणें व आपल्या हद्दींतील खाण्यापिण्याच्या पदार्थांच्या पुरवठ्यावर बारकाईनें लक्ष ठेवणें, हीं कामें, त्या इन्स्पेक्टराकडे असतात. विक्रीस ठेवलेलें मांस, मासे, दूध, फळें, वगैरे पदार्थ दूषित आढळले तर ते एकदम जप्त करून माजिस्ट्रेटाकडे चौकशीसाठीं पाठवून देण्याचा त्यांना अधिकार असतो, आणि योग्य वाटल्यास जप्त केलेल्या जिन्नसांचा नाश करून टाकण्याचा





हुकूम माजिस्ट्रेट देऊं शकतो. ते विकणाऱ्या दुकानदारावर किंवा जिन्नसांच्या मालकावरही यानंतर खटला करून त्याला त्यापायीं जबर दंडाची शिक्षा देववितां येते. त्यानें पुनः तोच अपराध केल्याचें सिद्ध झालें तर, त्याला कैदेची शिक्षा देतात. खाण्यापिण्याच्या पदार्थांत भेसळ करणें, या गुन्ह्याची व्यवस्था 'फूड् अँड ड्रग्स् आक्ट' खालीं लागते. त्या अन्वयें, सॅनिटरी इन्स्पेक्टराला, हव्या त्या दुकानांत जाऊन, दूध, लोणी वगैरे खाण्याचे पदार्थ तपासणीसाठीं विकत घेतां येतात. असे पदार्थ विकत घेऊन, त्याचे तीन भाग करून, त्यांच्यावर मोहरा करावयाच्या व एक मोहोरबंद भाग दुकानदारापाशीं, दुसरा स्वतः जवळ ठेवून, तिसरा तपासणीसाठीं सरकारी पृथक्करण करणाऱ्या अधिकाऱ्याकडे पाठवावयाचा असतो. तपासणीअंतीं तो भेसळ झालेला सिद्ध झाला तर, विकणारावर खटला होऊन, त्याला जबर दंड होतो.

स्वच्छपणा, हा केवळ व्यक्तीसंबंधाचाच प्रश्न नसून सार्वजनिक आहे. गरीब लोकांच्या घरांमध्यें स्वतंत्र स्नानगृहाची सोय नसते. त्यांच्यासाठीं सार्वजानिक स्नानगृहें बांधून दिलेलीं असतात. तेथें थोडीशी फी घेऊन, स्नान करण्याची सोय, स्थानिक अधिकाऱ्यांना करून देतां येते. पुष्कळशा गांवांतून अशा स्नानगृहांशिवाय, सार्वजानिक पोहण्याच्या सोईही असतात, हें माझ्या पाहण्यांत आलें. अशी एक पोहोण्याची जागा,

मीं लंडन येथें पाहिली. तिचा सर्व लोक उपयोग करून घेतातच. शिवाय शाळेंतील मुलांनाही तेथें पोहोण्याला शिकवितात, याचा मला आनंद वाटला. बहुतेक स्नानगृहांजवळच धुण्याच्या जागाही असतात तेथें बायकांना धुणीं धुतां येतात. मोठ्या शहरांमध्यें घराचें भाडें जबर यामुळें सर्व गरीब कुटुंबांना सोईवार घरें घेतां येत नाहींत. एखाद्या लहानशा कोठडींतच राहावें लागतें. पण अशा संकुचित व कुंद जागेंत धुणीं धुण्याची फार गैरसोय असल्यानें ती या सार्वजनिक धुण्याच्या जागांनीं नाहींशी होते. शहरांतील प्रत्येक घरामध्यें केरकचरा सांठविण्यासाठीं केराची टोपली ठेवावी लागते. ती आठवड्यांतून एकदां, सार्वजनिक अधिकाऱ्यांनीं नेमलेले झाडणारे लोक, रिकामी करितात. केरकचरा, पृथक् बांधलेल्या भट्ट्यांमध्यें जाळतात, किंवा त्याची दुसरी कांहीं तरी व्यवस्था लावतात.

घाणपाण्याची व्यवस्था लावणें, हेंही आरोग्यरक्षणाचें एक अवश्य अंग आहे. प्रत्येक गांवामध्यें घाणपाण्याच्या गटाराची सोय केलेली असते. त्या गटारांमध्यें घरोघरच्या मोऱ्या सोडलेल्या असतात, व अशा प्रकारें वापराचें पाणी व घाण, गांवाबाहेर दूर नेऊन सोडतात. तेथें विशिष्ट क्रियेच्या द्वारें त्याचें खत तयार केलें जातें व त्याचा उपयोग शेतकीच्या समृद्धीसाठीं करण्यांत येतो. अथवा हें घाणपाणी ओहोटीच्या हद्दीपलीकडे समुद्रांत बंबानें फेंकून देतात. खेड्यापाड्यांतील





पाण्याचा पुरवठा, बहुतेक हिंदुस्थानांतल्याप्रमाणेंच विहिरीपासून घेतात. तोच मोठ्याशा गांवांत, नद्या किंवा सरोवरें यांच्यांतून नळानें आणतात. पाणी उपयोगांत आणण्यापूर्वी मोठमोठ्या फिल्टरबेड्स मधून गाळून घेतात. अलीकडे बऱ्याच वर्षांपासून आरोग्यरक्षणसंबंधीं तजविजी अमलांत आल्या आहेत. त्यांच्यामुळें रोग पुष्कळच कमी झाले आहेत. इंग्लंडांत ज्वराचें मान अगदींच संपुष्टांत आलें आहे. देवीच्या सांथी बहुतेक नष्टप्राय झाल्या आहेत. या बाबतींत देवी टोंचण्याच्या प्रघातामुळेंही थोडीथोडकी कामगिरी घडून आली आहे, असें नाहीं.

आजवरच्या प्रयत्नांमुळें झालेली प्रगती, या एकाच गोष्टीवरून लक्षांत येण्याजोगी आहे कीं, लंडन शहरामध्यें मृत्युसंख्येचें प्रमाण एका पिढीच्या अवधींतच पूर्वीपेक्षां तीन-दंशाशानें कमी झालेलें आहे. सांथीच्या देवीप्रमाणेंच ' टाय्फस् ' ज्वर बहुतेक नाहींसा झाला आहे. गोवर व क्षयरोग यांचे रोगी एक-तृतीयांशानें कमी झाले आहेत. स्थानिक आरोग्य-संरक्षक अधिकारी, तसेच त्यांमध्यें प्रमुख, ' लंडन कौंटी कौन्सिल,' रोगांचा मागमूस लागेल तेथें त्याचा बीमोड करण्यासाठीं, सारखे दक्षतेनें झटत असतात. यासंबंधीं खबरदारी घेतली जाते त्यांत, शाळेंतील विद्यार्थ्यांची—विशेषत: त्यांचे दांत व डोळे, यांची—डाक्तराकडून तपासणी करविली जाते, ती

लक्षांत घेण्यासारखी आहे. स्त्री डाक्तर व दाया शाळेंत जाऊन तपासणी करितात. तेथें रोग व वामटपणाचा शोध काढून, पुढें त्यांचा विद्यार्थ्यांच्या घरांमध्यें पत्ता लावतात, आणि शाळा व घरें रोगांपासून मुक्त करण्याची, हरतऱ्हेनें खटपट करितात. एकंदरींत, सुशिक्षित आणि ज्ञानसंपन्न लोकांच्या हातून चालविलेल्या आरोग्यसंरक्षक व्यवस्थेमुळें, मृत्युसंख्या पुष्कळच कमी झाली आहे, इतकेंच नव्हे, तर आयुर्दायाचें मानही पुष्कळच वाढलें आहे. दीर्घायुष्यप्राप्ती हेंच प्रत्येक प्राण्याचें अंतिम साध्य होय.

इंग्लंडांतील टपाल व तारायंत्र खात्यांतील व्यवस्था फारच आश्चर्यकारक आहे. मोठीं शहरें व गांव यांच्यामध्यें दररोज कितीदां तरी टपाल वांटलें जातें. आगगाड्यांची रहदारी भारी मोठी व जलद आहे. त्यामुळें जागजागीं टपाल तेव्हांच पोहोंचूं शकतें. हिंदुस्थानांतील टपाल व तारखातें जी उत्तम कामगिरी बजावीत आहे, ती आमच्या परिपाठांतली आहे. तिच्यापेक्षांही तें येथें इंग्लंडांत, वरचढ रीतीनें काम देतें आहे. आमच्या देशांत या खात्यानें करून दिलेल्या सोईंपैकीं, एक दोनींची इकडे उणीव दिसून येते. ती मुख्यत्वें 'मनी आर्डर व 'व्हाल्यू पेएबल् सिस्टिम'ची होय. इकडे 'मनी आर्डरी' व 'पोस्टल आर्डरी' विकत मिळतात, हें खरें. तरी हिंदुस्थानांत 'मनी आर्डरी'च्या पद्धतीमुळें देवघेवीच्या कामीं





जी सोय आहे, तिची इकडे उणीव वाटते. 'व्हाल्युपेए-बल'च्या द्वारें व्यापाऱ्यांना गिऱ्हाइकाकडे मालाचीं लहान लहान पार्सलें पाठवितां येतात तीं त्यांची किंमत वसूल केल्यावरच, पोस्ट आफिसांतून गिऱ्हाकांना मिळतात. अर्थांत नगदीनें मालाची विक्री करण्याला त्यांतही लहानशा प्रमाणावर ही तऱ्हा फारच उपयोगी व सोईची आहे. ती इकडे सुरू नाहीं याचें मला आश्चर्य वाटतें. पोस्टाचे अधिकारी त्याविषयीं उत्सुक नाहींत किंवा जनतेची सेवा करण्यांत ते कुचराई करितात, असेंही नाहीं. पण हें काम त्या खात्यानें हातीं घेतलें तर, मध्यम स्थितींतील व्यापारी व अडत्ये, यांचें नुकसान होण्याचा संभव असल्यानें, लोकमत विरुद्ध होईल, यामुळेंच ही तऱ्हा कदाचित् अमलांत आणिली गेली नसेल.

या खात्याची सर्वोत्कृष्ट कार्यक्षमता व साधनसमृद्धी अजमाऊन पाहण्याकरितां आह्मीं एक पत्र व लखोट्यावरील पत्ता हीं हिंदुस्थानांतील एका भाषेंत लिहून, तें तिकडे राहणाऱ्या एका गृहस्थाच्या नांवें धाडलें. त्या पत्राचें काय होतें तें पाहण्याची आम्ही मोठ्या जिज्ञासेनें वाट पहात होतों. बरेच दिवस झाले तसें, तें पत्र रद्दी कागदाच्या टोपल्यांत गेलें, असें आह्मी समजलों. पुढें एका सुरेखशा सुप्रभातीं तें पत्र उशीरां, तरी पण मालकाला पोहोंचविलें गेलें असल्याचें आम्हांला कळून आलें. तें प्रथम हिंदुस्थानांत गेलें; तेथें त्याच्यावरील पत्त्याचा

इंग्लिशमध्यें तर्जुमा होऊन, तें परत इंग्लंडाला आलें; आणि पुनः तें मूळच्या पत्त्यावर मालकाला पोहोंचविलें गेलें. अशी त्याची व्यवस्था लागली होती.

युरोपांत–त्यांतही इंग्लंडामध्यें–प्रत्येक गोष्ट हिंदुस्थानांतल्या पेक्षां पुष्कळच मोठ्या प्रमाणावर आढळते. तेथील स्त्रिया व पुरुष अधिक धिप्पाड व सशक्त. तीच स्थिति खेळत्याफिरत्या मुलामुलींची व नित्य नेमानें चिमुकल्या गाडींतून हवा खाण्या-साठीं फिरवीत जात असलेल्या अर्भकांचीही आहे. घोडे, गाड्या, गाड्यांत भरलेलीं ओझीं हिंदुस्थानांतील वाहनांच्या मानानें अजस्त्र दिसतात. गुरेंढोरें, बकरीं, डुकरें, कोंबडीं बदकें, सुद्धां तशींच. झाडेंही सामान्यतः मोठीं, डौलदार, प्रमा-णशीर, चांगलीं जतन केलेलीं व फारच मनोरम दिसतात. भाज्या व फळें सुद्धां हिंदुस्थानांतील बाजारांतल्या पेक्षां पुष्क-ळच मोठमोठीं असतात.

शहरें, रस्ते, सार्वजनिक इमारती, दुकानें, करमणुकीच्या जागा, सुद्धां मोठ्या प्रमाणाच्या बाबतींत कमी असतात असें नाहीं. गिरण्या, कारखाने, उद्योगशाळा, व्यापारधंद्याच्या जागा, सर्व कांहीं, तिकडे एशियाखंडांत वर्षानुवर्ष दृष्टीस पड-णार नाहींत, इतक्या भव्य व मोठ्या प्रमाणावर बांधलेल्या आहेत. आगगाड्या व त्यांचीं इंजिनें, आगबोटी व इतर

प्रवासांचीं साधनें, सारींच प्रचंड. उपवनें व बागबगीचे, यांचीही तऱ्हा हीच. इतक्या मोठ्या, चांगल्या, सुशोभित लावलेल्या व राखलेल्या, सार्वजनिक बागा हिंदुस्थानांत क्वचितच दृष्टीस पडतात.

विलायतेंत कोणतीच गोष्ट यःकश्चित् किंवा लहान प्रमाणावर करण्यांत येत नाहीं. अशी तेथील श्रीमंती व चैन प्रमुख व स्पष्ट दिसते. तसेंच तेथील दारिद्र्य सुद्धां अत्यंत तीव्र व दूरवर फैलावलेलें आहे. हें म्हणणें उपरोधिक तरी पण खरें आहे. खरोखर येथें संपत्ती आणि दारिद्र्य जणों हातांत हात धरून चालताहेत. साऱ्या पृथ्वीवरील अत्यंत समृद्ध व विस्तीर्ण, अशा या शहरांतील अतिशय शोभिवंत व थाटदार राजमार्गांमागेंच, अत्यंत कंगाल व घाणेरड्या गल्ल्या व घरें आहेत. इकडे म्हण आहे कीं, 'देश–मोकळा प्रदेश–परमेश्वरानें निर्माण केला व माणसांनीं शहरें वसविलीं.' तिचें रहस्य वर लिहिलेल्या विलक्षण विरोधावरून स्पष्ट होतें. देश सुपीक व त्याच्यांत पैदा झालेलीं माणसें उद्योगी आणि साहसी. स्त्रिया व पुरुष दोघेही फारच मेहनती. तेव्हां त्यांनीं हातांत घेतलेल्या प्रत्येक वस्तुमात्राची अभिवृद्धि तात्काळ होते. या भव्य प्रमाणाला बाध असा निसर्गदेवतेच्या महत्तर सृष्टीमध्यें तेवढा पर्वत व मोठमोठ्या नद्या यांचा. या मानानें पाहतां इकडील नद्या व पर्वत बेताचेच आहेत. स्कॉट्लंड देशांत मात्र भव्य पर्वत व

विस्तीर्ण सरोवरें दृष्टीस पडतात. या ब्रिटिश बेटांतील खाड्यांना मिळालेल्या साऱ्या नद्या, मुखाजवळ फार विस्तृत झालेल्या असल्यानें समुद्रांतील दळणवळण व प्रचंड व्यापार, यांना सोपें पडतें; तसेंच या राष्ट्राच्या साहसी उद्योगाच्या वृद्धीला हवा तितका अवकाश मिळतो.

# भाग चोविसावा.

## लोकमत.

'जरी कोणास स्वतःच्या मर्जीविरुद्ध एखाद्या गोष्टीस संमति द्यावी लागली, तथापि त्यामुळें त्याच्या नेहमींच्या मतांत फेरबदल होत नाहीं.'

बट्लर.

हिंदुस्थानामध्यें जातिभेद तीव्र असल्यानें तेथें लोकमत फार प्रबल असतें, अशी कांहीं मंडळींची समजूत झालेली दिसते. पण ती खरी नाहीं. खानपान व विवाह, यांच्या संबंधाच्या रूढी व नियम, कोणी उघड उघड मोडणार नाहीं तोंवर, त्याला जनसमाजाकडून शासन झाल्याशिवाय, व्यवहारांतील हवी ती गोष्ट मनमानेल तशी करतां येते, जनरूढीविरुद्ध साधारणसें वर्तन असलें तर, त्याच्याविषयीं टीका सुरू होऊन, क्वचित् प्रसंगीं नापसंतीही दाखविली जाते. पण त्याच्यासाठीं बहिष्काररूपी शिक्षा सहसा अमलांत आणली जात नाहीं. जातिभेदविषयक संस्था, बहुतेक जीर्ण व अश्मसारभूत किंवा प्रेतवतशी झालेली आहे. तिच्या अंगीं वर

निर्दिष्ट केलेल्या कांहीं थोड्या नियमित बाबतींशिवाय प्रागतिक लोकांना जनरूढीचें उल्लंघन करण्यापासून परावृत्त करण्याइतकें त्राण राहिलेलें नाहीं.

उलट इंग्लंडांमध्यें प्रत्येक व्यक्तीला वाटेल तसें वर्तन करण्याची हवी तितकी मुभा आहे. तरी, तेथील लोकांमध्यें समाजाच्या ठराविक रूढींचें उल्लंघन करणारी अशी एखादी नवी तऱ्हा स्वीकारून, आपल्याकडे बोट दाखविलें जाण्याची स्थिती उत्पन्न करून घेण्याइतके धीट गृहस्थ क्वचितच आढळतील. इंग्लिश लोक मोठे बहुजनसत्तावादी आहेत, अशी प्रसिद्धी आहे. माझ्या मतें ही प्रसिद्धी इतक्याच पुर्ती खरी दिसते कीं, त्यांना सामान्यत: चालू रूढी बाहेर किंवा विरुद्ध गोष्ट, सहसा खपत नाहीं. त्यांच्या चालीरीती बहुजनसत्तावादित्वाला अनुरूप आहेत व त्या कायम राखण्याची त्यांची तऱ्हा गतानुगतिकतेची आहे. लोकांच्या हेटाळणीला पात्र होण्याजोगी कोणचीही गोष्ट करण्याला ते नेहमीं मागेंपुढें पाहतात. पण एकदां का ते नवीन क्रमाला लागले, कीं ते त्याच्या मागें उत्सुकतेनें जाण्यांत बिलकुल कसूर करीत नाहींत.

पुष्कळसे इंग्रज लोक सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नांचा बारकाईनें विचार करीत नाहींत. याचें मला आश्चर्य वाटलें. ते स्वत:चें अन्नवस्त्र कमविण्यामध्यें अगदीं निमग्न झालेले असतात, अगर सार्वजनिक प्रश्नांची त्यांना पुरी माहिती नसते, अथवा

ते त्याविषयीं उदासीन असतात, किंवा आपल्या आवडीच्या वर्तमानपत्रामध्यें लिहून आलेल्या अथवा आपल्या राजकीय पक्षाच्या प्रमुख मंडळीनें प्रगट केलेल्या मतांचा, पोपटाप्रमाणें अनुवाद करून, समाधान मानीत असतात. पुर्ता व गहन विचार केल्याशिवायच अशा लोकांनीं दिलेलें लोकमत हितपरिणामी होणें, फारसें शक्य नाहीं, हें सहज समजून येईल. अशा प्रकारचें लोकमत, गळयांत घाट बांधलेल्या म्होरक्या मेंढ्याच्या मागून धांवणाऱ्या मेंढराच्या कळपाच्या मताच्या तोडीचेंच असणार. लोकसमाजाची स्थिती कमी जास्ती मेंढराच्या कळपासारखी असेल त्या मानानें लोकमत हा शब्द, उणा अधिक वैय्यर्थिकच होणार.

लोकमतानुरूप चालणाऱ्या राज्यकारभारपद्धतींत—विशेषतः स्थानिक व म्युनिसिपल् कामामध्यें—इंग्लंडाची प्रगती, बहुतेक पूर्णतेला पोहोंचलेली आहे. त्याअर्थी लोकांनीं वेळोवेळीं निकालासाठीं पुढें येणाऱ्या सामाजिक प्रश्नांची योग्य माहिती करून घेण्यास झटावें आणि सुजाण व पथ्यकर लोकमत तयार करण्यासाठीं प्रयत्न करावा, हें अगदीं अवश्य आहे. लोकसमाज लहानसा असेल तेथें, त्याच्या कारभारामध्यें, लोकमताला अनुसरून व्यवस्था ठेवली जाण्यास उत्तम संधी असते. विचारासाठीं पुढें येणाऱ्या प्रश्नांमध्यें, प्रत्येकाचा थोडा बहुत हितसंबंध असतो. सबब प्रत्येकजण योग्य विचार करूनच मत कायम करील, असा अधिक संभव असतो. असें आहे तरी,

लोकसमाजांतील पुष्कळच लोक, सामाजिक कामाविषयीं उदासीन आढळतात. हें ह्मणणें बरेंच विरोधाभासाचें दिसेल. असें मला सांगण्यांत आलें कीं स्थानिक निवडणुकीमध्यें, फार तर एक—तृतीयांश मतदार, मतें नोंदविण्याला पुढें येतात. आणि त्यांतील पुष्कळांना मतें मागण्यासाठीं येणाऱ्या उमेदवारांचीं नांवें सुद्धां सांगतां येत नाहींत.

खेडेगांवांतील लोकसमाज लहानसाच असावयाचा. त्याचें लोकमत प्रथमतः गप्पागोष्टींमध्यें, शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या साहजिक भेटीमध्यें, व बोलण्याचालण्यामध्यें, तयार होतें. त्या खेड्यांमधून सुद्धां सार्वजनिक सभागृहें असतातच. त्यांच्यांतच पुढें आपआपसांतच भाषणें ऐकण्याला लोक जमतात. पण ते केवळ राजी नाराजी दर्शवितात. याशिवाय व्याख्यानाकडे किंवा नंतरच्या वादविवादामध्यें ते मुळींच लक्ष देत नाहींत. या सभा भरविण्याला, प्राथमिक शाळांच्या इमारती सुद्धां उपयोगांत आणितात. सामाजिक हिताहितासंबंधीं लोकांमध्यें चळवळ उत्पन्न होण्याची व्यवस्था एकाच जागीं निबद्ध न राहतां, ती एकदम देशभर फैलावते. निरनिराळे स्थानिक अधिकारी, पाळीपाळीनें लोकमताचें शिक्षण देण्याकरितां व त्याचा विकास होण्यासाठीं मुख्य मुख्य ठिकाणीं व्याख्यानें देत राहतात.

शिवाय निरनिराळ्या चळवळींच्या समर्थनासाठीं संघटित संस्था तयार होतात. त्यांच्या विरुद्ध मताला असलेली मंडळी

त्यांना हाणून पाडण्यासाठीं दुसऱ्या संस्था उभ्या करितात. या योगानें परस्परांमधील मतभेद व विरोध कळसाला पोहोंचतो, व वाक्कलहाचें रण माजतें. पार्लमेंटांतील निवडणुकीच्या प्रसंगीं तर लोकांमधील उत्साह व आवेश, यांना जास्त ऊत येतो. या निवडणुकीच्या वादांत पुष्कळ वेळां वाक्कलहावरून मारामारी-पर्यंत मजल पोहोंचते. त्याच्या पुढील पायरी सभेंतील खुर्च्या, बाकें वगैरे उलथून टाकणें ही असून शेवटीं या निवड-णुकीच्या युद्धाचें पर्यवसान म्हटलें ह्मणजे सभापीठ सर करून तेथून प्रतिपक्षाच्या वक्त्यास पिटाळून लावण्यांत होत असतें. हे तंटे मिटविण्यासाठीं पोलीसांना सुद्धां कधीं कधीं जावें लागतें. पूर्वीच्या होमरूल बिलाच्या चळवळीसंबंधानें असा एक ध्यानांत ठेवण्याजोगा प्रसंग घडून आला होता. बर्मिं-गह्याम येथील 'टौन हॉल' मध्यें मिस्तर लॉयड जॉर्ज हे होमरूल बिलासंबंधानें मुख्य भाषण करणार होते. त्यावेळीं प्रतिपक्षानें दंगा करून, तेथील खिडक्या फोडल्या, व आंतील जिनसांची नासधूस केली. मिस्तर लॉयड जॉर्ज यांना आगीचा बंब चालविणाऱ्याचा वेश घेऊन, तेथून निसटून जावें लागलें होतें ! अशांतलीं अलीकडचीं उदाहरणें 'सफ्रेजेट्ट'—आडदांड मताभिलाषी स्त्रिया—यांच्या सभांसंबंधाचीं आहेत. स्त्रियांना मत देण्याचा हक्क मिळविण्यासाठीं, या आडदांड बायांनीं, आत-तायीपणा व नासधूस करण्याचा उपक्रम केला आहे. या त्यांच्या चळवळीकडे पार्लमेंटनें दुर्लक्ष केल्यामुळें, त्या त्रासून

बेकाम झाल्या आहेत आणि आपल्या ह्मणण्याकडे लोकांचें लक्ष वेधण्याच्या हेतूनें, ज्या जाहीर सभांमध्यें 'क्याबिनेट मिनिस्टर्स'—प्रधान मंडळी—मुख्यतः बोलणारे असतील तेथें जाऊन, त्या गडबड करितात. त्याचा मोबदला घेण्यासाठीं, सफ्रेजेट्ट बायांच्या सभा मोडून टाकण्याचा उद्योग सरकार पक्षाची मंडळी करूं लागली आहे. असा हा हुतुतूचा खेळ चालू आहे व त्यांची मागणी तशींच पडून राहिली आहे.

लोकमत प्रगट करून, त्याचा फैलाव करण्याच्या कामीं वर्तमानपत्रें, यांचें एक मोठें प्रबल साधन झालें आहे. सार्वजनिक लोकमत प्रगट करण्याचीं साधनें या नात्यानें गांवोगांवचीं सभागृहें व वादविवाद करण्याच्या जागा, यांच्याप्रमाणें, त्यांच्या ऐवजीं, किंवा त्यांची पूर्तता करण्याला, विलायतेंतील वर्तमानपत्रें फार उपयोगाचीं व मोठ्या योग्यतेचीं झालेलीं आहेत. जगांतील इतर कोणच्याही भागांतील वर्तमानपत्रें वृत्तप्रसाराच्या कामीं, त्यांची बरोबरी करूं शकत नाहींत. तथापि सामाजिक—विशेषतः राजकीय—प्रश्नांचा ऊहापोह करण्यांत त्यांच्यामध्यें जो पक्षपात व दुराग्रह दिसून येतो, त्यामुळें लोकशिक्षणाच्या बाबतींतलें त्यांचें वजन व महत्त्व, बऱ्याच अंशानें कमी होत चाललें आहे. अशा विषयांचा विचार, सत्याला स्मरून व निःपक्षपातानें करणारीं व खरी वस्तुस्थिती लोकांपुढें मांडण्याची मनापासून इच्छा बाळगणारीं अशीं कांहीं स्वतंत्र व बाणेदार वर्तमानपत्रें आहेत. बाकी बहुतेक निवळ

पक्षपात करितात, आणि प्रतिपक्षाच्या सभा वगैरे विषयींचा उल्लेख बुध्द्या सोडून देतात, किंवा त्यांच्यासंबंधी कुत्सितपणा दाखवितात. स्वपक्ष आणि स्वमत यांचें समर्थन करण्यासाठींच जणों तीं आपली सर्व जागा राखून ठेवतात. जाहीर व्याख्यानाच्या हकीकतीमध्यें सुद्धां, बुध्द्या फेरफार करून, एडिटर साहेबांना न रुचणारा भाग गाळून, त्या हकीकती प्रसिद्ध करितात. याचा मला स्वतः अनुभव आलेला आहे. खरी वस्तुस्थिती किंवा सत्य, यांचा असा अपलाप किंवा विपर्यास होतो, यामुळें सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधानें, योग्य मत बनविण्याला, मोकळें व निर्मळ मन असलेल्या गृहस्थाला फार कठीण जातें. परंतु सत्यापलाप करून लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकण्याचा जो हा प्रयत्न असतो त्याचा पुष्कळ वेळां उलट परिणाम होतो आणि त्यामुळें वृत्तपत्रकारांचे उद्दिष्ट हेतू निष्फळ होतात.

# भाग पंचविसावा.

## हिंद आणि ब्रिटानिया.

युरोपांतील या सफरीमध्यें हिंदुस्थानासंबंधीं निरनिराळ्या विषयांवर माझ्या मनांत आलेले प्रासंगिक विचार, मीं येथवर नमूद केले आहेत. ते, इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या परस्पर संबंधाविषयीं ज्यांनीं मननपूर्वक विचार केलेला नाहीं, अशा वाचकांच्या थोडेबहुत तरी उपयोगी पडतील.

परमेश्वराच्या कृपेनें व सुदैवानें हिंदुस्थानावर इंग्रजांचें प्रभुत्व आहे. हिंदी राष्ट्राच्या प्रगतीसंबंधानें सृष्टिनियमानुसार राजकारणाचीं दोन निरनिराळीं धोरणें अमलांत आणण्याजोगीं आहेत. कारण जसें व्यक्तीला, तसेंच राष्ट्रालाही, एकाच स्थितींत स्वस्थ व कायम राहतां येणें शक्य नाहीं. हिंदी लोकांना राज्यकारभारामध्यें अधिकाधिक भाग देऊन त्यांच्या अंगीं स्वावलंबन आणणें, हें प्रगतीचें एक धोरण. दुसरें, त्यांना नेहमींच धाकदपटशांत ठेवून, ब्रिटिश प्राबल्याचें मूलतत्त्व अशी जी त्यांच्यांत दिसून येणारी नैसर्गिक स्वातंत्र्याकडची

ओढ ती हाणून पाडणें, हें होय. ही दुसरी तऱ्हा प्राचीन आर्य लोकांनीं पादाक्रांत केलेल्या लोकांसंबंधीं थोड्याबहुत प्रमाणानें अजमावून पाहिली होती. तिच्यांत शेवटीं त्यांना यश आलें नाहीं.

दुर्दैवानें पुढें मागें ब्रिटिश लोकांच्या भुजबलाचा आधार नाहींसा झाला, आणि त्यावेळीं हिंदुस्थानाला स्वतःच्या हिंमतीनें व कर्तृत्वानें आपल्या पायावर उभें राहतां येण्याची योग्यता प्राप्त झाली नसली तर तो देश दुसऱ्या कोणत्या तरी पर-राष्ट्राच्या हातीं पडेल, किंवा तो ज्या बेबंदशाहीच्या शोचनीय दुःस्थितींतून नुकताच वर आला आहे, तशा बेबंद स्थितीला पुनः पोहोंचेल. पूर्वीं रोमन लोक ब्रिटन सोडून निघून गेले तेव्हां, ब्रिटिश लोकांना याच प्रकाराचा अनुभव येऊन चुकला आहे. हल्लींच्या या बादशाही राष्ट्राच्या हातीं आलेल्या या फार अंत-रावर असलेल्या साम्राज्यांतील लोकांच्या संबंधानें, त्याच इति-हासाची पुनरावृत्ती होण्याची पाळी न येवो.

सांप्रत परिस्थितीचा स्थूलमानानें विचार करतां हिंदुस्था-नाला इतउत्तर फारच चांगली स्थिति यावयाची आहे, अशी माझी ठाम समजूत झाली आहे. कारण, ब्रिटिश लोक स्वातंत्र्य व न्यायनीती, यांचे फार चहाते आहेत. हिंदुस्थानाला ते लोक, प्रभुसत्तेनें आपल्या हातीं सोंपली गेलेली ठेव, असें समजतात. तेव्हां तेथील राज्यकारभाराची व्यवस्था केवळ अधिकारी

मंडळीच्या स्वार्थसाधनासाठीं व प्रजेला पिळून काढण्याच्या उद्देशानें चालवावयाची नसून, ती तेथील लोकांना फायदेशीर झाली पाहिजे, ही गोष्ट ते पूर्णपणें उमजून आहेत.

त्यांच्यांतील सर्व प्रमुख व राज्यकार्यधुरंधर मंडळीला, या गोष्टीची जाणीव आहे. प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत, त्याच्या मधील जोम कमी होंऊं लागतो असा एक काळ अवश्य येतो. एखाद्या कुटुंबांतील कर्ता पुरुष आपल्या हातून त्या कुटुंबाची व्यवस्था नीटपणें चालण्याला लागणारी मेहेनत होणें अशक्य आहे, असें पाहून, पुत्राला शिक्षण देऊन तयार करितो, व आपल्याला मदत देऊन हळू हळू सर्व कुटुंबसंरक्षणाचा बोजा त्याच्या शिरावर देतां येईल, इतपत त्याला तयार करितो. त्याप्रमाणें, राष्ट्रालाही अशा काळासाठीं पूर्वींपासूनच तरतूद करून ठेवावी लागते. हिंदुस्थानाच्या बाबतींत ब्रिटिश राष्ट्राची वृत्ती याच प्रकारची आहे, असें ह्मणतां येईल. त्याची हीच इच्छा आहे कीं, कालवशात् हिंदुस्थानाला असा सुदिन प्राप्त होईल कीं, ग्रेट ब्रिटनच्या संरक्षक कृपाछत्राखालीं स्वतःच्या हिंमतीवर देशाचा राज्यकारभार चालविण्याइतकी कार्यक्षमता त्या देशाच्या अंगीं येऊन तो राज्यकारभाराच्या बाबतींत स्वावलंबी बनेल.

आमचा ग्रेट ब्रिटनशीं निरंतर संबंध राहात जाण्यावरच आमची भावी उन्नती अवलंबून आहे, हें मीं अनेकवेळ प्रतिपादन केलेंच आहे. ग्रेट ब्रिटनचे लोक फारच दयाशील व उदार-

बुद्धीचे होते. त्यांनीं शेंकडो वर्षें परचक्राच्या अमलाखालीं राहिल्यामुळें अज्ञानांधकारांत बुडून जाऊन स्वार्थैकदृष्टी बनलेल्या अशा हिंदुस्थानांतील अनेक निरनिराळ्या झालेल्या संस्थानांचें एक स्वावंलबी व जोमदार हिंदी राष्ट्र तयार केलें. या गोष्टीचें, तिकडील भावी पिढ्यांच्या लोकांना, निस्संशय स्मरण होईल. या थोर व उदारपणाच्या राजकीय धोरणाच्या उलट वर्तन करण्याचा प्रयत्न कोणी करीत असल्याचें कधीं मधीं ऐकूं आलें तरी, आपण हताश होऊं नये. कारण, माझ्या हिंदी देशबांधवांना मी हें खात्रीपूर्वक सांगून ठेवतों कीं, हें सारें राष्ट्र–राष्ट्रीय स्वरूपानें–या उच्च ध्येयाला बिलगलेलें आहे, आणि तें, त्याला खास चिकटून राहील, त्याचा त्याग कधींही होऊं देणार नाहीं. या संबंधांतील ग्रेट ब्रिटनची वृत्ती नुसती तोंडापुरती सहानुभूती दाखविण्याची आहे असें नाहीं. या थोर हिंदी साम्राज्याची खरी प्रगती व भरभराट होत राहावी, अशा उत्कट इच्छेनें ब्रिटिश लोक प्रेरित आहेत. प्रसंगविशेषीं कितीही कुरकुर ऐकूं येत असली तरी, हिंदुस्थानावरील ब्रिटिशांचा अंमल, पूर्वीपेक्षां आजकाल अधिक भक्कम पायावर उभा आहे. तेथील कोट्यावधी प्रजेची राजनिष्ठा तशीच खरी व मनापासून आहे. कृतीवरून मनुष्याचें परिज्ञान होतें. तशीच राष्ट्राची परीक्षा त्याच्या राजकीय कृत्यांवरून केली जाते. देश पादाक्रांत करून त्याच्यावर अंमल चालविण्याच्या बाबतींत, रोम, पोर्तुगाल व स्पेन,

यांच्यापेक्षां आपण किती तरी श्रेष्ठ आहों, असें ग्रेट ब्रिटननें स्पष्टपणें सिद्ध करून दाखविलें आहे, आणि मीं वर निदर्शित केलेलें राज्यकारभाराचें धोरण त्यानें नेटानें चालविलें तर ग्रेट ब्रिटनचें नांव चिरकाल संस्मरणीय राहील.

मलाया पेनिन्शुला आणि जावाची सफर केली, तिच्यावरून हिंदुस्थान आणि ब्रिटन यांचा जो हा राजकीय संबंध जडलेला आहे त्याचें महत्त्व किती आहे व राजकीय दृष्ट्या त्याचा खरा अर्थ काय आहे, याविषयींची माझी कल्पना व समजूत अधिक दृढ झाली होती. तसेंच या हल्लींच्या सफरीचाही माझ्या मनावर पक्का ठसा उमटला आहे, आणि पूर्वीपेक्षांही अधिक स्पष्टपणें माझ्या निदर्शनास आलें आहे कीं, आमच्या देशाची खरी उन्नती व कल्याण, वास्तविकपणें आमच्या स्वतःच्याच परिश्रमांवर अवलंबून आहे. मात्र आपल्या राज्यकर्त्यांनीं आमची पितृतुल्य काळजी वाहून आमच्या उन्नतीचा मार्ग आह्मांला दाखवून दिला पाहिजे. ही राष्ट्रीय उन्नती साध्य होण्याला, आमची प्रगती थोड्याशाच दिशांनीं होऊन भागावयाचें नाहीं. ती सर्व दिशांनीं चालली पाहिजे. त्या ध्येयभूत उन्नतीला पोंहोंचण्यासाठीं, वरिष्ठ प्रतीचें शिक्षण प्राप्त होण्याची सामग्री संपादन करणें, हें केवळ पहिलें पाऊल होय. सामाजिक व राजकीय प्रश्नांच्या बरोबरच, थोर व महत्त्वाच्या अशा आर्थिक, व्यापारसंबंधीं, औद्योगिक, शिक्षणविषयक, आणि सार्वजनिक आरोग्यसंबंधाच्या, प्रश्नांशींही टक्कर मारली

पाहिजे. या सर्वांहूनही श्रेष्ठ व महत्त्वाची गोष्ट, आह्मीं दीर्घ उद्योगीपण व चिकाटी, यांच्या संवयी लावून घेतल्या पाहिजेत. आणि धैर्याचें परिशीलन करून आपल्या व्यवसायांत व्यापार-विषयक सचोटी व राजकीय नीतिमत्ता हे गुण अंगीं आणण्याची खटपट केली पाहिजे.

आपल्या चारित्र्याची उन्नति व देशाभिमानाची अभिवृद्धि केली तरच, पुनरपि सुधारलेल्या जगाच्या आदरास पात्र होण्याची आपणास उमेद बाळगतां येईल. हें काम कष्टाचें व परिश्रमाचें आहे. त्याच्यासाठीं सतत व दीर्घ प्रयत्न हवा आहे. हीं ध्येयें साध्य होण्यापूर्वी, अनेक शतकें निघून जातील. पण मला आमच्या राष्ट्राचा, तसेंच आह्मी ज्या विवक्षित मानवजातीच्या कुलांतले आहोंत, त्यांच्या भावी उत्कर्षाच्या स्थितीविषयीं पक्का भरंवसा आहे. कारण, या आमच्या मानवजातीच्या कुलाविषयीं परमेश्वराला विशेष काळजी आहे, अशाविषयीं आह्मां हिंदवासीयांना भरंवसा वाटतो आहे.

**समाप्त.**

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५४ | २० | कोण- | कोणा |
| १०५ | १९ | त्यांच्या | त्यांच्यांत |
| १०६ | ९ | होता | होतो |
| ११८ | ८ | काचें | कोच |
| १८४ | १९ | पेक्षणीय | प्रेक्षणीय |
| १९६ | २१ | परत | परत येतांना |
| २०३ | १४ | पुष्कळस | पुष्कळसे |
| २१२ | १० | दाखविणारें | दाखविण्याचें |
| २२२ | ८ | मोठेंसें | मोठें |
| २४० | १६ | मंडळी | मंडळींला |
| २४५ | २ | टायटीप | टापटीप |
| २४८ | ३ | भरभराटाची | भरभराटीचा |
| २६९ | ८ | वैय्यर्य | वैय्यर्थ्य |
| २७२ | २१ | असते | असत |
| २७३ | ६ | प्रामाणें | प्रमाणें |
| २७७ | १८ | पुरातन वस्तुसंशोध० | पुरातनवस्तुसंशोध० |
| २७९ | १४ | दिसणाच्या | दिसणाऱ्या |
| २८० | १० | बरोवर | बरोबर |
| २८२ | ३ | दीप स्तंभा- | दीपस्तंभा- |
| २८३ | १६ | लायवरी | लायब्ररी |
| २८५ | २० | उद्धस्त | उध्वस्त |
| २९२ | २१ | तेही | तेंहां |
| २९३ | १० | तव्हांच | तेव्हांच |
| ,, | १६ | दजाच्या | दर्जाच्या |
| २९४ | २० | तारुण्यदशोला | तारुण्यदशेला |
| २९६ | ७ | हंसे | हसें |
| ३०० | ७ | 'फाय ब्रॉडस' | 'फायर-बँड्स' |
| ३१० | ९ | मिळविण्याची | मिळविण्याचीं |
| ३१६ | १७ | नाहा | नाहीं |